**शासन, समाज आणि शिक्षण** / कृष्ण कुमार / भाषांतर : गणेश विसपुते
Shasan, Samaj Ani Shikshan / Krishna Kumar
Translated by Ganesh Vispute

म / ९७७

पहिली आवृत्ती ⊙ : फेब्रुवारी २००७

मुखपृष्ठ : © सुधारक ओलवे

किंमत : १२० रुपये

ISBN 81-88284-91-2

मुद्रक/प्रकाशक
प्रकाश विश्वासराव
लोकवाङ्मय गृह
भूपेश गुप्ता भवन
८५, सयानी रोड, प्रभादेवी
मुंबई - ४०० ०२५

मुद्रणस्थळ
न्यू एज प्रिंटिंग प्रेस
भूपेश गुप्ता भवन
८५, सयानी रोड
प्रभादेवी
मुंबई - ४०० ०२५

# प्रस्तावना

पंचवीस वर्षांपूर्वीच्या कृष्ण कुमार यांच्या पुस्तकाचं मराठीत भाषांतर प्रकाशित होणं ही एक महत्त्वाची घटना आहे. आपल्या मौलिक ग्रंथांचं देशातल्या इतर भाषांमध्ये आपण भाषांतर करू शकत नाही, हे शिक्षणक्षेत्रातल्या जडशीळतेचंच द्योतक आहे. गिजुभाई बधेका यांच्या *दिवास्वप्न* सारखी अमर साहित्यकृती मराठीत येण्यासाठी पन्नास वर्षांहून अधिक काळ लागला.

हे एक अतिशय महत्त्वाचं पुस्तक आहे. भारतीय शिक्षणावरच्या सगळ्यात महत्त्वाच्या पुस्तकांपैकी एक आहे. यात भारतीय शिक्षणाच्या वस्तुस्थितीचं केवळ वर्णन नाही तर त्या परिस्थितीचं कठोर मूल्यमापन केलेलं आहे. यातले बरेचसे निबंध पहिल्यांदा *दिनमान* या प्रगतीशील हिंदी नियतकालिकात प्रकाशित झाले होते. त्यावेळी कृष्णकुमार जेमतेम पंचवीस वर्षांचे असतील. आपलं प्रखर भान आणि तीक्ष्ण दृष्टी याचमुळे बहुधा कृष्ण कुमार भारतीय शैक्षणिक संशोधन एवढं समृद्ध करू शकले आणि त्याला एक नवी दिशा देऊ शकले.

पुण्याशी कृष्ण कुमार यांचा संबंध बराच जुना आहे. कॅनडातून पीएच. डी. केल्यानंतर १९७५ साली ते थेट पुण्यात आले. त्याची दोन कारणं होती. एकतर प्रख्यात शिक्षणतज्ज्ञ जे.पी. नाईक पुण्यात रहायचे आणि पुण्याहून तेव्हा *सनशाईन* नावाचं अतिशय चांगलं नियतकालिक निघायचं.

सगळ्यात आधी हिंदीत *राज, शिक्षा और समाज* मॅकमिलननं छापलं. पहिल्या वाचनातच मला ते भिडलं. काही वर्षांनी मॅकमिलननं त्यांचं हिंदी प्रकाशन बंद केलं तेव्हा सवलतीच्या दरात आम्ही ७०० प्रती विकत घेऊन या विषयात रस असणाऱ्यांपर्यंत त्या पोहचवू शकलो.

गणेश विसपुतेंनी या पुस्तकाचं एवढं चांगलं भाषांतर करून मराठी भाषेसाठी आणि शिक्षणासाठी महत्त्वाचं काम केलं आहे. शिक्षणावरच्या या महत्त्वाच्या कृतीचं सगळ्या प्रादेशिक भाषांमध्ये भाषांतर व्हावं, हीच माझी इच्छा आहे.

**अरविंद गुप्ता**

*प्रा. कृष्ण कुमार* सध्या एनसीईआरटीचे संचालक आहेत. याआधी त्यांनी दिल्ली विद्यापीठात शिक्षणशास्त्राचे प्राध्यापक, सेन्ट्रल इन्स्टिट्यूट ऑफ एज्यूकेशनचे प्रमुख, यशपाल समितीचे सदस्य म्हणून काम केले आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाचे सन्माननीय व्याख्याते तसेच जवाहरलाल नेहरु फेलो म्हणूनही त्यांनी काम केले आहे. हिंदीतून त्यांनी कथालेखन, स्तंभलेखन केलेले आहे तसेच मुलांसाठीही लेखन केले आहे.

*राज, समाज और शिक्षा, विचार का डर, स्कूल की हिंदी, व्हॉट इज वर्थ टीचिंग, लर्निंग फ्रॉम कॉन्फ्लिक्ट, द चाईल्ड्स लँग्वेज अँड द टीचर, द सोशल कॅरेक्टर ऑफ लर्निंग, प्रेज्युडिस अँड प्राईडः स्कूल हिस्टरीज ऑफ फ्रीडम स्ट्रगल इन इंडिया अँड पाकिस्तान* आणि *पोलिटिकल अजेंडा ऑफ एज्यूकेशन* ही त्यांची प्रकाशित पुस्तके आहेत.

*गणेश विसपुते* हे मराठीतील तरूण कवी, भाषांतरकार आणि चित्रकार आहेत. समीक्षापर लेखन, कलासमीक्षा आणि चित्रपटविषयक लेखनही त्यांनी केलेले आहे. त्यांच्या कवितांची भाषांतरे इंग्रजी आणि हिंदीत प्रसिद्ध झाली आहेत. त्यांच्या पुस्तकांना अनेक पुरस्कार मिळालेले आहेत. कलकत्यासह काही ठिकाणी त्यांच्या चित्रांची प्रदर्शनं झालेली आहेत.

*सिनार*(१९८२), *धुवांधार गजबजलेल्या रस्त्याच्या मधोमध*(१९९९) हे त्यांचे कवितासंग्रह आणि *निरीह्यात्रा*(१९९०) हा त्यांचा ललितलेखसंग्रह प्रकाशित झालेला आहे. प्रस्तुत पुस्तकाशिवाय त्यांनी *पिवळ्या धम्मक छत्रीतली मुलगी* या हिंदीतील प्रसिद्ध कवी-कथाकार उदयप्रकाश यांच्या लघुकादंबरीचेही भाषांतर केलेले आहे.

# लेखकाची भूमिका

साधारण तीन दशकांपूर्वी हे पुस्तक लिहिलं. यातले काही लेख साप्ताहिक *दिनमान*साठी १९७१ ते १९७५ या काळात लिहिले होते. *दिनमान* चे संपादक स्व. रघुवीर सहाय हिंदीला भारतीय भाषांच्या ऐक्यासाठीचं माध्यम मानायचे. आज ते हयात असते, तर या पुस्तकाच्या मराठी आवृत्तीच्या प्रकाशनाचा त्यांना मनापासून आनंद झाला असता. पण तीन दशकं उलटल्यावरही या पुस्तकाचं औचित्य टिकून राहणं, ही आनंदाची बाब आहे का काळजीची असंही त्यांनी कदाचित विचारलं असतं. माझ्या मते ही चिंतेची बाब आहे. शिक्षण व्यवस्थेतल्या ज्या परिवर्तनाच्या दिशांची या पुस्तकात चर्चा केली आहे ते परिवर्तन मधल्या काळात झालं असतं, तर हे पुस्तक निव्वळ ग्रंथालयात ठेवण्याइतपतच महत्त्वाचं राहिलं असतं. असं झालं नाही अन् त्याची कारणं ओळखणं अवघडही नाही. या पुस्तकाच्या शीर्षकातून हे स्पष्ट होतं, की शिक्षण व्यवस्थेचा राज्यसंस्था आणि समाजाची संरचना तसंच सामाजिक वास्तवाशी असलेला संबंध यात अभ्यासला आहे. सामाजिक वास्तवापासून शैक्षणिक नियोजनाच्या दिशेची नेहमीच फारकत होत आली आहे. निर्णय प्रक्रियेत झालेल्या सुधारणा नगण्य होत्या आणि त्यामुळे शिक्षण व्यवस्थेत सतत अंतर्विरोध राहत आले आहेत.

माझे जुने मित्र अरविंद गुप्तांना या पुस्तकाचं मराठीत भाषांतर व्हावं, असं मनापासून वाटत होतं. त्यांना सुरुवातीपासून हे पुस्तक आवडलेलं आहे आणि सर्वसामान्य प्रकाशक, विक्रेते जाणार नाहीत, अशा ठिकाणी त्यांनी हे पुस्तक पोहोचवलं आहे. या पुस्तकात असलेला विचार एका मोठ्या सांस्कृतिक संघर्षातून आलेला आहे. त्यात आम्हा दोघांप्रमाणेच असंख्य इतर लोक आहेत. मराठी आवृत्तीमुळे हा संघर्ष पुढे चालू राहील याची मला खात्री आहे.

**कृष्ण कुमार**

# भाषांतरकर्त्याचे मनोगत

ललितेतर पुस्तकाचं भाषांतर मी याआधी कधी केलं नव्हतं. भाषा, शिक्षण, मुलांची वाढ, बालसाहित्य हेही माझ्या जिव्हाळ्याचे विषय असल्याने त्या संबंधातही मी मिळेल ते वाचत असतो. कृष्ण कुमारांचं *राज, शिक्षा और समाज* हे पुस्तक काही वर्षांपूर्वी माझे स्नेही अरविंद गुप्तांनी मला वाचायला दिलं अन् त्याचं भाषांतर करण्याची सूचना केली. आधी फक्त वाचून पाहायचं ठरवलं होतं. वाचून झाल्यावर मात्र त्यांची सूचना मनोमन स्वीकारावीशी वाटली.

शालेय वयोगटातली मुलं, त्यांचं मनोविश्व आणि शालेय वास्तव या आसाभोवती समाज, राजकारण, सत्ता, नोकरशाही, अर्थकारण, परंपरा, सांस्कृतिक (आणि कृतक सांस्कृतिक) वारसा, इतिहास, लोकशाही, दारिद्र्य आणि विषमता असे अनेक परस्परांत गुंतलेले पैलू या पुस्तकातून भिरभिरत समोर येतात. त्यातून दिसणारं कृष्ण कुमार यांचं आपल्या देशातल्या शैक्षणिक व्यवस्थेबरोबरच या विविध पैलूंबद्दलचं आश्चर्यकारक प्रखर भान आपल्याला चकित करतं. समकालीन जागतिक संदर्भात ते या व्यवस्थेची रूपं आपल्यासमोर ठेवून आपल्याला खडबडून जागं करतात. हे करताना मात्र कुठेही अकादमिक चमकदारपणा नाही तर त्यामागची त्यांची भारतीय शालेय शिक्षणाबद्दलची अपार तळमळ आणि आस्थाच आपल्याला जाणवत राहते.

या पुस्तकातून येणारं भारतीय प्राथमिक शिक्षणाचं वास्तव पंचवीस-तीस वर्षांपूर्वीचं आहे. ते चोख रीतीनं मांडताना आघात करणाऱ्या आकडेवाऱ्या येतात. वाचताना जाणवत राहातं की या परिस्थितीत आज काही फरक पडला आहे का? त्याचं उत्तरही आपण स्वत:ला मनोमन देऊन टाकलेलं असतं. कारण आपण डोळस असू तर इलेक्ट्रॉनिक माध्यमं, वर्तमानपत्रं, आसपासचा परिसर, वेगवेगळ्या मार्गांनी आपल्यावर आदळत राहणारे तपशील यामुळे आजचं वास्तव टाळू म्हटलं तरी

दिसत राहतंच. कृष्ण कुमार म्हणतात तसं, हे पुस्तक केव्हाच बाद झालं असतं तर आपणा सगळ्यांसाठी ही आनंदाची बाब ठरली असती. पण त्याचं औचित्य आजही टिकून आहे कारण आजही वास्तव तेच आहे. प्राथमिक शिक्षण हा मूलभूत अधिकार आहे, हेच खुल्या मनानं स्वीकारलं गेलेलं नाही. शहरी मध्यम वर्गीयांच्या याबाबतच्या प्रतिक्रिया तर निव्वळ धक्कादायक आहेत.

शहरांचा अभ्यास करणाऱ्या विद्याशाखेत जसा त्याच शहरांचा अभ्यासक पुन्हा ५०-७५ वर्षांनी अभ्यास केला जातो, त्याचप्रमाणे हा विषयही नव्या संदर्भात पुन्हा पुन्हा अभ्यासाचं आवाहन करणारा आहे. साक्षरता, कुपोषण, मृत्यूदर, शाळांतून गळणाऱ्या मुलांचं प्रमाण, शिक्षकांचं डॉक्टर व इतर व्यावसायिकांच्या तुलनेत वेतन, शाळेत आवश्यक असलेल्या सोयी, शिक्षणाचा खर्च व इतर अनेक पैलूंच्या वर्तमान संदर्भात अभ्यासकांनी नव्यानं तपासणी करण्याची गरज आहे. लिंगभावविषयक दुजाभाव पाठ्यपुस्तकांतून अजूनही दिसतो. जाणून बुजून केल्या जाणाऱ्या या विषमतेतून विशिष्ट भूमिकांचे कठोर सरंजामी साचे तयार केले जातात. शिवाय पाठ्यपुस्तकातला इतिहास बदलणं, दिशाभूल करणारं प्रचारी साहित्य घुसवणं असेही प्रकार अलीकडे झालेले आहेत. त्यासंदर्भातही अशा अभ्यासातून वास्तव पुढे आणता येईल. नव्या शतकात कुशल, तंत्रज्ञानानं प्रशिक्षित असा नागरिक आवश्यक आहेच; पण मानवी मूल्यं, परंपरा आणि सामाजिक भान असलेला डोळस माणूसही या शिक्षणानं घडवावा असं स्वप्न या स्पर्धिष्णू व्यवस्थेत टिकवणं आवश्यक आहे.

हे भाषांतराचं काम माझ्यासाठी अजिबात सोपं नव्हतं. तीव्र आवेगानं कृष्ण कुमार आपला विचारव्यूह मांडतात तेव्हा त्यांची भाषा बहुपेडी आणि दाट होते. समाजशास्त्राचा मी किंचित विद्यार्थी असूनही प्रत्यक्ष भाषांतराच्या वेळी माझी चांगलीच दमछाक झाली. सुलभीकरणाच्या प्रयत्नात मूळ वैचारिक तीव्रता पातळ होऊ नये हे मात्र मी निश्चितच ठरवलं होतं.

अर्थात तरीही हा आनंददायकच अनुभव होता. यासाठी कारण झालेले अरविंद गुप्ता यांचे सगळ्यात आधी मी आभार मानतो. त्यांच्यामुळेच हे भाषांतराचं काम प्रत्यक्षात येऊ शकलं. माझी मैत्रीण शुभदा जोशी आणि नीलिमा सहस्रबुद्धे यांनी पहिला खर्डा काळजीपूर्वक वाचून साक्षेपानं काही सूचना केल्या. हेमंत कर्णिक यांनीही काही महत्त्वाच्या सूचना केल्या. या पुस्तकात आधीपासून रस दाखवून हे काम माझ्याकडून करवून घेणारे माझे ज्येष्ठ मित्र सतीश काळसेकर, जयप्रकाश सावंत, प्रा. नितीन रिंढे आणि शेवटी प्रकाश विश्वासराव या सगळ्यांचा मी मनापासून आभारी आहे.

**गणेश विसपुते**

## अनुक्रम

*शासनाद्वारे लोकशिक्षण ही आक्षेपार्ह बाब आहे. एका नियमाद्वारे प्राथमिक शाळांचा खर्च, शिक्षकांची योग्यता, विषय वगैरे निश्चित करणं किंवा शासनाच्या निरीक्षकांमार्फत या कायदेशीर बाबींच्या पूर्ततेची तपासणी करणं, हे एक वेळ समजू शकतं; पण शासनालाच जनतेचा शिक्षक बनवणं हे अगदीच वेगळं झालं. वस्तुतः शासन आणि चर्च या दोहोंच्या कोणत्याही प्रकारच्या प्रभावापासून शाळेला मुक्त ठेवलं पाहिजे.*

**कार्ल मार्क्स**
गोथा कार्यक्रमाचं विश्लेषण, १८७५.

# शासन, समाज आणि मुलं

लहान मुलांची वाढ आणि पालन-पोषण याबाबत समाज आणि सत्ताधारी सारखाच विचार करतात. सातत्यानं त्यांची भूमिका एकसारखीच होत चालली आहे. आपल्या समाजात आपलं जीवन कसं असावं, हे ठरविण्याचा अधिकार सामान्य लोकांच्या हातात नाही. कुठल्याही समाजात मुलांची वाढ आणि विकास हा त्या समाज जीवनाचा महत्त्वाचा भाग असतो. त्याबाबतीतल्या काही गोष्टी ठरविण्याचा अधिकार आजतरी पूर्णतः शाळेकडे गेला आहे. बरं या शाळा तरी स्वतंत्र आहेत का? तर नाही. या शाळा समाजाच्या शासक वर्गाचा प्रमुख घटक असलेल्या नोकरशाहीच्या नियंत्रणात आहेत. मुलांची खेळणी, खाणं-पिणं, त्यांची मासिकं-पुस्तकं यावर शहरी मध्यमवर्गीयांचा पगडा आहे. हा मध्यमवर्ग एकूण लोकसंख्येच्या केवळ पाच टक्के एवढा जेमतेम आहे. या पार्श्वभूमीवर शासन, समाज आणि मुलांचं नातं कसं आहे, या प्रश्नाच्या वेगवेगळ्या पैलूंचा धांडोळा घेण्याचा प्रयत्न या पुस्तकात केला आहे.

राजकारण आपल्या मुलांची आयुष्यं नियंत्रित करीत असतं हे फारच थोड्या लोकांना पटू शकेल. बरेचसे आई-वडील मुलांबद्दल विचार करताना कुटुंबाच्या पलीकडे जात नाहीत. कुटुंबाला ते जणू एका राज्यनिरपेक्ष, राजकारणनिरपेक्ष घटकाच्या रूपात पाहतात आणि राजसत्तेला कुटुंबनिरपेक्ष घटकाच्या रूपात. याच दृष्टिकोनामुळे कुटुंब हा राज्यसत्तेसाठी अत्यंत सोयीचा असा घटक झाला आहे. कुटुंब एकीकडे व्यक्तीच्या आव्हानांना समजून घेत असतं तर दुसरीकडे शासनव्यवस्थेला त्याच्या सोयीच्या एका परिघात काम करण्याची मोकळीक देत असतं. लोक असं समजतात, की वृद्ध आणि बालकांच्या देखभालीची, सांभाळण्याची जबाबदारी कुटुंबाची आहे आणि परराष्ट्र व्यवहार, आयात-निर्यात, आर्थिक धोरणं यासारख्या 'मोठ्या' कामांची

जबाबदारी सरकारची आहे. अशा 'श्रमविभागणी'च्या भ्रामक समजुतीमुळे प्रौढांना त्यांची मुलं आणि ते स्वत:ही राजसत्तेच्या नियंत्रणाखाली आहेत, याचं भान येत नाही.

मुलांच्या संदर्भात कुटुंबाची चर्चा जपूनच करायला हवी. मुलांच्या संगोपनाबाबत, त्यांच्या वाढीच्या काळात त्यांच्या आसपासच्या वातावरणातील सामाजिक घटना, प्रसंग हे त्यांचं अनुभवविश्व आणि दृष्टी विस्तारत असतात. आई-वडिलांसह इतर सर्वच लोकांच्या काम करण्याच्या पद्धतीचा, वागण्याचा संस्कार मुलांवर होत असतो. या सगळ्याचं निरीक्षण हा त्यांच्यासाठी सामाजिक अनुभव असतो. आपल्या आई-वडिलांशी जवळीक हा मुलांच्या प्राथमिक अनुभवांपैकी एक अनुभव असतो. बाळाचा पाळणा, पाळण्याचा रंग, खोलीच्या भिंती अशा वस्तूंचं निरीक्षण करणं, हाही त्यांच्या अनुभवविश्वाचा भाग असतो. अर्थात ते बाळ उघड्यावर जन्माला आलेलं नसून बंद खोलीत जन्माला येण्याचं भाग्य त्याच्या वाट्याला आलंय, असं गृहीत धरून आपण विचार करीत आहोत. घर, घराच्या भिंती, बिछाना, रंग, कपडे, खेळणी या सगळ्या सामाजिक वस्तू आहेत. खास बाळासाठी या वस्तू आई-वडील आपापल्या आर्थिक कुवतीनुसार गोळा करतात. म्हणजेच त्यांच्या वर्गीय स्थानानुसार बाळाचं संगोपन एका वेगळ्याच स्वतंत्र जगात म्हणजे आई-वडील आणि बाळ अशा तिघांच्याच जगात करता येत नाही. मुलं घराच्या आसपासच्या समाजातील अनेक घटकांच्या संपर्कात येत असतात. त्या प्रत्येक घटकाविषयी मुलं सजग असतात. हळूहळू या सर्व घटकांशी मुलांचे संवेदनक्षम संबंध प्रस्थापित होतात. त्यांचं जग असं विस्तारताना त्यातील जमतील तेवढी आर्थिक बंधनं झुगारण्याचा मुलांचा नैसर्गिक प्रयत्न असतो. परंतु शेवटी मुलं आपल्या आई-वडिलांच्या आणि शाळेच्या वर्ग-संस्कारांच्या प्रभावाखाली येतात आणि त्यातून त्यांना एक वर्गीय व्यक्तिमत्व प्राप्त होतं. मुलांच्या वाढीवर परिणाम करणाऱ्या सामाजिक, राजकीय आणि आर्थिक शक्ती एकाचवेळी सक्रिय असतात. त्यामुळे केवळ कुटुंबाच्या संदर्भात मुलांच्या जीवनाचा विचार आणि अभ्यास करणं संकुचितपणाचं ठरेल. स्वतंत्र भारतात या तीनही शक्तींचा मुलांच्या आयुष्यावर प्रभाव पडतो. गरिबी, कुपोषण आणि सांस्कृतिक परिवर्तन या तीन बाबतींत त्यांचा सर्वाधिक परिणाम होतो.

भारतीय खेड्याच्या आधुनिक शोषणाचा इतिहास कमीतकमी दोनशे वर्षं जुना आहे. अठराव्या शतकात ईस्ट इंडिया कंपनीनं केलेली लूट आणि एकोणिसाव्या शतकात सुनियोजित भांडवलशाही पद्धतीनं सुरू झालेलं शोषण, या दोन्हींमुळे इंग्लंड एक विकसित राष्ट्र बनलं. भारतीय ग्रामीण व्यवस्थेच्या हिंसक विनाशाचे हे दोन अध्याय आहेत. याचं सम्यक विश्लेषण रजनी पामदत्तांनी केलं आहे. खेड्यांचं शोषण स्वतंत्र भारतात तर सातत्यानं सुरू आहे. गावातले श्रम आणि उत्पादन हे महानगरं आणि मोठ्या शहरातील सेवांसाठी वापरले जात आहेत. त्या बदल्यात महानगरात तयार होणाऱ्या काही वस्तू गावांना मिळतात. या वस्तू वापरण्याची सवय महानगरांनीच गावांना लावली आहे. खेड्यातील अधिकांश लोकसंख्या भूमिहीन मजूर आणि लहान शेतकऱ्यांची आहे. काबाडकष्ट करूनही ते आपल्या मूलभूत गरजा पूर्ण करू शकत नाहीत. कारण महानगरातील बूर्झ्वा आणि मध्यमवर्गाच्या हितासाठीच असलेली अर्थव्यवस्था खेड्यातील गरीब वर्गाची क्रयशक्ती वाढू देत नाही. शहरातल्या लोकांच्या जीवनावश्यक गरजा स्वस्तात पूर्ण करण्यासाठी ग्रामीण भागातील लोक प्रचंड कष्ट करतात. याउलट शहरात यंत्राद्वारे तयार होणाऱ्या ज्या वस्तूंचा संबंध मूलभूत गरजांशी नव्हे तर केवळ सोयी सुविधांशी आहे, त्या गावांना महागड्या किमतीत मिळत आहेत. याप्रकारे खेड्याचे सतत शोषण होत आहे. खेड्यांना स्वयंपूर्ण बनविण्याचं गांधीजींचं स्वप्न होतं. भांडवलशाही औद्योगिक व्यवस्थेनं ते उद्ध्वस्त केलं आहे.

आधुनिक भारताच्या गावातील आर्थिक व राजकीय शोषणाच्या पार्श्वभूमीवर बालपणाचा झालेला संकोच नीट समजून घेता येईल. दारिद्र्य आणि शोषणाचा प्रौढांच्या आणि मुलांच्या संदर्भात वेगवेगळा अर्थ आहे, असं म्हणणं कदाचित विचित्र वाटू शकेल. भारतातील बहुसंख्य नागरिकांना प्रौढ आयुष्यात दारिद्र्यानं विवशतेत जगायला भाग पाडलं आहे. दारिद्र्यानं मुलांना तर अतिशयच असहाय्य बनवलं आहे. म्हणजे त्यांच्या 'बालपणा'चा अर्थच बदलून टाकला आहे.

वेगवेगळ्या काळात जगातल्या विविध समाजांत उत्स्फूर्तपणा, चपळपणा, समज आणि सहज अभिव्यक्ती, एकाग्रता हे गुण नेहमीच बालपणाची वैशिष्ट्यं म्हणून ओळखली जातात. कुपोषित किंवा आजारलेल्या बालकांमध्ये हे गुण एकतर संपून जातात किंवा अगदीच क्षीण स्वरूपात उरतात. भारतातलं गरीब मूल सामान्य लहान माणूस होऊन जातं. त्याचं बालपण (अनेक मुलांचं तर संपूर्ण आयुष्यच एवढं असतं!) उपासमारी, आजारपण आणि कुपोषणामुळे नष्ट केलं जातं. दरवर्षी देशातल्या एकूण मृत्यूंपैकी जवळपास निम्मे मृत्यू पाच वर्षांपेक्षा लहान बालकांचे असतात. जी बालकं मृत्यूच्या सपाट्यात सापडत नाहीत, त्यातील बहुतांश मुलं कुपोषणामुळे शारीरिक किंवा मानसिक व्याधींनी ग्रस्त होतात.

मुलांच्या कुपोषणाबाबत आंतरराष्ट्रीय राजकारणाची काय भूमिका आहे? मागील दोन दशकांमध्ये आंतरराष्ट्रीय आहार आणि खाद्यसामुग्रीला महत्वाचं स्थान मिळालं आहे. श्रीमंत राष्ट्रं, विशेषतः अमेरिका, भारतासारख्या निर्धन राष्ट्रांच्या खाद्यान्नांसंबंधित गरजांचा फायदा उपटत आहेत. भारताच्या स्वायत्ततेवरच घाला घातला जात आहे. पश्चिमेच्या मदतीमुळेच शक्य झालेल्या हरितक्रांतीनं धान्याचं उत्पादन नक्कीच वाढविलं. परंतु कृषिसाधनांच्या बाबतीत आपलं पश्चिमेवरील अवलंबनही वाढवलं. कृषिसाधनांच्या किंमती वाढल्यानं खेड्यातील निर्धन वर्गावरचा दबावही वाढला. दुधासारख्या पोषक पदार्थांना खेड्यातून ओढून शहराकडे नेणाऱ्या आणि खेड्यातील सामान्य जनतेला कृत्रिम खाद्यसामग्री आणि औषधांच्या पकडीत आणणाऱ्या प्रक्रिया हरितक्रांतीतूनच जन्माला आल्या आहेत. भारतीय जेवणात प्रथिनांचा महत्त्वाचा स्रोत असलेल्या डाळींचं प्रमाण घटलं आहे. बाजारातील अनेक वस्तूंचा प्रसार आपल्याला हेच दाखवून देतो आहे की, निर्धन ग्रामीण जनतेची मर्यादित क्रयशक्ती कुटुंबाला पोषक भोजन मिळवून देण्याऐवजी बिनगरजेच्या वस्तूंकडे वळवते आहे. हरित आणि श्वेतक्रांतीनंतरही देशभरात वाढलेला बालमृत्यू दर कमी होत नाही, असं दिसतं. तिसऱ्या जगातील खाद्यसंस्कृतीचं विकृतीकरण करून त्यांना पश्चिमेच्या अर्थव्यवस्थेवरील अवलंबन स्वीकारायला लावणं, हाच गेली दोन-तीन दशकं पाश्चिमात्य खाद्य-नीतीचा उद्देश आहे. हरितक्रांतीनं भारताला या प्रवृत्तीकडे वळवलं. मात्र यामुळे गव्हाचं उत्पादन निश्चितपणे वाढलं. बालकांच्या आहाराच्या संदर्भात तरी किमान जागतिक आरोग्य संघटना आता हे म्हणायला लागली आहे, की तिसऱ्या जगातील राष्ट्रांमध्ये आईच्या दुधाऐवजी कृत्रिम दूध वा अन्य पदार्थांच्या प्रचाराचे व्यापक दुष्परिणाम दिसले आहेत. भारतासहित इतर अनेक देशांत प्रथिनयुक्त कृत्रिम आहाराच्या प्रचाराची पार्श्वभूमीही राजकीय आहे, हे तर सगळ्यांना माहीत आहे. भरपूर प्रथिनांश असणाऱ्या डाळी आणि इतर धान्यांचा भारतात मोठ्या प्रमाणावर वापर होतो. पण अलीकडील पाहणीत एक धक्कादायक वास्तव समोर आलेलं आहे. ते म्हणजे भारतात डाळींचा पुरवठा कमी झाला असून प्रथिनयुक्त कृत्रिम खाद्य आणि पोषक म्हणविल्या जाणाऱ्या औषधांचा पुरवठा वाढला आहे. डॉ. सी. गोपालन यांच्यासारख्या आहारतज्ज्ञांच्या म्हणण्यानुसार भारतातील कुपोषणाचे कारण प्रथिनांचा अभाव हे नसून खनिज, व्हिटॅमिन आणि कॅलरीयुक्त आहाराचा अभाव हे आहे. परंतु आपले पोषणविषयक कार्यक्रम मात्र आजही प्रथिनयुक्त आहारातच रस घेत आहेत. डॉ. गोपालन यांच्या मते या कार्यक्रमांचा उद्देश जीवनक्षमता वाढवणं हा नसून मृत्यूची शक्यता कमी करणं, हा आहे. अलीकडच्या काळातील विकास प्रक्रियेनं आणखी एका प्रकारे ग्रामीण भागातील मुलांवर परिणाम केला आहे. मोठ्या प्रमाणावर गावं सोडून शहराकडे कामाच्या शोधात जाणाऱ्या प्रौढांची संख्या गेल्या काही दशकांत सतत वाढते आहे. आधुनिक पद्धतीच्या प्रसाराबरोबरचं शेती करणं महागडं होत आहे. मोठ्या शेतकऱ्यांची क्षमता आणि फायदा वाढला आहे. वाढलेल्या खर्चाला तोंड देताना लहान शेतकरी मात्र गलितगात्र होतो आहे. एक नव्या प्रकारची जमीनदारी यातून निर्माण झाली असून त्यामुळे ग्रामीण भागातील बेरोजगारीत व्यापक प्रमाणात वाढ झाली आहे. जेमतेम कसब-कौशल्य असणाऱ्या ग्रामीण प्रौढास गाव सोडण्यावाचून उपाय नाही. शेपन्नास मैल तर काहीच नाही, हजारभर मैल स्थलांतरं करून अनेक ग्रामीण लोक शहरांमध्ये काम करीत आहेत. यामुळे ग्रामीण कुटुंब विघटित झालं आहे. मुलांचा पित्याशी संबंध तुटत चालला आहे. मुलं वडिलांच्या रूपानं इतर प्रौढांपर्यंत पोहचू शकतात आणि मुलांच्या सामाजिक शिक्षणासाठी हे आवश्यक असतं. पण तेच कमी झालं आहे. गावांमध्ये मुलांच्या सामाजिक शिक्षणाच्या ज्या परंपरागत शक्यता होत्या, त्या संपत चालल्या आहेत. क्रमिक पुस्तकं म्हणजेच शिक्षण असे मानणारी आधुनिक शाळा याबद्दल संपूर्णपणे तटस्थता बाळगून आहे.

खेड्यातील शाळांची अवस्था अत्यंत बिकट आहे. तिथं जाऊन शिकणं, शिकण्यातला आनंद घेणं ही तर लांबची गोष्ट आहे. पण तिथं जाणं आणि थांबणं हीच मोठ्या धाडसाची बाब आहे. या शाळांमधून ना खेळांचं साहित्य आहे ना वाचनालय. पक्की इमारत, पिण्याचं स्वच्छ पाणी आणि बसण्याची नीट जागाही असणं मुश्कील आहे. चौथ्या अखिल भारतीय शालेय सर्वेक्षणानुसार देशातल्या ५०% शाळांमध्ये पिण्याचं पाणी नव्हतं, खेळण्याची पुरेशी जागा किंवा पक्की इमारत नव्हती. ४०% शाळांमध्ये फळेही नव्हते. ७०% शाळांमध्ये ग्रंथालयं, ८५% शाळांमध्ये मुताऱ्या नव्हत्या. शहरांमधील आणि लहान गावांतील प्राथमिक शाळांची अवस्था वाईट आहे. पण ग्रामीण भागातली अवस्था तर त्याहूनही वाईट आहे. शाळांची ही परिस्थिती आणि खेड्यातील मुलांवर पडणारा आर्थिक ताण, हे लक्षात घेतलं तर देशातील प्राथमिक शिक्षणाचं धोरण का फसलं, हे सहज कळू शकेल. पहिल्या इयत्तेतील १०० मुलांपैकी केवळ ३८ मुलं पाचवीपर्यंत जाऊ शकतात. बाकीच्यांना शिक्षण सोडावंच लागतं. यातली बरीचशी मुलं आपल्या आई-वडिलांच्या कामाचा भार उचलू लागतात तर काही स्वतःच रोजगार शोधू लागतात. जिथं मोठ्या प्रमाणात बालकामगार नाहीत असं एकही औद्योगिक शहर आपल्या देशात नाही. फिरोजाबादचा काचेचा व्यवसाय असो, की शिवकाशीचा आगपेट्या-

फटाक्यांचा व्यवसाय किंवा कोणत्याही गावातला बाजार, या प्रत्येक ठिकाणी मजुरी करणारी मुलं आहेतच. यातला खरा आकडा बाहेर येत नाही. पण वर्षागणीक बालकामगारांची संख्या कमी न होता वाढतच आहे.

बालपणाचं स्वरूप बदलणाऱ्या आर्थिक प्रक्रियांच्या वर्तुळातच ही कारणं शोधता येतील. त्यांचा संबंध ज्ञान व मनोरंजनाच्या स्रोतांशी आहे. मनोरंजन ही मुलांच्या जगण्याची निव्वळ आवश्यकताच नाही, तर त्यांच्या जगण्याचं ते महत्त्वाचे अंगही आहे. त्यांचे खेळ, थोडं मोठं झाल्यावर शिकणं-अभ्यास आणि सगळ्याच प्रकारची सर्जनात्मक कामं त्यांच्यासाठी मनोरंजनाची साधनंच असतात. अर्थात ही कामं कुठल्याही दाब-दडपणाखाली केली गेलेली नसावीत. परंतु समकालीन समाजातील बालपणाचं वर्णन करायचं झाल्यास 'दडपण' हाच जास्त उपयुक्त शब्द आहे असं वाटतं. लिहिणं-वाचणं-जेवणं करण्यापासून कपडे घालण्यापर्यंत मुलं अनेक प्रकारची दडपणं सहन करीत असतात. आई-वडिलांच्या मध्यमवर्गीय मानसिकतेतून आलेली व शाळेतील ही दडपणं मुलांचं जगणं अवघड बनवत असतात. मुलं मोकळेपणी खेळू शकतील किंवा आपल्या आवडीची कामे करू शकतील, असे क्षण त्यांच्या आयुष्यात दुर्मीळच बनले आहेत. शाळेतली पुस्तकं एवढी वाढली आहेत, की आता ते ओझं केवळ मोठाल्या दप्तरातच केवळ मावू शकतं. शाळा जेवढी श्रीमंत आणि व्यवस्थित तेवढं गृहपाठाचं ओझं अधिक आहे. मुलांनी अधिकाधिक अडकून राहण्यात आई-बापांना आपलं हित दिसत आहे. मोकळी राहून मुलं तोडफोडीशिवायही काही वेगळं करू शकतात हा त्यांना विश्वासच नसतो . गेल्या तीन चार दशकांमधील प्रसार माध्यमांचं स्वरूप आपल्याला मुलांच्या जीवनाच्या संस्कृतीचा अभ्यास करण्यासाठी एक महत्त्वपूर्ण साधन आहे. या काळात सिनेमाचा आपल्या सांस्कृतिक जीवनावर खूप प्रभाव पडलेला आहे. सिनेमानं साक्षरता आणि आर्थिक परिस्थितीच्या सीमा सहजतेनं ओलांडल्या आहेत. पण शेवटी या विकासाचं स्वरूप काय आहे? नागरी मध्यमवर्गासाठी हे प्रसारमाध्यम अत्यंत प्रभावशाली असं सिद्ध झालं आहे. मध्यमवर्गीय जगण्यातल्या रूढिप्रियता, अनुकरणप्रियता, स्पर्धा आणि हिंसा या गोष्टीच बॉलिवूड सिनेमात आपल्याला उमटलेल्या दिसतात. आपल्या शासक वर्गाला टिकवून ठेवणारी हीच ती मूल्यं आहेत. आजचं शिक्षणही याच मूल्यांचा प्रसार करीत आहे. देशाच्या इतिहासात दोन महत्त्वाच्या घटना म्हणजे सामाजिक जाणिवांचं हद्दपार होणं आणि भांडवलदारी संस्कृतीचा जन्म, यांचा बॉलिवूड सिनेमा हा विश्वासार्ह पुरावा आहे. या दोन घटनांनी समाजात आर्थिक विषमता आणि हिंसेला नवे आधार मिळवून दिले आहेत. याचा व्यापक आधार आपल्या समाजात जातींच्या रूपाने आधीपासून आहेच. लोकप्रिय चित्रपटानं सशक्त माध्यमाच्या रूपात एक हिंसक आणि परंपरांना पोषक अशी संस्कृती टिकवून ठेवायला हातभार लावला आहे.

रेडिओ आणि टेलिव्हिजनचा विकास तर शासनाच्या एकाधिकारात झाला आणि ही दोन माध्यमं आपल्या वसाहतवादी मानसिकता असलेल्या नोकरशाहीच्या सरळ-सरळ हातात आली. या दोन्ही माध्यमांचा उपयोग नोकरशाहीने आपल्या वसाहतवादी भूमिकेच्या प्रचारासाठी केला. नोकरशाही आपल्या प्रचाराचं लक्ष्य प्रौढांबरोबर मुलांनाही मानत असल्यानं रेडिओ-टी.व्ही. वरचे कार्यक्रम शिक्षणाच्या जुनाट शैलीनेच युक्त असतात. टी.व्ही.चा उपयोगच सांगायचा झाला तर तूर्तास स्वस्तात उपलब्ध असणारे बॉलिवूड चित्रपट घरात दाखविण्यापुरताच उरला आहे. व्हिडिओ चंगळवादी संस्कृतीची सशक्त साधनं बनली असून नावापुरताच त्याचा शिक्षणाशी संबंध आहे. आधुनिक प्रसार माध्यमांच्या विकासाबरोबर भारतीय समाजजीवनातील मुलांना आकर्षित करणारी पारंपरिक माध्यमं हळूहळू नष्ट होत गेली. कठपुतळी, जादू, मदाऱ्याचे खेळ, सर्कस आणि लोकनाट्याचे सर्व प्रकार आर्थिक ओढगस्तीमुळे नव्या प्रसारमाध्यमांच्या स्पर्धेत टिकाव धरू शकले नाहीत. हे कलाप्रकार आता सरकारी कलाविभाग आणि पुरोगामी कलाकारांनी चालवलेल्या पुनरुज्जीवनाच्या प्रयत्नांपुरते उरले आहेत. सिनेमा, रेडिओ आणि दूरदर्शनच्या उदयानंतर देशातील पारंपरिक कलाप्रकारांचा ऱ्हास होण्याचं आणखी एक कारण म्हणजे देशातील अनेक क्षेत्रात सुरू झालेल्या आर्थिक आणि राजकीय प्रक्रिया. मध्यमवर्गाचे हितसंबंध जपण्यासाठी सत्ताधारी वर्गातर्फे राबविण्यात येणाऱ्या धोरणामध्ये तंत्रज्ञानाचा वापर करण्यासाठी देशातील कष्टकरी वर्गातील कलाप्रकारांचं, कलामाध्यमांचं उच्चाटन करणं आवश्यक बनलं आहे.

या शतकाच्या सुरुवातीला हिंदी बालसाहित्यात उत्साहाची एक जोरदार लाट आली होती. ती आता ओसरली आहे. कोणत्याही काळात उपयुक्त होईल, अशी बालसाहित्याची संपादित ग्रंथमाला आपल्याकडे अजून नाही. समकालीन बालसाहित्यातही कोणत्याही नव्या दिशा किंवा गुणात्मक विकासाची लक्षणं दिसत नाहीत. *बालसखा* आणि *वानर* यासारख्या समृद्ध मासिकांतील केवढं तरी असंपादित साहित्य असं पडून आहे. इंडियन प्रेस किंवा अशाच अनेक प्रकाशन संस्थांची गाजलेली पुस्तकं केवळ राष्ट्रीय पुस्तकालय किंवा अशाच कुठेतरी पाहण्यासाठी फक्त उरली आहेत. मुलांसाठी उपयुक्त अशा लोककथांच्या संग्रहाच्या दिशेनंही काही फारशी प्रगती झालेली दिसत नाही. बालवाङ्मयाचे नवे प्रकाशकही लेखकांचं

शोषण करण्यात इतर प्रकाशकांच्या तुलनेत मागे नाहीत. मुलांच्या पुस्तकावर रॉयल्टीची व्यवस्था खाजगी प्रकाशक तर सोडाच, *चिल्ड्रन्स बुक ट्रस्ट* सारखी कल्याणकारी संस्थाही करीत नाही. बालवाङ्मयाच्या नावावर अलीकडे पॉकेटबुक्स आणि कॉमिक्सचा धंदा मात्र जोरात चालला आहे. त्यातही मुद्रण, आशय आणि भाषेचे सर्व संकेत धाब्यावर बसवलेले आहेत. स्वस्त किंमतीत पुस्तकं उपलब्ध करण्याच्या दानशूर घोषणेत प्रत्यक्षात बालसाहित्याच्या पॉकेटबुक्सचे प्रकाशक मोठ्या प्रमाणावर निकृष्ट दर्जाचं साहित्य विकून पैसा कमावण्याच्या मागे आहेत. हिंदीमध्ये तर असे बरेच लेखक आहेत, जे कमीत कमी मानधनावर लिहायला तयार आहेत. रद्दी बालवाङ्मय तयार करण्यात ना त्यांना श्रम पडतात ना प्रकाशकांना. त्यात समीक्षेचंही भय नाही, कारण कोणतंही गंभीर नियतकालिक बालसाहित्याची नियमित समीक्षा करीत नाहीत.

बालवाङ्मयाच्या नियतकालिकांची स्थितीसुद्धा फारशी वेगळी नाही. वस्तुतः हा एक फार मोठा उद्योग झाला असून बराचसा आता उद्योगपतींच्या हातात आहे. मुलांसाठींची नियतकालिकं मुलांना समकालीन जगाच्या घडामोडींची जाणीव करून देत असत, ते दिवस आता उरले नाहीत. सध्या अनेक नियतकालिकं (ज्यात *'नंदन'* व *'चांदोबा'* प्रमुख आहेत) मुलांना हिंदू संस्कृतीच्या नावावर परंपरावादी रूढींच्या बाजूने वळविण्याचे काम करीत आहेत. लेखकाच्या परिश्रमाचे अवमूल्यन या नियतकालिकांनी पॉकेटबुक्सइतकेच केले आहे.

गांभीर्याने लिहिल्या जाणाऱ्या लेखन-प्रकाशनाच्या अवनतीची कारणं आर्थिक आणि सामाजिक आहेत. स्वातंत्र्यानंतर भारतात नोकरदार मध्यमवर्ग वेगाने वाढला आहे. बहुराष्ट्रीय कंपन्या आणि भारत सरकारच्या संरक्षणात विकसित झालेल्या भांडवली औद्योगिक विकासामधून सतत उपभोगाच्या वस्तूंचंच मोठ्या प्रमाणात उत्पादन करण्यात आलेलं आहे. या वस्तू विकत घेऊ शकणारा मध्यम वर्गाचा वरचा स्तर शिक्षित समाजाचा आदर्श बनला आहे. इतर लाखो लोक, ज्यांची वस्तुतः भोगवादी खरेदीची ऐपत नाही, ते कोणत्या ना कोणत्या प्रकारे अशा खरेदीची धडपड करत आहेत. मुलांसाठी पुस्तकं विकत घेऊ शकणारेसुद्धा हेच लोक आहेत. झालं आहे ते हे की, यांच्या विकत घेण्याच्या क्षमतेचा लाभ पुस्तकांना मिळताना दिसत नाही. या वर्गाच्या खाली लागून असलेला जो विशाल निम्नस्तर आहे त्या स्तरापर्यंत पोहोचण्यासाठी कोणत्याही हिंदी प्रकाशनानं प्रयत्न केलेले नाहीत. बालसाक्षरतेत झालेला वाढीचा फायदा घेऊन पुस्तकांच्या संख्येत वाढ करून, निर्मितीखर्च कमी करून स्वस्त किंमतीत पुस्तकं छापण्याची योजना बालसाहित्य छापणाऱ्या कोणत्याही प्रकाशकाला सुचलेली नाही.

ज्ञानाच्या स्रोताच्या रूपात शिक्षणाचा आर्थिक संदर्भ आणि प्रसारमाध्यमं आणि बालसाहित्य यांचा आर्थिक संदर्भ एकच आहे. धोरण, कार्यक्रम आणि अंमलबजावणीच्या पातळीवर शिक्षणावर शासकवर्गाचं नियंत्रण आहे. शासकवर्गानं शिक्षणाला वसाहतवादी संस्कृतीच्या प्रचाराचं माध्यम बनवलं आहे. या प्रक्रियेतील अनेक उदाहरणं या पुस्तकात दिली आहेत. दोन उदाहरणं मला नमूद करावीशी वाटतात: एक म्हणजे साक्षरता आणि शिक्षणामधल्या फरकाचा लोप आणि सामाजिक जीवनातील स्वयंशिस्तीचं झालेलं सैनिकीकरण.

वस्तुतः साक्षरतेचा संबंध केवळ प्रचार साहित्याशी आहे. जी लिहिण्यावाचण्याची क्षमता उपजीविकेच्या कामाशी जोडलेली नाही, ती व्यक्तीला प्रचार वाङ्मयाकडेच नेणार. हे प्रचारवाङ्मय क्रांतिकारक असू शकेल किंवा शोषकही! जिथं क्रांती झालेली आहे, त्या जगातल्या अनेक समाजात साक्षरतेची भूमिका महत्त्वाची होती. पूर्वी भारतासारख्या ज्या वसाहती होत्या, अशा देशांमध्ये साक्षरता क्रांतिकारी आंदोलनांद्वारे नव्हे, तर सरकारी प्रचारतंत्राच्या माध्यमाद्वारे एक राष्ट्रीय उद्देश म्हणून आणली जात आहे आणि त्यात साक्षरतेची शोषक भूमिका स्पष्ट आहे. अशा समाजात साक्षरता शिक्षणाचा पर्याय नव्हे, तर एक कसब बनतं. कारण साक्षर व्यक्तीला ती अस्तित्वाचा बोध करून देऊ शकत नाही. वस्तू आणि कामांशी व्यक्तीचं नातं समजावून देण्याची शक्ती भाषेच्या विकासात असते. हे रूप सध्याच्या साक्षरतेच्या भूमिकेत समाविष्ट नाही. साक्षर व्यक्ती अभ्यासानं शब्दांची संरचना करू शकते. परंतु समाजाच्या संरचनेशी शब्द कोणत्या प्रकारे जोडलेले आहेत, हे समजू शकत नाही. हे समजण्यासाठी साक्षरतेचा वैचारिक कार्यक्रम आवश्यक आहे. याचं पाव्लो फ्रेरी यांनी सविस्तर विश्लेषण केलं आहे. त्यांनी सांगितलेल्या शिक्षणपद्धतीत शब्द केवळ लिपीज्ञान देण्यासाठी शिकविले जात नाहीत, तर विद्यार्थ्याला आजूबाजूच्या परिस्थितीकडे चिकित्सक दृष्टीने बघायला शिकविण्याचं हत्यार बनून येतात. फ्रेरी यांच्या या पद्धतीचा प्रयोग वसाहतवादी रचनेत कसा होऊ शकेल, हा वादाचा मुद्दा आहे. कारण स्वतः फ्रेरी यांना त्यांच्या कामामुळं ब्राझीलमधून हाकलून देण्यात आलं. निव्वळ शब्दाच्या पलीकडे परिस्थितीची जाणीव करून देणारी साक्षरता खऱ्या अर्थानं शिक्षण बनते. याउलट शिक्षण हे जगण्यापासून आणि समाजापासून फारकत घेतं, तेव्हा ते केवळ साक्षरता म्हणूनच उरतं. इंग्लंड किंवा इतर युरोपीय देशांच्या वसाहती असलेल्या आणि आता नववसाहतवादी आंतरराष्ट्रीय संबंध जपणाऱ्या देशांमध्ये (भारतासह) विसाव्या शतकात शिक्षणाचं अशा प्रकारचं

अवमूल्यन झालेलं आहे. भारतात मुलांचं शिक्षण वस्तुत: साक्षरतेहून वेगळं नाही. कारण मुलांना समाजाच्या सांस्कृतिक जाणिवेशी जोडण्याऐवजी तिच्यापासून अनभिज्ञ ठेवण्याचं शिक्षण येथे साधनच बनलं आहे. बालपण हे जगण्याचा एक भाग न बनता जगण्याचा एक केवळ टप्पा बनतं. त्या टप्प्यावर जगण्यासाठीची फक्त तयारी केली जाते, जगायला नाही मिळत. शाळेच्या चार भिंती केवळ सुरक्षेचं साधन नव्हे, तर बालपण आणि सामाजिक जीवनातील अडसर बनल्या आहेत. चार भिंतींमध्ये मुलांना दैनंदिन जगण्याशी संबंध नसलेली माहिती दिली जाते. म्हणायला शाळा मुलांच्या भाषेचा विकास करते. परंतु भाषा तर जीवनाच्या सतत अनुभवातून अर्थ मिळवत असते. भारतातल्या शाळांवर पाठ्यपुस्तकांचं एवढं कडक नियंत्रण आहे, की शाळेबाहेरच्या समाजातली जिवंत भाषा वर्गात प्रवेश करू शकत नाही. गेल्या दोन दशकांपासून आपली पाठ्यपुस्तकं केंद्रीकरण होत गेलेल्या व्यवस्थेमध्ये तयार होत आहेत आणि ती शाळेला तिच्या भोवतालापासून वेगळं पाडण्याचं साधन होत आहेत. पाठ्यपुस्तकात दिलेल्या ज्ञानाचा स्रोत मुलांच्या भौगोलिक आणि सामाजिक संदर्भात नव्हे, तर राज्याच्या किंवा देशाच्या राजधानीत आहे. आपल्या आजूबाजूच्या वास्तवाशी आपलं नातं समजू न शकणारी व्यक्ती हळूहळू परकी होत जाते आणि आपल्या परकेपणाचा स्रोत न कळल्याने शेवटी एखाद्या व्यापक, अज्ञात शक्तीच्या हाती स्वत:ला सोपवून मोकळी होते. संस्कृती-विकासाच्या एका टप्प्यावर अशी शक्ती म्हणजे अध्यात्म असू शकतं. आज ती शक्ती म्हणजे सदैव राजकीय सत्ताच आहे.

यामुळे शाळा आणि समाज यांना वेगळं करणाऱ्या धोरणाकडे आपण अनवधानाने झालेली चूक किंवा अपघात म्हणून पाहिलं, तर तो आपला दृष्टिदोष ठरेल. 'शाळा' एक जुनी संस्था आहे आणि कधी नव्हे इतक्या हुशारीनं ती आज प्रस्थापित व्यवस्थेच्या पकडीत आहे. या नियंत्रणाची क्षेत्रं आणि रूपं अनेक आहेत. शिक्षकांच्या नेमणुका आणि त्यांच्या सेवाशर्तींपासून पाठ्यपुस्तकांचे लेखन आणि घंटेबरहुकूम मुलांच्या दिनचर्येच्या परिचालनापर्यंत शाळेवरच्या या नियंत्रणाची व्याप्ती आहे. अशा प्रकारच्या नियंत्रणांचा एकत्रित असा परिणाम मुलांच्या व्यक्तिमत्त्वावर पडतो.

घंटा वाजल्यावर मुलं आनंदाने पळत जात नाहीत, अशी शाळा मला अजूनही दिसलेली नाही. मोठी मुलं दंगा कमी करतात, लहान मुलं जास्त दंगा करतात, हे मी पाहिलेलं आहे. नोकरशाहीतला एखादा शिक्षणतज्ज्ञ हेही म्हणू शकेल, की वय वाढतं तसं मुलांचं सामाजिकीकरणही होत असतं. यामागे एक जुनी समजूत ही आहे की मुलं जन्मत:च दंगेखोर असतात. या समजुतीनुसार मुलांची तीव्र जिज्ञासा आणि आजूबाजूच्या वास्तवाला समजून घेऊन त्यानुसार वागण्याचीच इच्छा खोटी ठरेल. शाळेची घंटा मुलांचं असं काही नियंत्रण करते की मुलांची नैसर्गिक आवड, उत्सुकता आणि स्वनियंत्रण करण्याची क्षमता आपोआप मारली जाते. यामुळे अशा प्रकारच्या शिस्तीची त्यांना सवय होते. यात प्रत्यक्षात स्वयंशिस्त कमी आणि सरकारी शिस्तच अधिक असते. जेव्हा सगळी शासकीय कर्तव्यं एका निश्चित कार्यक्रम आणि प्रणालीनुसार पार पडत असतात तेव्हा समाजात आपलं वर्तन आणि क्रिया एका अदृश्य कार्यक्रमानुसार घडत असतात. पोट भरल्यावर खाणं थांबविण्याची प्रेरणा होणं म्हणजे शिस्त. घंटा वाजताच भूगोल शिकवणं थांबवून भाषा शिकवायला सुरू करणं हे शिस्तीच्या समजुतीपलीकडचं आहे. घंटेबरहुकूम मुलांच्या आवडीचं आणि कामांचं हळूहळू इतकं नियमन केलं जातं की पुढेपुढे लादल्याशिवाय कुठलंही काम करायला मूल असमर्थच होतं. त्याचा आत्मविश्वास संपतो. जबाबदाऱ्या म्हणजे ओझी वाटू लागतात आणि एक प्रकारची रूढ दिनचर्याच त्याच्या आयुष्याचं एकमेव उद्दिष्ट आणि साधन बनतं.

स्वयंशिस्त आणि सरकारी शिस्त यांमध्ये फरक करण्यासाठी असं म्हटलं जातं, की स्वयंशिस्त ही माणसाच्या इच्छेनं, आतून येते; तर सरकारी शिस्त बाहेरून लादलेली असते. परंतु हा फरक फारसा उपयोगी नाही. कारण दीर्घकाळ सरकारी शिस्तीच्या प्रभावाखाली राहिल्यास ही 'सरकारी शिस्त' त्या व्यक्तीच्या 'आतपर्यंत' पोहचते. दीर्घकाळ गुलामीत राहिलेल्या समाजाला नियंत्रणाखाली जगण्याची इतकी सवय झालेली असते, की अशा समाजातील माणसांमध्ये 'आतून' आणि 'बाहेरून' अशी विभागणी करणं अवघड होऊन बसतं. एखादी व्यक्ती शिस्तप्रिय आहे, का गुलाम आहे हे ओळखण्याची मुख्य खूण म्हणजे त्या व्यक्तीचा दुसऱ्याच्या स्वातंत्र्याकडे बघण्याचा दृष्टिकोन. ज्यांनी स्वत:च गुलामी स्वीकारलेली आहे ते दुसऱ्यांचं स्वातंत्र्य नाकारतात. समूहात जगताना आपापसातल्या नात्यांना संतुलित ठेवण्यासाठी एक नैसर्गिक क्षमता असते. आदेश आणि ढीगभर नियमांमध्ये बांधून राहून काम करण्याच्या सवयीमुळे ती नैसर्गिक क्षमताच पूर्णपणे नष्ट होते. आदेशाप्रमाणे काम करणाऱ्या व्यक्तीला कुणी आदेशांशिवाय तत्परतेनं आणि शांतपणे काम करू शकतो हेच मुळी अशक्य वाटत असतं. कुठल्याही समाजात स्वातंत्र्याची प्रत समजून घेण्यासाठी मुलांबद्दलचा मोठ्यांचा दृष्टिकोन कसोटीसारखा वापरता येईल. ज्या समाजात मुलांना नियंत्रणात ठेवणं हेच त्यांच्यासाठी उत्तम मानलं

जातं; मुलांच्या इच्छा, आवडी, सवयी आणि काम करण्याच्या पद्धतींकडे संशयानं पाहिलं जातं, त्या समाजाचं स्वातंत्र्यच संशयास्पद असतं.

आपल्याकडे शाळेत अपेक्षित असलेल्या शिस्तीला लष्करी शिस्त म्हणणं चुकीचं होणार नाही. फार मोठ्या प्रमाणात खरोखरीच बालपणाचं आपल्याकडे लष्करीकरण झालेलं आहे. राजकीय नेते नेहमी म्हणतात, की आजची मुलंच उद्याचं मजबूत राष्ट्र घडवणार आहेत. सतत अशा प्रकारची विधानं ऐकून मुलांच्यामधे एक प्रकारचा गंड तयार होतो. 'सध्या' काही आपण 'मोठी' कामे करू शकत नाही. जी आणि जेवढी महत्त्वाची कामं आहेत ती या बालपणाची सीमा ओलांडूनच आपण करू शकू. लहानपणातले आनंद आणि संघर्ष त्यांना निरर्थक आणि मूर्खपणाचे वाटू लागतात. लवकरात लवकर मोठं होण्याची विचित्र अधीरता त्यांना ग्रासून टाकते. त्यामुळे बालपणाचा अर्थच हरवतो. आजच्या भारतीय समाजात विविध सोयी सवलती आणि अधिकार देणाऱ्या पदांसाठी स्पर्धा तीव्र होऊ लागली आहे. त्याच्याच जोडीला लवकरात लवकर 'मोठे' होण्याची घाई आणि जीवनातील एक एक पायरी भराभर चढून जाण्याची तीव्र गरज मुलांच्या जीवनाचा कब्जा घेऊ लागली आहे.

'तू कोण होणार आहेस?' असा प्रश्न मध्यमवर्गातल्या जवळपास प्रत्येक मुलासमोर दहा अकराच्या वयात समोर येऊन आदळतो. आपल्या मर्यादित अनुभवाच्या आधारावर ते मूल काहीतरी उत्तर देतंच. हे उत्तर काही त्याच्या महत्त्वाकांक्षेचं प्रतीक नसतं. तातडीनं एक उत्तर शोधण्यातली ती असहायता असते. ते मूल गोंधळून गेलेलं असतं आणि हा काहीतरी 'बनण्याचा' गंड त्याच्या प्रयत्नांवर नियंत्रण करायला लागतो. यामुळे मोठं होण्याच्या खूपच अगोदर ते बालपणापासून तुटून पडतं.

बाल्यावस्थेत मुलांच्या ठायी असलेले विविध नैसर्गिक गुण आणि क्षमता, बालपणीचे समृद्ध करणारे अनुभव या गोष्टी खूप अगोदरच खुडल्या जातात. ही नक्कीच अस्वाभाविक आणि अमानुष प्रक्रिया आहे. यालाच मुलांचं सैनिकीकरण म्हणता येईल. मोठं (प्रौढ) आणि जबाबदार होण्यामध्ये मुलांना आपलं लहानसं शरीर आणि मर्यादित शक्तीचा अडथळा वाटायला लागतो. मोठ्या माणसांप्रमाणे वागण्याबोलण्याचं दडपण त्याच्या व्यक्तिमत्त्वावर पडतं. आणि तो छोटासा आज्ञाधारक सैनिकच होऊन जातो.

गणवेश हा बालपणाच्या लष्करीकरणाचा एक पैलू आहे. शिक्षणात व्यक्तिगत आणि सामाजिक तत्त्वांना वेगळं ठेवण्याचा प्रयत्न सुरुवातीपासूनच होतो. या जुन्याच वादाचा युनिफॉर्म हा लोकप्रिय मुद्दा आहे. 'व्यक्तिगत'चे समर्थक म्हणतात की मुलाला दुसऱ्या मुलांपेक्षा वेगळं दिसण्याच्या अधिकारापासून वंचित ठेवणं योग्य होणार नाही. याउलट असं समर्थन दिलं जाते की युनिफॉर्ममुळेच मुलांना समाजात मिसळून जाण्याची प्रेरणा मिळते. हे गांभीर्यानं घ्यायचं झाल्यास असंही विचारता येईल की व्यक्तीचा समाजातला विलय मुलांसाठी जेवढा आवश्यक आहे, तेवढाच मोठ्यांसाठी का नाही? मोठ्यांसाठी युनिफॉर्म का नाही? स्वभावतःच मुलं अराजकवादी असतात या अंधश्रद्धेपोटी मुलांचं सामाजिकीकरण गणवेशासारख्या प्रकट पद्धतीने करणे आवश्यक आहे का? म्हणजे त्यामुळे ते मूल मोठे होईतो अशा पद्धतीची गरजच उरू नये? ज्या समाजात आर्थिक विषमता केवळ कपड्यांनी न लपण्याएवढी स्पष्ट आहे, अशा समाजात गणवेशाच्या मुद्यावर व्यक्ती आणि समूहाची चर्चा करणं व्यर्थ आहे. वर्गामध्ये आर्थिक विषमता जेवढ्या स्पष्ट रूपात दिसेल तेवढं मुलांचं सामाजिकीकरण वेगाने होईल. परस्परांच्या खाजगी जीवनातील असहायता किंवा सुविधा स्वच्छपणे पाहूनच मुलांना समाजाची खरी ओळख होईल. विषमता झाकल्याने एक प्रकारचं कृत्रिम आवरण वर्गात तयार होतं. परस्परांमध्ये मिसळण्याला पूर्वीप्रमाणेच विषमतेनुसार मर्यादा पडतात.

व्यक्ती आणि समाजाच्या परस्परांकडून असणाऱ्या अपेक्षांना परस्पर विरोधी मानणारे शिक्षणशास्त्रज्ञ सामाजिकीकरणासाठी व्यक्तीनं किती आणि कशाप्रकारे स्वत्वाचा लोप करायला हवा या प्रश्नाची पर्वा करीत नाहीत. ते समजून चालतात की **व्यक्तित्व ही सामाजिक** परिस्थितीची परिणती असते म्हणून त्याचा विकासही **जास्तीत जास्त सामाजिक** नियंत्रणातच व्हायला हवा. ते विसरतात किंवा हे समजतच **नाहीत, की व्यक्ती** हा काही निर्जीव घटक नसतो. व्यक्ती ही व्यवस्थेचा जिवंत भाग असते. हरघडी ती व्यवस्था आणि आपण यात संतुलन राखण्याचा प्रयत्न करत असते. व्यक्तीच्या या प्रयत्नातूनच समाजात एक व्यवस्था निर्माण होत असते. आदेशाच्या आधारेसुद्धा अशी एक व्यवस्था निर्माण केली जाऊ शकते. परंतु ती व्यवस्था समाजासाठी नव्हे, तर राजकीय वर्चस्वासाठी पोषक असते. मुलांच्या संदर्भात जेव्हा आपण गणवेश किंवा तत्सम पद्धतींचा उपयोग करतो तेव्हा आपण मुलांचं सामाजिकीकरण नव्हे तर सैनिकीकरण करीत असतो. मुलं स्वभावतःच अराजकतावादी, बंडखोर असतात ही समजूतच अशा सैनिकीकरणाच्या आवश्यकतेमागे असते. मूल जेव्हा एकटं असतं, तेव्हा ही धारणा किती चूक किंवा बरोबर आहे हे आपण पाहू शकतो. अशावेळी मुलं नवनवीन, त्यांचे असे स्वतंत्र खेळ शोधून काढतात. मनोरंजनाबरोबरच त्यांचे हे खेळ म्हणजे त्यांच्या विचारांचं माध्यमही असतं. कितीतरी मुलं अशी एकटी खेळताना मी पाहिलेली आहेत. माझा

अनुभव आहे की अशा खेळांमधून ती आपल्या अस्तित्वाच्या सामूहिकतेचे प्रश्न सोडवत असतात. दोनपेक्षा अधिक मुलांचे सागरगोट्यांसारखे खेळ वस्तुतः सामूहिक स्थितींचीच रूपकं असतात. ती अशा व्यवस्थेचा शोध घेत असतात. मूल समूहाला समाजाच्या रूपात पाहतं. यात महत्त्वाचं म्हणजे यातले बरेच खेळ मुलं एकटी असतानाही तेवढ्याच तल्लीनतेनं खेळतात. ती आपल्या तीव्र कल्पनाशक्तीनं एकेकटं असूनही खेळांच्या नियमांचं व्यवस्थित पालन करतात. त्यांच्या या क्षमता न जपणारे अनभिज्ञ लोक त्यांच्या 'सामाजिकीकरणा'च्या चिंतेनं व्याकूळ होऊन गणवेशासारख्या उपचारांचा वापर करतात.

पालक आणि शिक्षकांतर्फे मुलांवर नियंत्रण ठेवण्यासाठी आणखी एक मार्ग चोखाळला जातो. मुलांवर संस्कार करण्याच्या नावाखाली त्यांच्या कल्पनाविश्वात आदर्श म्हणून एका नायकाची प्रतिमा रुजवायची. असे नायक बहुतेकदा राजकीय नेते, जुन्या काळातील राजकीय व्यक्ती असतात.

'कोण होणार?' हा प्रश्न पुस्तक, घर आणि वर्गात जवळपास प्रत्येक मुलाला विचारला जातो आणि त्याच्या उत्तरात मोठमोठ्या राजकीय पुढाऱ्यांच्या नावाची यादी घोकली जाते. 'मी पंतप्रधान असतो/ असते तर' यासारख्या विषयांवर निबंध लिहायला सांगून मोठेपणाच्या अत्यंत संकुचित कल्पना मुलांवर लादल्या जातात. त्याचबरोबर मोठेपण आणि सामान्यत्व यांच्यात एक ठळक भेद त्यांच्या मनात निर्माण केला जातो. किशोर वयात अनेक मुलं या भेदांच्या मानसिक दुष्परिणामांनी, निराशा आणि आत्महीनतेनं पछाडली जातात. प्रौढ समाजाच्या काही अंशी जवळ येताच त्यांच्या लक्षात येतं, की पद आणि सन्मानाची स्पर्धा आर्थिक अडथळ्यांनी भरलेली आहे. बालपणाचं गुलाबी जग हरवणं म्हणजे मुलांमध्ये चीड निर्माण होणं आणि स्वतःतला आत्मविश्वास गमावणंच असतं. शेवटी याचा फायदा राजकीय सत्तेलाच मिळतो. युवा प्रजेच्या रूपात सत्तेला आत्महीनतेनं ग्रस्त आणि राजकीय शक्तीपुढे समर्पित झालेले नागरिक आयतेच मिळतात.

मुलांच्या राजकारणासाठी होणाऱ्या वापराबद्दल समाजात माहिती देणं आणि त्याचं नियमित परीक्षण करणं आवश्यक आहे. सरकारी दृष्टिकोनातून आपण स्वतंत्र आहोत. परंतु आपल्या सगळ्याच महत्त्वाच्या व्यवस्था उदाहरणार्थ प्रशासन, कायदा, शिक्षण या वसाहतवादी काळाच्या देणग्या आहेत. ज्या शासनाचं शैक्षणिक धोरण समतेवर आधारलेलं असतं अशा राज्याच्या शोधासाठी समाजातच तशी परीक्षण-विश्लेषणाची जाणीव निर्माण होणं आवश्यक असतं. अशा राज्यनिर्मितीची कल्पना शिक्षणातून नव्हे, तर व्यापक राजकीय संदर्भातच करता येते. या संदर्भासाठी आपल्याला भारतीय लोकशाहीच्या स्वभावाकडे पाहावं लागेल. आपली लोकशाही अद्याप सरंजामशाही संस्कारातून का मुक्त झाली नाही, याकडेही विशेष लक्ष द्यावं लागेल. भारतात मध्यमवर्ग शिक्षणाच्या क्षेत्रात वसाहतकालीन परंपरांना का टाकून देऊ शकला नाही, हेही त्याचबरोबर तपासावं लागेल. सर्वसाधारणपणे मध्यमवर्ग हा लोकशाही जाणिवेचा वाहक मानला जातो. युरोपात बूर्झ्वा वर्ग शिक्षण आणि संस्कृतीच्या क्षेत्रात सरंजामशाही परंपरा मोडून नव्या व्यवस्था आणण्यात यशस्वी झाला आहे. भारतीय बूर्झ्वा असं करू शकले नाहीत. कारण युरोपियन बूर्झ्वांसारखे ते एका नवीन उत्पादन व्यवस्थेचे जनक नव्हते, तर इंग्रजी आमदनीत उपलब्ध असलेल्या नोकऱ्यांमुळे बूर्झ्वा बनले होते. त्यांच्या स्वतःच्या गुलामगिरीनंच इंग्रजांना वर्चस्व दिलं यामुळे गुलामगिरीच्या बेड्यातून व्यापक समाजाला स्वतंत्र करणं त्यांना स्वातंत्र्यानंतरही सुचलं नाही. यादृष्टीनं भारतीय बूर्झ्वा हा नावालाच बूर्झ्वा राहिला, प्रत्यक्षात तो निव्वळ नोकरदार वर्ग झाला आणि या वर्गाला वारसा सरंजामदारी आणि वसाहतवादी शासन यांच्याकडून मिळाला. त्यामुळे या वर्गातून येणाऱ्या नेतृत्वाकडून शिक्षणाच्या क्षेत्रात कोणत्याही नव्या प्रारंभाची आशा ठेवता येणार नाही हे उघड आहे.



*माध्यम हीच माहिती आहे.*

**मार्शल मॅक्लुहन**

# वर्गाची चौकट

खूप वर्षांपूर्वीच्या माझ्या एका कथेत शाळकरी मुलाचं एक पात्र आहे[१]. शाळेतल्या आपल्या प्रगतीनं हा मुलगा वैतागलेला असतो. वर्गात त्याचे गुरुजी त्याला सारखं सांगत असतात, की अमुक तमुक गोष्ट त्याला दोन वर्षांपूर्वीच माहीत असायला हवी होती. मुलाला वाटतं, जी गोष्ट तो दोन वर्ष समजून घेऊ शकला नाही, ती आता माहीत नाही का करून घेता येणार? दोन-दोन वर्षांचे असे उल्लेख किती दिवस चालणार?

या मुलाचा गोंधळ हा आधुनिक जगातल्या नव्या पिढीतल्या सगळ्यात व्यापक आणि गंभीर अशा गोंधळाची वानगीच आहे. जीवनाचं अत्यंत रूढ असं जे विभाजन करून टाकलेलं आहे, त्यातून ती उत्पन्न झाली आहे. जीवनाचे कप्पे करून टाकणं काही नवं नाही. बालपण, तारुण्य, प्रौढावस्था, वृद्धावस्था जुन्या जमान्यापासून सर्वत्र मान्य झालेले आयुष्याचे टप्पे आहेत. परंतु तारुण्याला बाकीच्या जगण्यापासून तोडून टाकणं आणि तारुण्यातल्या विकासक्रमाचं अत्यंत यांत्रिक आणि सूक्ष्म असं विभाजन करणं ही खास आधुनिक व्यवस्थेची देणगी आहे. आणि या विभाजनाचं दृश्य रूप म्हणजे शाळेतला वर्ग असं म्हणता येईल. या वर्गाची संकल्पना पश्चिमेत जास्तीत जास्त चारशे वर्षं तर भारतात दोनशे वर्षं जुनी आहे. जगभर आज वर्ग हीच शिक्षणाची आधारशिला मानली जात आहे. इवान इलिचनं त्याच्या 'डी-स्कूलींग सोसायटी'[२] मध्ये म्हटलं आहे की शिक्षण आपणा सर्वांवर एक लेबल लावत असतं, जे आपण आयुष्यभर चिकटवून फिरत असतो. कोणी कितवीनंतर शाळा किंवा शिक्षण सोडलं यावर त्याच्या/तिच्या पुढच्या आयुष्यातल्या शक्यता अवलंबून असतात.

वर्गांमध्ये असं बंदिस्त केल्यानं शिक्षण म्हणजे एक अडथळ्यांची शर्यत होऊन जातं. प्रत्येक 'वरच्या' वर्गातलं शिक्षण मुलांना आमंत्रण देण्याऐवजी त्याच्या वाटेत अडथळा निर्माण करतं. शिक्षणामुळे आकर्षित होण्याऐवजी रोखलं जाणं, यापेक्षा

त्याचं अधिक विकृत रूपांतर होऊ शकत नाही. यामागे शासनाची एक अघोषित इच्छाही लपलेली असते, की शिक्षणाच्या माध्यमातून समाजाची श्रेणीबद्ध रचना निश्चित व्हावी. या व्यवस्थेतल्या अडथळ्यांमुळे कुठल्यातरी पातळीवर बहुसंख्य विद्यार्थी अडून मागे पडतात अन् फारच थोडे शाळा पूर्ण करू शकतात. जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना कुठल्या ना कुठल्या स्तरावर अयोग्य घोषित करणं यावरच शिक्षणाचा सगळा भर आहे. वर्गांच्या क्रम साखळीत जो जास्तीत जास्त टिकतो तो जास्त शिक्षित म्हणवला जातो. समाजात त्यालाच भरपूर सन्मान आणि मोबदला मिळतो. इयत्ता आणि सामाजिक प्रतिष्ठेच्या युतीचा आरंभ शाळेतच होतो. लहान-मोठ्या मुलांना शाळेत वेगवेगळ्या प्रकारच्या सवलती मिळतात. शाळेबाहेर, घरात किंवा इतरत्र मुलं त्यांच्या इयत्तेवरून ओळखली जातात. प्रौढ समाजात त्यांचं स्थान निश्चित होतं. लहान मुलाला पावला-पावलावर हे जाणवायला लागतं, की हे जग मोठ्यांचं आहे आणि त्यात सहभागी व्हायचं असेल, तर आपल्याला घाईनं मोठं होणं आवश्यक आहे. घाईघाईनं मोठं होण्याच्या दबावानं मूल एखादी चूक करतं किंवा शाळेच्या नैतिक आणि शिस्तीच्या व्यवस्थेचा भंग करतं. अशा तक्रारी अनेक शाळांतून ऐकायला मिळतात.

या इयत्तेच्या व्यवस्थेचा सगळ्यात मोठा परिणाम म्हणजे सामाजिक जीवनापासून बालपण अलग पडतं. जुन्या शिक्षणात मोठ्यांमधे आणि मुलांमधे असा भेद नव्हता. फिलिप एरिज यांच्या मते पश्चिमेत शिक्षणात अशा प्रकारचा भेद मध्ययुगीन काळानंतर आला आणि अठराव्या शतकाच्या आसपास तो जवळ-जवळ नियमच झाला.[३] आपल्याकडच्या जुन्या गुरुकुल पद्धतीत मुलांनी मोठ्यांसोबत राहणं आवश्यक मानलं जाई. आजही मदरशांमध्ये निरक्षर प्रौढ आणि वृद्ध व्यक्ती मुलांसोबत शिकतात. काय आणि कसं शिकवलं जातं, ते महत्त्वाचं असतं, वय हा घटक महत्त्वाचा नसतो. पाँडिचेरीच्या श्री अरविंद आश्रमाच्या आंतरराष्ट्रीय शिक्षण केंद्रात तर मुलांना आपल्या आवडीनुसार विषय निवडून कोणत्याही दालनातल्या कामात सहभागी होण्याचं स्वातंत्र्य दिलं जातं. बिहारमध्ये 'श्रमशाळा' या संस्थेतली मुलं शिक्षक आणि संस्थेशी संबंधित मोठ्यांच्याबरोबर शेतात कामं करतात. पण अशा संस्था अपवादानेच आहेत. कारण जणू काही नियम असावा तशी आपली कायदेबद्ध संस्कृती हे गृहीतच धरते की प्रत्येक वयाच्या गरजा वेगळ्या आणि निश्चित असतात.

असं म्हटलं जातं, की लोकशिक्षणाच्या व्यापक गरजेनंच वर्गांच्या खोल्यात बंदिस्त असलेली शिक्षणव्यवस्था आवश्यक बनवली आहे. प्रचलित लोकशिक्षणाच्या संदर्भात इयत्ताक्रमाची रचना निश्चितच सोयीची वाटते. त्याचं कारण लोकशिक्षणाची गरजच साक्षरता आणि पुस्तकांचं ज्ञान ही असून सामाजिक अनुभव किंवा सामाजिक भान तिथं अभिप्रेत नाही. याउलट शिक्षणासारख्या जुन्या संकल्पनेचा संबंध सामाजिक जीवन आणि संस्कृतीशी आहे. या अर्थानं शिक्षणासाठी इयत्ताक्रमाची आवश्यकता आहे असं वाटत नाही. उलट त्यातून मुक्ती मिळाली तर अधिकाधिक लोकांपर्यंत शिक्षण पोहचू शकतं. माहितीचे स्रोत वाढविण्यासाठीच्या उपायांची माहिती देताना इलिच यांच्या विश्लेषणाचा हाच आधार आहे. त्यांच्या मते,'जसजशी समाजाची मानसिकता शाळाकेंद्रित केली जाते तसतशा त्या समाजातल्या व्यक्ती हळूहळू हे समजून चालू लागतात की दुसऱ्यांपेक्षा दुय्यम झाल्याशिवाय जगणं अशक्य आहे.'[४] प्रमाणपत्र वा पदवीद्वारे केलं जाणारं विभाजन म्हणजे शाळाकरण असं इथं इलिच यांना अभिप्रेत आहे.

शाळेवर असलेल्या इयत्ताव्यवस्थेच्या प्रभावाचा अभ्यास करताना संदर्भासाठी निवडलेल्या वर्गाचं अस्तित्व पुढील दोन रूपांत दिसतं: (१) शाळेला श्रेणीबद्ध रचना देणारी व्यवस्था. (२) मुलांच्या एका विशिष्ट गटाला बाकी शाळेपासून अलग करणारी, एका विशिष्ट रचनेची खोली.

वर्ग या दोन्ही भूमिका हुशारीनं बजावतो. शाळेला श्रेणी रचनेत बसविणाऱ्या व्यवस्थेच्या रूपात वर्ग खालील चार उद्देशांसाठी कार्यरत असतो:

(१) अ. एका वर्गाच्या मुलांना इतर वर्गातल्या मुलांपासून विभक्त करणं.
ब. एका वर्गातल्या मुलांना इतर वर्गांच्या शिक्षकांपासून तोडून टाकणं.
(२) ज्ञानाला कृत्रिम वार्षिक तुकड्यात वाटणं.
(३) मुलाच्या विकासाला साच्यात बसविण्याचा प्रयत्न करणं.
(४) सामाजिक वर्ग-विभाजनाचा पूर्वसंस्कार मुलांना देणं.

कोणत्याही एका वर्गात राहण्यानं मुलाच्या ओळखीचा परिघ आपल्या वयाच्या मुलांपर्यंतच मर्यादित राहून जातो. लहान आणि मोठी मुलं यांचं एकमेकांशी वागणं बदलतं. जणू मोठ्यांजवळ काही जहागिरी आहे आणि लहान म्हणजे दुय्यम आहेत. आपल्यापेक्षा लहान आणि मोठ्या मुलांपासून ते मूल वेगळं केलं जातं, त्यामुळे त्यांच्याशी ते जवळीक तर साधू शकत नाहीच उलट त्यांच्याशी ज्याला सरंजामी पद्धतीचं म्हणता येईल, असं वागायला लागतं. कुटुंबात वेगवेगळ्या वयाची

मुलं ज्या सौहार्दानं आणि सहजतेनं वावरतात तसंच शाळेत असायला हवं. जगण्यातले लहान-मोठे अनुभव आणि अडचणींना सामोरे जाताना मोठ्या मित्रांच्या मदतीनं मूल सुलभतेनं शिकू शकतं. आपल्याहून मोठ्या आणि लहान मुलांसोबत राहणं खरं तर एरवीच एक शिकण्याचा चांगला अनुभव असू शकतो. तरुण आणि वयस्कर शिक्षकांना एकमेकांसोबत काम करताना असाच अनुभव मिळतो. 'वर्ग'व्यवस्था असा अनुभवच अशक्य बनवून टाकते.

ही व्यवस्था मुलांना त्यांच्यापेक्षा लहान आणि मोठ्या मुलांपासून वेगळं तर करतेच, पण जे त्यांना शिकवत नाहीत त्या शिक्षकांपासूनही तोडून टाकते. मोठ्यांशी ओळख आणि त्यांच्याबरोबर काम करण्याचा अनुभव असणं मुलांसाठी खूप आवश्यक आहे. सध्याच्या सामाजिक व्यवस्थेत फक्त पालक असणाऱ्या वयस्कर मंडळींशीच मुलांचा संबंध येतो. वर्गात एका शिक्षकाशी बांधले गेल्यानं शाळेत असलेल्या इतरांशी ओळखीच्या शक्यता संपून जातात. देशात जवळपास सगळीकडच्या सरकारी प्राथमिक शाळांमध्ये एकेका शिक्षकाकडे एका वर्गाची जबाबदारी दिली जाते. मुलं त्याच त्या व्यक्तीच्या सहवासात कंटाळतात, त्या व्यक्तीकडून नवं काही शिकण्याचा उत्साह हरवून बसतात. त्यांच्यामधला पूल म्हणजे पुस्तकं. ती एरवीही काही फारशी जिवंत नसतात. काही बिनसरकारी शाळांमध्ये प्राथमिक शाळेत वेगवेगळ्या विषयांसाठी वेगवेगळे शिक्षकही असतात. मुलं एकाच व्यक्तीशी बांधली गेलेली नसतात पण त्यांचा परीघ सीमितच राहतो.

या वर्ग-इयत्ता व्यवस्थेचा आणखी एक परिणाम अभ्यासक्रमावरही पडतो. खरं तर मुलं आणि शिक्षकांची परिस्थिती आणि समाजात शिक्षणाच्या निश्चित ध्येय धोरणांच्या आधारावर अभ्यासक्रमाचा कार्यक्रम तयार केला पाहिजे. 'अभ्यासक्रमा'चा अर्थ भारतात फक्त सरकारी धोरणं किंवा आदेश असाच लावला जातो. आपल्याकडे अभ्यासक्रमाचा मुलांच्या आणि शिक्षकाच्या परिस्थितीशी काही संबंध नसतो. शिक्षण-विषयक कुठल्यातरी केंद्रावर हा अभ्यासक्रम बनवला जातो आणि दूरदूरच्या जिल्ह्यांतील गावा-गावांतल्या शाळेतल्या मुलांवर लादला जातो. स्वातंत्र्यानंतर जवळजवळ दोन दशकं अभ्यासक्रमांच्या बाबतीत फारच थोडे असे बदल झाले. यानंतर राष्ट्रीय शिक्षण संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेच्या अभूतपूर्व शोधांनी आपला प्रभाव दाखवायला सुरुवात केली आणि बघता बघता देशभरातल्या राज्यांतले अभ्यासक्रम बदलू लागले. काही ठिकाणी हे बदल एवढ्या भयावह गतीनं झाले की मोठ्या प्रमाणावर छापलेली पुस्तकं वाया गेली. नव्या पुस्तकांची छपाई आणि वितरण एक समस्या बनली. याहून एक विचित्र गोष्ट अशी घडली की अभ्यासक्रम खालच्या इयत्तांकडे सरकू लागला. म्हणजे वरच्या वर्गाचा अभ्यासक्रम खालच्या वर्गासाठी द्यायला सुरुवात झाली. हे १९६४-६६ च्या शिक्षण आयोगाच्या एका शिफारशीनुसार झालं. त्यात असं म्हटलं गेलं की विसाव्या शतकात ज्ञानाचं एकूण प्रमाण अचानक वाढलं आहे[४]. ज्ञान म्हणजे एक साठा किंवा ढीग आहे अशी उघड समजूत यामागे दिसते. शिक्षण आयोगाच्या अहवालातून स्पष्ट दिसतं, की आयोगाचे सदस्य पाश्चिमात्य देशांतील अभ्यासक्रमांमुळे प्रभावित झालेले होते आणि त्यांच्या शिफारसींमागे त्यांची इच्छा हीच होती की भारतीय अभ्यासक्रमात माहितीचं प्रमाण पाश्चिमात्य अभ्यासक्रमाच्या आधारावर ठरवलं जावं. अशा तऱ्हेची समजूत राजकीयदृष्ट्या वसाहतवादी आणि शैक्षणिकदृष्ट्या पुरातनवादी आहे. या समजुतीनुसार शिक्षणाचं केंद्र मुलं नसून माहिती हे आहे. मुलांना केंद्र मानलं तर आपल्याला दिसेल की अभ्यासक्रमाच्या निर्मितीसाठी मुलांची आर्थिक परिस्थिती, त्यांच्या क्षमता आणि त्यांच्या सामाजिक संदर्भात शिक्षणाची उपयुक्तता जोखणं आवश्यक आहे. त्यांच्या डोक्यांवर माहितीच्या भेंडोळ्यांचं ओझं ठेवणं नव्हे. गेल्या आठ-दहा वर्षांत पाठ्यपुस्तकांतल्या व अभ्यासक्रमातल्या बदलांसंबंधी देशातल्या विविध भागांतल्या शिक्षकांशी वा पालकांशी विचारविनिमय जवळपास केला गेलाच नाही. नवीन अभ्यासक्रम थोडाबहुत शहरांतल्या मुलांना शिकवून विकसित केला गेला आणि ही समजूत करवून घेतली गेली की हा वाढलेला अभ्यासक्रम दूरदूरच्या गावांमध्ये शिकणारी मुलंही सहज स्वीकारू शकतील. पण याउलट नवीन अभ्यासक्रमाची सामग्री खेड्यांतल्या, गावांतल्या शिक्षकांना आणि मुलांना कठीणच वाटली. विशेषत: गणित आणि विज्ञानाच्या अभ्यासक्रमातले बदल या शाळांसाठी कठीण झाले. याप्रकारे शहराच्या संपन्न आणि खेड्यातल्या गरीब शाळेतलं आधीच असलेलं अंतर यामुळे आणखी वाढलं. इयत्तेनुसार अभ्यासक्रम नवीन करण्याच्या प्रयत्नांमुळे हे घडलं.

अभ्यासक्रमाची अशाप्रकारे इयत्तावार विभागणी केल्यामुळे मुलांचा विकास ही एक सततची प्रक्रिया न बनता तो कृत्रिम तुकड्यात वाटला जातो. असा स्थितीशील अभ्यासक्रम मुलाच्या व्यक्तिगत आवडीनिवडी, त्याच्या क्षमतांमध्ये उपयुक्त न ठरता, 'नाईलाज' ठरतो आणि मूल आणि शिक्षक त्याचा निरुपायानं स्वीकार करतात. एखाद्या मुलाला एखाद्या विषयात त्याच्या वर्गमित्रापेक्षा अधिक आवड असली तरी मोठ्या शिक्षकाकडून नवीन पुस्तकातून जास्तीची माहिती मिळेतो अभ्यासक्रमामुळे त्याला अख्खं एक वर्ष वाट पहावी लागते. श्री अरविंद आश्रमातल्या शिक्षणकेंद्रात अभ्यासक्रम असा स्थिर आणि निश्चित नाही. तिथे मुलांना आपल्या आवडी आणि

क्षमतेनुसार कोणत्याही विषयातल्या माहितीची प्रगती कायम ठेवण्याची मुभा आहे. जिथं अशी सवलत नसते अशा सामान्य शाळांमध्ये मुलांना एका विषयाची वेगवेगळी अंगं आणि त्यांचा ताळमेळ लागणं अशक्य होऊन जातं. आपल्याकडे मूल नव्या वर्गात आलं की त्याला मागच्या वर्षी शिकलेला विषय अगदीच नवा आणि अनोळखी वाटू लागतो. इयत्तावार अभ्यासक्रम आणि त्यानुसार केलेली पाठ्यपुस्तकांची योजना यामुळे हे विशेषत्वानं होतं.

पाठ्यपुस्तकांनुसार अभ्यासक्रमातून ज्ञान देण्याच्या बहाण्यानं ही प्रक्रिया मुलाला एका साच्यात अडकवते. यामुळे मुलाची जिज्ञासा, आवड आणि क्षमता हळूहळू संपत जाते. माझ्या मते माध्यमिक शाळेत पोचेतो जवळपास तीन चतुर्थांश मुलांच्या बाबतीत ही दुर्घटना घडते. अभ्यासक्रमाच्या या कठोर चौकटीमुळे स्वत: काही जाणून घेण्याची, करण्याची मुलांची इच्छा आणि शक्ती उरत नाही. मुलाला वर्गातल्या उपस्थितीची, शिक्षकाच्या भाषणाची आणि पाठ्यपुस्तकाच्या शब्दावलीची सवय होऊन जाते. आपल्या इच्छा विसरून गेलेल्या, पालन पोषणासाठी डॉक्टर-नर्सवर अवलंबून असणाऱ्या रुग्णासारखी त्याची अवस्था होऊन जाते.

मुलांना अशा अवस्थेपर्यंत आणण्याचा शाळेचा किंवा शैक्षणिक धोरण ठरविणाऱ्यांचा उद्देश असतो किंवा काय हे ठरवणं अशक्य आणि व्यर्थही आहे. पण हे मात्र खरं की स्वत: काही जाणून घेण्याची आणि करण्याची क्षमता हरवलेलं मूल शाळेच्या यांत्रिक मागण्या पूर्ण करण्यात तत्पर होऊन जातं. ते वर्गात काही बोलत नाही की शाळेत काही दंगामस्तीही करीत नाही. ते मूल एक निर्जीव घटक बनून जातं. शाळेच्या प्रशासनाच्या दृष्टीनं असं मूल म्हणजे आदर्श प्रजेचा घटक असतं.

शाळेच्या प्रशासकीय दृष्टिकोनातून चांगला प्रजाजन किंवा नागरिक बनण्यासाठीचं प्रशिक्षण आयुष्यभरासाठी आपला ठसा उमटवून जातं. वर्गाची संकल्पना शाळेचं एक अंग उरत नाही तर मुलाच्या विचाराचा एक संस्कार बनत असते. वर्ग आणि समाजातील स्तर यांची तुलना करत, साम्यं शोधत मूल समाजाची कल्पना शिकत जातं. या समाजातल्या स्तरांमध्ये परस्परांशी विशिष्ट अशीच नाती असतात हे त्याला समजू लागतं. या व्यवस्थेतलं स्तरीकरण त्याच्या मनांत पक्क होऊ लागतं. ही इयत्तानिहाय व्यवस्था सततचा बदल आणि काही गोष्टींचा त्याग यांची सवय लावत असते. यामुळेच मुलाला ही व्यवस्था कोणत्याही अंतिम उद्देशाचा, ध्येयाचा विचार करू देत नाही. ठरावीकच गोष्टींच्या परवानगीमुळे मुलाच्या मैत्रीच्या संबंधांवरही प्रभाव पडतो. वरच्या वर्गातल्या मुलांशी मैत्री म्हणजे संकोच आणि त्रासाचा विषय होतो. लहान वर्गातली मुलं फारच लहान वाटायला लागतात. इयत्ता एकप्रकारे मुलाच्या विकासाचे प्रमाण किंवा माप ठरवत असते. हे माप कृत्रिम आणि खोटं आहे, कारण विकासाच्या संकल्पनेत विशिष्टच गोष्टीला प्रोत्साहन देणारं असं त्यात काही नाही. शाळेबाहेर मुलं आपल्यापेक्षा मोठ्या आणि लहान मुलांशी दोस्ती करतातच. विशेषत: खेळात वयाचं असं खूप कमी भान मुलांना असतं. खेळताना मोठी मुलं छोट्यांना त्यांच्या कुवतीनुसार स्वीकारतात आणि छोटी मुलं सतत आपली क्षमता वाढविण्याचा प्रयत्न करतात. उदाहरणार्थ कॅरम खेळताना छोटा आणि दुबळा खेळाडू स्वत:च एखाद्या तयार खेळाडूची मागणी करतो आणि ही मागणी मान्य होतेही.

मुलांमध्ये निसर्गत:च परस्परांच्या कमी-अधिक क्षमतांनुसार वागण्याची प्रतिभा असते. इयत्तेची रचना ही प्रतिभा हळूहळू नष्ट करते आणि त्याच्या आयुष्यात निरंतर स्पर्धेची परिस्थिती निर्माण करते. यात सहभाव अशक्य होऊन बसतो. इयत्ता त्यांना क्षमता आणि वयानुसार वर्ग आणि वेगवेगळ्या घटकांत वाटून टाकते. सहभावाऐवजी स्पर्धा आणि मदतीऐवजी ईर्षा त्यांच्या जीवनाचा आधार बनू लागते. परीक्षा आणि बक्षिसांसारख्या गोष्टी अशा वृत्तीला बळ देतात. जास्तीत जास्त मार्क मिळवणं आणि वर्गात वरचा नंबर मिळवणं हेच त्यांचं अंतिम उद्दिष्ट होऊ लागतं. हेच नव्हे तर इयत्ताक्रम एकप्रकारची निरंकुशता मिळवतो. मनातल्या मनात मूल हे कबूल करतं, की इच्छा असूनही वर्गातल्या स्पर्धात्मक परिस्थितीतून त्याला बाहेर पडता येणार नाही. स्पर्धेचे नियम पूर्ण निश्चित आणि अंतिम आहेत, ते स्वीकारून सतत पुढे जाण्याशिवाय दुसरा मार्ग नाही.

अशाप्रकारचं मानसशास्त्रीय प्रशिक्षण मुलाला शाळेशी जवळपास साधर्म्य असलेल्या समाजात जगण्यासाठी तयार करतं. अशा समाजासाठी कोणतीही सुंदर, राज्यशास्त्रीय नावं असोत, पण त्याची दोन वैशिष्ट्यं नेहमीच असतील. निरंतर स्पर्धा किंवा संघर्ष आणि सुट्या घटकाला महत्त्व नसणं. वर्ग-वर्गात विभागलेल्या मुलांमध्ये शाळेत असतं, तसंच अशा समाजात स्पर्धेचं स्वरूप असतं. फरक एवढाच असतो की स्पष्टपणे शाळेत असलेल्या वर्गांच्या ऐवजी तिथं उद्योग-व्यवसाय किंवा आर्थिक परिस्थितीवर आधारलेले वर्ग असतात. वर्ग-वर्गातलं नातंही शाळेतल्या वर्गांमधल्या नात्यांसारखंच असतं. तुटक, परस्परांशी संबंध नसलेलं. शाळेप्रमाणेच स्पर्धेची दिशा ऊर्ध्वच असते.

उघडच आहे की शाळेतली 'वर्ग'वारी इत्यादी व्यवस्था हे बाहेरच्या

समाजाचंच लघुरूप असतं. शाळेच्या भिंती दोन जगांना विभाजित करीत असतात. बाहेरचं जग जर वास्तव मानलं तर आतलं जग त्याचं रूपक होतं. वास्तव रचनेत आकार आणि नियम दृश्य नसतात, लघुरूपात ते प्रत्यक्ष दिसतात. इयत्ता-इयत्तांनी विभागलेली शाळा एकप्रकारे समाजाचं रूपच स्पष्ट करते. या व्यवस्थेच्या नियमांचा अभ्यास करण्यासाठी आपल्याला 'इयत्ता' किंवा 'वर्गा'च्या दुसऱ्या अर्थाकडे बघावं लागेल. वर म्हटल्याप्रमाणे एक व्यवस्था म्हणून आणि त्या व्यवस्थेची कार्यभूमी म्हणूनही वर्ग या संज्ञेला अर्थ आहे. वर्गाच्या खोलीचं बाह्यरूप सर्वसामान्य असतं. चार भिंती अन् एक छत, परंतु खोलीच्या आतली व्यवस्था एका विशिष्ट संस्कृतीची निर्मिती असते. तिला इयत्तेची संस्कृती म्हटलं तर चुकीचं होणार नाही.

या संस्कृतीची मूलभूत रीत आणि ज्ञानाचं रूप इयत्तांमध्ये विभागलेल्या शाळेच्या व्यवस्थेच्या आरंभापासून बदललेलं नाही. गरीब सरकारी शाळा सोडल्या तर साधारणतः ते सारखंच आहे. मुलांसाठी ओळीने बाकडी किंवा डेस्क आणि शिक्षकासाठी उंच टेबल आणि खुर्ची. याशिवाय भिंतीवर काही चित्रं किंवा उपदेश आणि शाळेच्या आर्थिक कुवतीनुसार सजावट. खोलीचं बाहेरचं रूप अर्थात छत आणि भिंती, इतर सर्वसामान्य खोल्यांप्रमाणेच मुलाला शेष जगापासून अलग आणि सुरक्षित करून टाकतात. परंतु वर्गाच्या खोलीचं वैशिष्ट्य तिला इतर खोल्यांहून वेगळं बनवतं. ते मुलांसाठी शाळेबाहेर पसरलेल्या जगाला 'ज्ञाना'त रूपांतर करण्याचं साधन बनतं. पुस्तकंही हे करतात, पण पुस्तकं केवळ साधन नसतात. ती आतून निर्जीव खोलीसारखी रिक्त नसतात. ती जगातल्या तमाम गोष्टींची रूपकं असतात पण वर्गाची खोली केवळ एक ठिकाण असतं जे परंपरेनं गौरवांकित झालेलं असतं. पुस्तकात रेखाटलेली चित्रं आणि शब्द पाहून मूल जगाचा अनुभव मिळवतं. त्यामुळे पुस्तकं मुलांच्या कल्पनेसाठी उत्प्रेरकासारखं काम करतात. वर्गाची खोली मात्र अशा कोणत्याही योग्यतेशिवाय गौरव प्राप्त करून बसते. या गौरवाची किंमत वर्गाबाहेरच्या जगाला आणि पुस्तकाला चुकवावी लागते. वास्तव आणि जगणं, जे स्वतःच ज्ञान आहे, ते मुलासाठी अनावश्यक होऊ लागतं. कारण ज्ञान म्हणविला जाणारा अनुभव वर्गाच्या भिंतींच्या आतच मिळविण्याची सवय होऊन जाते. वर्गाच्या खिडकीजवळ बसून चिमण्यांचा आवाज ऐकत आणि बाहेरचं दृश्य पाहत बसलेलं मूल भयभीत असतं, की शिक्षकाची करडी नजर त्याच्यावर पडेल अन् इकडं-तिकडं बघण्याच्या गुन्ह्यासाठी त्याला शिक्षा होईल. शालेय आयुष्यातले असे अगणित अनुभव निसर्ग आणि जीवनातल्या वर्गाबाहेरच्या अनुभवांच्याबाबतीत मुलांना मंद आणि बोथट बनवतात. वर्गाची दुसरी शिकार असते पुस्तकं. जसजसं मूल वर्गातल्या व्यवस्थेच्या निरंकुश सत्तेला शरण जातं, तसतसे त्याचे पुस्तकातून मिळालेले अनुभव पुस्तकी होत जातात. पुस्तकांमुळे कल्पनाविश्व समृद्ध होत जाण्याची त्याची क्षमता कमी-कमी होत जाते. शब्द नुसते शब्द राहतात आणि चित्रं वर-वरच्या वर्गात एरवीही कमीच होत जातात.

या व्यवस्थेचा एक मूलभूत भाग मुलांच्या आणि शिक्षकांच्यामधलं अंतर हा आहे. आपल्या वयामुळे आणि आकारामुळे शिक्षकाचं तसंही वर्गात महत्त्व असतंच. हे महत्त्व समोर बाकांपेक्षा उंचावर ठेवलेलं टेबल आणि खुर्ची अधोरेखित करते. मुलांसाठी शिक्षकाचं असं असणं आव्हानापलीकडचं असतं. एका वयस्कर अधिकाऱ्याच्या रूपात मुलं शिक्षकाला स्वीकारतात. शिक्षक आपलं महत्त्व अधोरेखित करणारी साधनं किती आणि कशी वापरतो यावर अवलंबून असतं. रूढ असं स्वरूपच शिक्षकाच्या डोक्यात असेल तर मग त्याला आत्मीयताही क्वचितच मिळेल. तो वरच्या पदावर एक सत्ताधारीच बनून राहील. मुलांचं जगणं आरपार पाहणारा, त्यांच्या अनुभवांच्या तळापर्यंत प्रवेश करणारा कुशल शिक्षक कधीच बनू शकणार नाही. या अपयशापासून वाचविण्यासाठी वर्गाचं स्वरूप लवचीक बनवायला हवं. आपल्या खुर्चीचा कमीत कमी उपयोग करत प्रत्येक मुलासाठी उपलब्ध असण्याचा आभास देण्याचा सराव करावा लागेल. फळ्याचा वापर करताना मुलांचा त्यात सहभाग वाढविण्यासाठी प्रोत्साहन द्यावं लागेल.

मुलांनी वर्गात ओळीनं बसणं हा तर एक कडक नियमच असतो. ज्या शाळेत फर्निचर नाही तिथं पट्टीवर एका ओळीत बसणं समजू शकतं, मुलं तसं बसतातही. खुर्च्या-डेस्क असेल तर ओळीची अगदी काटेकोर आवश्यकता आहे असं नाही. सुलभ व्यवस्थेचं एक साधन म्हणून रांगेत बसणं हीसुद्धा एक व्यवस्थाच आहे जी वर्गाच्या आत वापरली जाऊ शकते. वर्गाच्या रूढ रचनेला लवचीक बनवायचं असेल तर इच्छुक शिक्षकानं मुलांना त्यांना हवं तसं बसू द्यावं. अव्यवस्थित वाटलं तरी ते स्वातंत्र्य मुलांना द्यावं. मुलांना सुव्यवस्थित रचना आवडते यात संशय नाही. पण वर्गाच्या आतली व्यवस्था मुलांद्वारे स्थापित असलेली पाहिजे. सतत एकसारखी आणि लादलेली व्यवस्था नको. प्रत्यक्षात वर्गातली आसनव्यवस्था मुलांच्या इच्छेबरोबरच विषय आणि अभ्यासाच्या प्रकृतीवरही अवलंबून असली पाहिजे. गणित आणि विज्ञानासाठी सुटं-सुटं किंवा कोणत्याही क्रमाशिवाय बसणं जास्त योग्य होईल. भाषाविषयासाठी गोलात बसवून शिकवणं उपयुक्त होईल. भाषाविषयात, वाचताना-शिकताना सामूहिक सहभाग सगळ्यांसाठीच उपयुक्त ठरतो. गणित आणि विज्ञानासाठी प्रत्येक मुलाचाच सुरुवातीला संपूर्णतः स्वतंत्रच प्रयत्न करणं आवश्यक

असतं. हे सगळं अर्थात वर्गातल्या परिस्थितीनुसारच ठरवलं पाहिजे, एकच एक नियम याबाबतीत बनवणं शक्य नाही.

वर्गाच्या ज्या दोन भूमिकांबाबत मी बोललो आहे त्या स्वीकारून शिक्षणात कोणतंही मूलभूत परिवर्तन घडवून आणता येणार नाही. वर्गखोली आणि वर्गाच्या स्वरूपाबाबत लिहिताना मी म्हटलं आहे की शिक्षक आणि विद्यार्थ्यांच्या नात्याला एका मर्यादेपर्यंत लवचीक बनवता येणं शक्य आहे. त्याचा परिणाम अंशतःच होऊ शकेल. कारण मूलभूत परिवर्तनासाठी शिक्षण आणि वर्गाबाहेरचं जग यांचा संबंध असावा लागतो. हे नातं दुहेरी-दोन्ही बाजूंनी असतं. मुलांचा संबंध शाळेबाहेरच्या जगाशी आणि बाहेरच्या समाजाचा शाळेशी संबंध अशा नात्यातून ते प्रस्थापित होईल. शाळा एका संस्थेच्या रूपात राहील. शाळा एक संस्था म्हणून नष्ट न करता, शाळेला सत्तेवर अवलंबून ठेवणाऱ्या मर्यादा नष्ट करता येतात. वेगवेगळ्या उद्योग-व्यवसायात कार्यरत असलेल्या लोकांचा शाळेशी जवळचा संबंध येणं आवश्यक आहे. दुसरं म्हणजे मुलांना शाळेबाहेरच्या जगात सहभागी होण्याच्या संधी मिळवून दिल्या पाहिजेत. पाठ्यपुस्तकं आणि शिक्षकांवरचं अवलंबन संपविल्याशिवाय शाळेत संकल्पनात्मक परिवर्तन होणं शक्य नाही.

रचनात्मक परिवर्तन हा मात्र शाळेच्या सामाजिक संदर्भाशी जोडलेला प्रश्न आहे. स्वतंत्रपणे शाळेच्या स्तरावर त्याचं उत्तर मिळू शकणार नाही. एक व्यापक राजकीय चळवळच स्पर्धा संस्कृतीला विरोध करू शकते. शाळा त्याचं प्रतीक बनू शकेल. शाळेतल्या वर्गाच्या रचनेला प्रयोग म्हणून मोडणं फारसं कठीण नाही. श्री अरविंद आश्रमाच्या शिक्षण केंद्रात आणि आणखी काही प्रयोगशील संस्थांमध्ये हे झालेलं आहे. खरं काम शिक्षणाला इयत्ताक्रमातून मुक्त करणं हे आहे. असं झाल्यास योग्यतेला पदवीपासून आणि पदवीला सामाजिक प्रतिष्ठा आणि आर्थिक संपन्नतेपासून वेगळं पाहणं शक्य होईल. मात्र यासाठी पहिलं पाऊल शाळा टाकू शकत नाही कारण समाजातल्या मूल्य आणि प्राधान्याच्या बाबींमधील परिवर्तन एकेकट्यानं होत नाही. परंतु एखादी राजकीय प्रक्रिया हे करीत असेल, तर शाळा त्यात महत्त्वाची मदत करू शकते.

वर्ग किंवा इयत्ता व्यवस्थेचा परिणाम मुलांबरोबरच शिक्षकांवरही होतो, याचा निर्देश मी प्रकरणाच्या आरंभीच केला आहे. वर्गात 'गुरुजी' किंवा 'सर' म्हणून केलं गेलेलं संबोधन म्हणजे या व्यवस्थेचं फलित आहे. या वर्गाच्या आत अनेक उपवर्ग आहेत. त्यांच्या नावात कमी-अधिक प्रादेशिक वैविध्य दिसतं. शिक्षकांसाठी आजही 'निम्नश्रेणी शिक्षक' आणि 'उच्चश्रेणी शिक्षक' अशी पदनामं भारतात काही प्रदेशात अजूनही प्रचलित आहेत. काही प्रदेशात ही पदनामं काहीशी कमी अपमानास्पद आहेत. उच्चशिक्षण समूहात शिक्षकांच्या व्याख्याता, प्रपाठक आणि प्राध्यापक अशा श्रेणी आहेत. प्राथमिक शाळा ते विद्यापीठ असं पसरलेलं हे वर्गविभाजन दोन प्रकारांनी इयत्ताक्रमाशी जोडलेलं आहे. एकतर शिक्षकांना मिळालेल्या पदवीनं आणि दुसरं म्हणजे इयत्तेनुसार त्यांच्या शिकवण्यामुळे. या दोन गोष्टींच्या आधारेच शिक्षकांचं पदनाम, वेतन आणि जीवनस्तर निश्चित होतो. जास्त पगार मिळवणारे, सुविधा आणि आरामाचं जीवन जगणारे शिक्षक 'उच्च' शिक्षणात असतात. कमी पगारावर काम करणारे, प्राथमिक गरजांसाठीही धडपडणारे शिक्षक 'प्राथमिक' वर्गांना शिकवतात. शिक्षकांच्या जीवनस्तरातला फरक त्यांच्या काम करण्याच्या प्रकृतीशी संबंधित आहे, पण उलट पद्धतीने. कमी पगार मिळवणाऱ्या शाळेच्या शिक्षकाला विद्यापीठातल्या प्राध्यापकाच्या तुलनेत कितीतरी अधिक काम करावं लागतं. असा एक समज आहे, की शाळेच्या शिक्षकाला शिकविण्यासाठी काही तयारी करावी लागत नाही, कारण एकदा एका वर्गाला शिकवल्यावर जुन्या सामग्रीवर काम भागतं. हा समज सरळ-सरळ शिक्षणाला संचययोग्य सामग्री मानण्याच्या वृत्तीशी निगडित आहे. शिक्षकांचं वय आणि विद्यार्थ्यांच्या वयातलं अंतर पाहता असा समज होऊ शकतो की सतत काही नवं न वाचता काम निभावता येतं. पण अशा परिस्थितीत शिक्षकांचं शिकवणं वर्गाच्या संदर्भात पाठ्यपुस्तकांइतकंच मर्यादित राहील, जसं मुलांचं असतं. ज्याप्रमाणे इयत्ता मुलांच्या ज्ञानाच्या सीमा निश्चित करतात; त्याचप्रमाणे शिक्षकाचं ज्ञानही सीमाबद्ध करतील. हळूहळू तो त्यातलं आकर्षण गमावू लागेल आणि मुलांनाही त्याचा कंटाळा येऊ लागेल. यातून बाहेर पडायचा एकच उपाय आहे. शिक्षकानं इयत्तेच्या सीमांचा विचार न करता सतत वाचत-लिहित असलं पाहिजे. अभ्यासक्रमाशी सरळ संबंधित साहित्यच वाचलं पाहिजे असं मुळीच नाही. कारण असं वाचन शेवटी शिक्षकाला मानसिक पातळीवर त्या वर्गातच बांधून टाकतं. वेगवेगळ्या प्रकारची माहिती, तसेच परिस्थिती समजण्याची क्षमता सतत ताजी ठेवण्यासाठीची साधनं शिक्षकाला मिळणं आवश्यक आहेत. यासाठी आवश्यक असलेली आर्थिक सुविधा सध्याच्या शिक्षणव्यवस्थेत केवळ उच्चशिक्षणाशी संबंधित शिक्षकांनाच मिळतात. अंशतः का होईना, पण मिळतात. शाळेतल्या शिक्षकाला त्याच्या वर्गाच्या चौकटीत बांधून टाकलं आहे आणि त्यात शिक्षकाबरोबर त्याचे विद्यार्थीही अडकलेले आहेत.

चढत्या वर्गांप्रमाणे शिक्षकांचं विभाजन शाळा आणि उच्चशिक्षणाच्या संस्था यांमध्ये जेवढं स्पष्ट आहे; तेवढाच भेद शाळेत प्राथमिक आणि माध्यमिक शाळांमध्येही

आहे. प्राथमिक शाळा म्हणायलाच प्राथमिक आहेत. कारण माध्यमिक आणि उच्च माध्यमिक इयत्तांनाच अधिक महत्त्व दिलं जातं. मी स्वत: कितीतरी शाळांमध्ये पाहिलं आहे, की 'वरच्या' वर्गांचे शिक्षक अनेकदा नाराज असतात कारण त्यांना 'खालच्या' वर्गांना शिकवायला सांगितलं गेलेलं असतं. एवढंच नाही, तर 'वरच्या' वर्गांच्या परिघातही वर्गप्रवृत्ती आहेच. अकरावीला शिकविणारा शिक्षक दहावी किंवा नववीला शिकविणाऱ्या शिक्षकांपेक्षा स्वत:ला अधिक योग्य समजतो. अशा क्षुद्र मनोवृत्तीमुळेच शिक्षक एका मोठ्या समूहाप्रमाणे काम करण्याच्या शक्यतेपासून वंचित राहतात. त्यांचे विविध वर्गांचे अनुभव व्यक्तिगत म्हणून उरतात आणि शाळा एक जिवंत संस्था न राहता एक निर्जीव सांगाडा म्हणून उरते. तिथं मुलांचं येणं-जाणं दैनंदिन प्रथा बनून राहते.



**संदर्भ:**


१. अम्मा का बेटा,'नीली आँखोवाले बगुले': शब्दकार, दिल्ली, १९७६
२. इवान इलिच :'न्यू डीस्कूलिंग सोसायटी': हार्पर अँड रो, न्यूयॉर्क, १९७०
३. फिलीप एरीज :'सेंच्युरीज ऑफ चाईल्डहूड': हार्मंडस्वर्थ, १९६०, पेंग्विन, १९७३
४. इवान इलिच :'आउटविटिंग द डेवलप्ड कंट्रीज': द न्यूयॉर्क रिव्ह्यू ऑफ बुक्स, नोव्हेंबर, १९६९
५. रिपोर्ट ऑफ द एज्युकेशन कमिशन, १९६४-६६, शिक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली, १९६६, पृ. १८३


*ज्ञानार्जन केलेल्या देशी लोकांचा एक विशिष्ट वर्ग निर्माण करण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहोत.*

**थॉमस मेकॉले, १८३६**

*संस्कृतीतील वैविध्य पाहता विद्यापीठांची, एका संघटित शिक्षित वर्गाच्या निर्मितीत मदत करण्याची भूमिका महत्त्वपूर्ण ठरते.*

**नुरुल हसन, १९७३**

# शिक्षण आणि विषमता

स्वातंत्र्यानंतर देशात समानाधिकार आणि लोकशाही समाजाच्या घटनात्मक संकल्पनांशी संबंधित अशा संस्था, शक्ती निर्माण करणं, वाढवणं हे आपण स्वीकारलं आहे असं मानलं तरी शिक्षण हे अशा महत्त्वपूर्ण शक्तींपैकी एक म्हणून ओळखून त्याचा उपयोग आपण अजिबात केलेला नाही. सरकारच्या या उदासीन धोरणामुळे शिक्षणाचा संबंध स्वातंत्र्योत्तर भारताऐवजी स्वातंत्र्यपूर्व भारताशीच अधिक राहिला आहे. इंग्रजी अमदानीच्या सुरुवातीच्या काळातच लोकशिक्षणाच्या स्वरूपाला एक आकार येऊ लागला होता आणि एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस त्याची एक निश्चित चौकट आणि धोरण स्पष्ट झालं होतं. या चौकटीचा आधार वसाहतवादी उद्देश पूर्ण करण्यासाठी शिक्षित वर्ग किंवा गुलाम तयार करणं हे धोरण होतं. विसाव्या शतकात स्वातंत्र्यलढ्याच्या पूर्वार्धात विद्यार्थ्यांनी भाग जरूर घेतला पण शिक्षण हे राजकीय साधनाच्या रूपात लढ्याचा भाग बनलं नाही. ही एक विचित्र वस्तुस्थिती आहे की आपल्या स्वातंत्र्य आंदोलनात समाजातल्या वेगवेगळ्या स्तरांत किंवा शिक्षणासारख्या महत्त्वाच्या क्षेत्रात स्वातंत्र्याची भावना न पेरताच हे आंदोलन यशस्वी झालं. गांधीजींना शिक्षण हे स्वातंत्र्यसंग्रामाचा महत्त्वाचा भाग व्हायला हवं होतं. विद्यार्थ्यांसमोर त्यांनी केलेल्या भाषणात त्यांची ही इच्छा स्पष्ट दिसते. एवढं यश तर त्यांना निश्चितच मिळालं की उच्च शिक्षणाचं वसाहतवादी रूप अनेक लोक समजू शकले आणि हजारो विद्यार्थ्यांचा अपेक्षाभंग झाला. पण तोही तात्पुरताच ठरला. मूलभूत शिक्षणाच्या बळावर गांधीजी इंग्रजांनी स्थापन केलेल्या स्पर्धायुक्त शिक्षणाचा पाया हलवू शकले नाहीत. स्वातंत्र्यानंतर त्यांचा मूलभूत शिक्षणाचा प्रयोग काही निवडक संस्थांपुरता मर्यादित राहिला आणि स्पर्धेवर आधारलेली वसाहतवादी शिक्षणपद्धती वाढत-पसरत गेली.

स्वातंत्र्यपूर्व काळात ज्याप्रमाणे शिक्षण हे परिवर्तनवादी राजकारणाचा भाग झालं नाही, त्याच पद्धतीनं स्वातंत्र्यानंतरही शासनाच्या उद्देशात आणि कार्यक्रमांत त्याचा वाटा मर्यादितच ठरला. इंग्रजी राजवटीत आखून दिलेल्या चौकटीत एका राष्ट्रीय कार्यक्रमाच्या अधीन राहण्याइतपतच शिक्षणाची भूमिका राहिली. नव्या परिस्थितीत शिक्षणाचे हे उद्देश दृश्य जरी राहू शकले नाहीत तरी प्रेरक मात्र होऊ शकले. आज आता स्वातंत्र्याची चार दशकं उलटल्यावर त्या उद्देशांची तपासणी काही हरवलेल्या गोष्टींच्या शोधासारखीसुद्धा उरलेली नाही. या उद्देशांपैकी एक महत्त्वाचं होतं ते शिक्षणाला नव्या पद्धतीच्या वर्णव्यवस्थेचा पाया बनवणं. जुन्या वर्णव्यवस्थेत शिक्षण हे सवर्णांची मक्तेदारी होतं तर नव्या वर्णव्यवस्थेत ते सवर्ण बनण्याचं साधन बनलं. शिक्षित लोकांचा अशिक्षितांशी संपर्क तुटला. कारण शिक्षणाचा पायाच उपजीविकेच्या साधनांपासून फटकून होता. शिक्षण हे नोकरी मिळविण्याचं एक साधन होतं. स्वयंपूर्ण बनण्याचं आणि समाजोपयोगी काम करण्याचं साधन नव्हतं.

आपल्या या वैशिष्ट्यामुळे या शिक्षणानं जवळपास सगळ्या भारतीय समाजाला दोन भागांत तोडून टाकलं. १) नोकरदार अल्पसंख्याक आणि नोकरी न करणारे बहुसंख्याक. ज्यांच्याकडे पिढीजात संपत्ती किंवा जातीवर आधारलेली ताकद होती असे काही थोडे लोकच या दोन्ही समूहांपासून वेगळे राहिले. नोकरदार अल्पसंख्याकांकडे व्यक्तिगत स्तरापासून राष्ट्रीय स्तरापर्यंतची ताकद होती. मोठ्या साहेबापासून चपराश्यापर्यंत सगळे आपापल्या कुवतीनुसार या ताकदीचा वापर करू शकत होते. हा वापर दोन दिशांनी होता. आपल्या खालच्या स्तरावरच्या कर्मचाऱ्यांवर आणि समाजातल्या बिगरनोकरदार अधिकांश लोकांवर. पहिल्या बाबतीत अधिकाराचा वापर कर्तव्याचं अंग म्हणून तर दुसऱ्या बाबतीत सहसा प्रदर्शनाचा भाग अधिक असायचा. स्वाभाविकच हे दुसऱ्या बाबतीतलं प्रमाण जास्त आहे. हा प्रयोग कोणत्याही शोषणापेक्षा वेगळा नव्हता आणि त्याचा आधार होता शिक्षण. हे शिकलेल्यांकडून अशिक्षितांचं शोषण होतं. शतकानुशतकं भारतात चालत आलेल्या शोषण-परंपरेत शिक्षणही सामील झालं. जात, लिंग, संपत्ती आणि वयाच्या आधारावर होणाऱ्या शोषणात शिक्षणानं एक नवं परिमाणच वाढवून दिलं.

स्वतंत्र भारतातल्या राजकीय सत्तेनं अल्पसंख्य नोकरदारांना संरक्षण दिलं, कारण यातच सत्तेचं स्वतःचं संरक्षण अनुस्यूत होतं. नोकरशाहीद्वारेच इंग्रज सत्तेनं या एवढ्या प्रचंड देशात केंद्राभिमुख व्यवस्था लागू केली. या जुन्या व्यवस्थेत बदल करणं नव्या

राजकीय सत्तेला केवळ अनावश्यकच वाटलं असं नव्हे; तर ती जुनी व्यवस्था तिला फायदेशीरच वाटली. इंग्रज सत्तेद्वारा प्रस्थापित नोकरशाही वारशात मिळाली नसती तर नव्या सत्तेला उद्देश आणि धोरणांसह व्यवस्थेत पूर्ण परिवर्तनाची अपेक्षा करणाऱ्या देशावर राज्य करणं कठीण गेलं असतं. सत्तेनं सोपा मार्ग निवडला. 'बिगरनोकरदार बहुसंख्याकांवर नोकरदार अल्पसंख्याकांचा अधिकार' या सिद्धांतावर आधारित धोरण राबवलं गेलं. आता मार्ग मोकळा होता. आगामी काळात दोन्ही वर्गांचं नातं अधिकाधिक शोषणमुखी होणं आणि शिक्षण हे शोषणाचं प्रमुख साधन होणं अटळच होतं. शिक्षणामुळे बिगरनोकरदार वर्गातली पुढची पिढी नोकरदार होऊ शकत होती. अशिक्षित समाजातली मुलं नोकरदार झाल्यावर अशिक्षित, गरीब लोकांना मदत मिळेल आणि अर्थात सत्तेचं विभाजन होत राहील हा एक सार्वत्रिक भ्रमच होता आणि आहेही. तत्त्वत: आणि व्यावहारिकदृष्ट्याही हे अशक्यच होतं, कारण आपल्या मुलाला सुशिक्षित, सामर्थ्यवान समाजात पाठविण्याचं अशिक्षित आईबापांकडे शिक्षण हे माध्यम होतं आणि त्या शिक्षणाचा उद्देश आधीपासूनच वेगळा होता, तो ठरलेलाच होता. हे शिक्षण म्हणजे खरंतर त्यांच्या मानसिक परिवर्तनाची सुरुवात होती. हे शिक्षणच मुळी सगळ्या परिस्थितीवर परिणाम करणारं असं साध्य होतं. निव्वळ माध्यम नव्हतं.

शिक्षण हे व्यक्तीच्या वैचारिक जडणघडणीत प्रत्यक्षच संबंधित असतं, ते तिला व्यापक वास्तवाचं भान देत नाही पण वास्तव वर्तमानाचे वैचारिक मापदंड निश्चित करतं. अर्थात वाचणाऱ्याची नुसती माहिती वाढत नसते, तर त्याचा दृष्टिकोनही यातून तयार होत असतो. मी वर म्हटलं त्याप्रमाणे इंग्रज सत्तेचा इथं शिक्षणपद्धत सुरू करण्यामागे एक निश्चित राजकीय उद्देश होता. स्वातंत्र्यानंतर देशाचं राजकीय धोरण आणि उद्देश यांच्यात बदल करण्याच्या घोषणा झाल्या. परंतु शिक्षणासह अनेक महत्त्वाच्या संस्थांचे राजकीय उद्देश मात्र पूर्वी होते तेच राहिले. यामुळे स्वातंत्र्यानंतर शिक्षण हे पांढरपेशा सुस्थिर समाजात अशिक्षिताच्या प्रवेशाचं साधन बनलं. तेव्हा पहिल्या पिढीतल्या शिकू पाहणाऱ्या मुलांचा सामना अशा समूहाशी झाला, ज्यांचे राजकीय उद्देश आधीच निश्चित झालेले होते. वस्तुत: ही सरळ सरळ त्यांच्या मानसिक परिवर्तनाची सुरुवात होती. अशिक्षित समाजातली मुलं, जी शिकून, लिहून-वाचून, नोकरी मिळवून थोडंफार सामर्थ्य मिळवू पाहत होती ती आता शिक्षणामुळे आपल्या वर्गजाणिवेपासून दूर जाऊ लागली होती. नोकरी हे त्यांच्या केवळ उत्पन्नाचं साधन नव्हतं; तर नोकरीद्वारे ही शिकलेली मुलं पांढरपेशा समाजाचे पूर्णत: घटक बनली होती. त्यांनी आपापल्या समाजात परतणं आता अशक्य होतं.

शिकलेल्यांच्या समाजात प्रवेश करण्यातही काही व्यावहारिक मर्यादा होत्या. एकोणिसाव्या शतकात इंग्रजांनी भारतात लागू केलेल्या शिक्षणपद्धतीत सगळ्यात उपेक्षित प्राथमिक शिक्षण होतं. याचं धोरण बनवणाऱ्यांचा उद्देश शिक्षणाला एक सामाजिक स्पर्धा बनवणं हा होता. यामुळे उच्चशिक्षण घेतलेल्यांचा एक वर्ग तयार होऊन त्याद्वारे आपले विचार पसरतील असा हेतू त्यामागे होता. काही भारतीयांवर इंग्रजी शिक्षणाचा परिणाम राष्ट्रीय भावनेच्या लाटेच्या रूपाने झाला, हे खरं आहे. पण या शिक्षणानं नोकरदार लोकसंख्याच वाढवली. सुरेशचंद्र शुक्ल यांनी केलेल्या अभ्यासावरून असं दिसतं,[१] की इंग्रज राजवटीनं एकोणिसाव्या शतकाच्या शेवटी भारतीय समाजातल्या पारंपरिक शाळा नष्ट करून आणि सरकारी शाळेची व्यवस्था सुरू करून शाळेचा अनौपचारिक, सांस्कृतिक आधार मोडला आणि शिक्षण औपचारिक, चौकटबद्ध करून टाकलं. इंग्रजी राजवटीचा यात एक हेतू हाही होता, की केंद्रीय सरकारी सेवायंत्रणेसाठी नोकर मिळावेत आणि याचा वापर वसाहतवादी शासनाच्या सुरुवातीच्या काळात ब्रिटिश ऑफिसर आणि सर्वसामान्य जनता यांच्यात संपर्कमाध्यम म्हणून करावा. ईस्ट इंडिया कंपनीद्वारे लूट करणारा वसाहतवादी शासनाचा जुना काळ संपला होता. इंग्लंडमधल्या औद्योगिक क्रांतीनंतर त्यांना एका विशाल बाजारपेठेची गरज होती. भारतातले पारंपरिक उद्योग-व्यवसाय नष्ट केले आणि स्पर्धेवर आधारित एक नवी समाजव्यवस्था निर्माण करता आली, तर भारतात ही बाजारपेठ आयती उपलब्ध होऊ शकत होती. पारंपरिक उद्योग नष्ट करण्याचं काम सरळ सरळ आर्थिक आणि प्रशासकीय मार्गांनी झालं आणि आपल्याला हितकर असं शैक्षणिक धोरण वापरून नवी समाजव्यवस्था निर्माण करण्यात आली. शिक्षणाला स्पर्धेचा आधार देण्यासाठी प्रमाणपत्राची पद्धत आणली गेली. संपूर्ण शिक्षणालाच जे एका क्रमबद्ध तयारीचं रूप देण्यात आलं, ते आजवर तसंच आहे. शिकताना इयत्तावार प्रमाणपत्र देण्याचा सरळ परिणाम शिक्षण आणि जगणं, शिक्षण आणि उत्पन्न यांचा संबंध तोडण्यात झाला. अशिक्षित समाजातील जी मुलं शिकण्यासाठी पुढे आली, ती आपल्या वडिलोपार्जित उद्योग-व्यवसायापासून आणि त्या वातावरणापासूनही तुटली. त्यात त्यांना वर्गातली स्पर्धा आणि तिची अडथळ्यांची शर्यत स्वीकारावी लागली. पण केवळ असा स्वीकार करून शिक्षणाचा वारसा मिळालेल्यांच्याबरोबर स्पर्धा करणं त्यांना शक्य नव्हतं. स्वाभाविकच या नव्या स्पर्धकांची धाव मर्यादित असणार होती. साधनांची मर्यादा आणि कठीण स्पर्धेमुळे

ते बरोबरी करू शकत नव्हते. स्थानिक किंवा व्यक्तिगत पातळीवर यशस्वी होऊ शकतील, अशा स्थानांवर यातले काही पोहचू शकले. दुर्दैव असं, की ते आपल्या स्वत:च्या जगापासून तुटले आणि सुशिक्षितांच्या आतल्या वर्तुळातही पोहचू शकले नाहीत.

जी स्पर्धा त्यांनी स्वीकारली होती, त्या स्पर्धेच्या अटी आणि शर्ती शिकल्या-सवरल्या समाजाकडूनच निश्चित झालेल्या होत्या. सुसंस्कृत वागणं-बोलणं, पुस्तकी ज्ञान आणि जैसे थे वादी वृत्तीबरोबर महत्त्वाची अट होती, ती इंग्रजीचा वापर करण्याची क्षमता. अठराव्या शतकातच जेव्हा इंग्रजी सत्ता आपली मुळं पसरत होती तेव्हा राज्यसत्तेद्वारे ख्रिश्चन धर्माच्या प्रचारकांनी इंग्रजीची शिक्षणाचं माध्यम म्हणून उपयुक्तता जाणली होती. इंग्रजीच्या प्रसाराची उपयुक्तता आजही इंग्रजी जग नीटपणे समजून आहे. इंग्रजी स्वतंत्र भारताला एका व्यवस्थेच्या आत्म्याच्या रूपात वारसा म्हणून मिळाली. स्वातंत्र्यानंतर इतक्या वर्षांनी शाळेत शिकण्यासाठी इंग्रजी माहीत असणं काही प्रदेशांमध्ये आवश्यक नसेल, पण सामाजिक प्रतिष्ठेचं दालन इंग्रजी बोलूनच उघडलं जाऊ शकतं. आपल्या शिक्षणव्यवस्थेचं एक कायमचं अंग म्हणून इंग्रजी असली तरी भाषा म्हणून इंग्रजीचा अधिकार आणि लाभ फक्त ज्या वर्गात ती सवयीनं बोलली जात होती, त्याच वर्गाला मिळाला. पुस्तकी इंग्रजी शिकून या वर्गाच्या बाहेरच्या परिघापर्यंत जाणंच फक्त शक्य आहे. मात्र आतल्या केंद्रीय भागावरचं आरक्षण अजूनही आहे. असं आरक्षण असणाऱ्यांचीच मुलं सत्तेच्या जागी सहज पोहचतात. प्रादेशिक भाषांमधून किंवा हिंदी भाषिक मुलांना मात्र इंग्रजीच्या साधनेसाठी कठोर परिश्रम करावे लागतात आणि मग त्यातून निवडक, भाग्यवान स्पर्धक सत्तासोपान चढून जाऊ शकतात. ज्याप्रमाणे शिक्षण हे केवळ माध्यम नाही, त्याचप्रमाणे इंग्रजी ही केवळ भाषा नाही. एक संस्कार, मानसिकतासुद्धा आहे. इंग्रजी शिकण्यातच इंग्रजी मानसिकता स्वीकारणंही अनुस्यूत आहे. भारतीय संदर्भात, या स्पर्धेच्या व्यवस्थेत यश मिळवून देणाऱ्या मध्यमवर्गीय 'गुणां'नी ही मानसिकता तयार होत असते. आपल्या वैशिष्ट्यांचं भान, आपल्या वर्गाच्या सुरक्षेसाठी आणि प्रतिष्ठेसाठी जागरूक असणं आणि सर्वसामान्य जनतेविषयी तुच्छता हे ते गुण आहेत.

अशिक्षित आणि शिक्षितांच्या मुलांमधल्या स्पर्धेला आणखी एक मिती आहे, ती म्हणजे संधीची विषमता. भारतीय शिक्षण जुन्या काळापासून असं विषम संधींवर आधारलेलं आहे. जातीव्यवस्था पूर्वीच्या विषमतेचं मूळ होतं आणि आजही समाजात मिळणाऱ्या संधीचा आधारही प्रामुख्यानं जातच आहे. यात इतरही काही घटक आहेत. मुलांच्या आई-वडिलांची आर्थिक स्थिती, ते शहरात राहतात की खेड्यात, कोणत्या शाळेत ते मूल शिकतं इत्यादी. यात पहिले दोन घटक खरंतर तिसऱ्या घटकात सामावलेले आहेत. तरीही भारतात अमेरिका आणि कॅनडासारखी परिस्थिती नाही. तिथं शाळांची आर्थिक परिस्थिती त्या प्रांतातल्या एकूण संपत्तीवरील करावर अवलंबून असते. तरीही भारतात माता-पित्यांची आर्थिक परिस्थिती आणि शाळेचं खेड्यात, तालुक्यात किंवा शहरात असणं असे घटक शिक्षणाच्या दर्जावर परिणाम करतात. भारतात ढोबळ अर्थाने शालेय शिक्षण तीन वर्गांत विभागलेलं आहे. यात सगळ्यात जास्त संख्या सरकारी शाळांची आहे. आणि सगळ्यात कमी 'पब्लिक' स्कूल म्हणवणाऱ्या संस्थांची. यांच्यामध्ये धार्मिक उद्देशांवर व आधारावर चालणाऱ्या संस्था किंवा पैसे घेऊन शिक्षण देणाऱ्या पण पारंपरिक आणि दुकानवजा संस्था आहेत. स्वातंत्र्योत्तर काळात शालेय शिक्षणाच्या क्षेत्रात मिश्रव्यवस्थेचं धोरण राबवलं गेलं. म्हणजे शिक्षणावर सरकार किंवा स्थानिक नागरी प्रशासनाचं पूर्ण नियंत्रण लागू केलं गेलं नाही. अल्पसंख्याकांना आपल्या धर्मप्रसारासाठी शाळा काढण्याची मुभा संविधानाने दिली आहे. शाळा सुरू करून पैसे कमावण्यावरही काही बंदी लावली नाही. एकोणिसाव्या शतकात सुरू झालेल्या 'पब्लिक' स्कूलची व्यवस्था होती तशीच राहू देण्यात आली. या सरमिसळ शालेय शिक्षणाचा एक परिणाम असा झाला, की शिक्षकांच्या आर्थिक आणि त्या त्या संस्थांमधील परिस्थितीत एकरूपता येऊ शकली नाही. परंतु यापेक्षा वाईट परिणाम म्हणजे शालेय शिक्षणाच्या क्षेत्रात पैसा मिळवता येतो असा चुकीचा संकेत मिळू लागला. आधीच भारतीय समाजात सत्तेची वाटणी विषमतेवर आधारित असताना समांतर शिक्षणातही ही विषमता किंवा असमानता टिकवण्याचं कामच 'पब्लिक' स्कूल म्हणवणाऱ्या संस्थांनी केलं.

एकोणिसाव्या शतकात 'पब्लिक स्कूल'चं स्वरूप इंग्लंडमध्ये निश्चित झालं. इंग्लंडमध्ये जवळपास अडीचशे पब्लिक स्कूल्स आहेत, त्यातल्या जवळपास एकतृतीयांश शाळा म्हणजे आधी 'ग्रामर स्कूल्स'[२] होत्या. कालांतराने यातल्या काहींना स्थानिक पातळीवर अधिक व्यापक महत्त्व मिळालं आणि देशभरातल्या उच्च मध्यमवर्गीय घरांतली आणि उमराव घराण्यांतली मुलंही या शाळांमध्ये शिकायला येऊ लागली. एकोणिसाव्या शतकाच्या काळात या शाळांनी आपली ओळख निर्माण केली होती. या शाळांची मुख्य वैशिष्ट्यं होती-- ख्रिस्ती मानवतावाद, अष्टपैलुत्वाला प्रोत्साहन, प्रायोगिकत्वापेक्षाही सैद्धांतिक ज्ञानाकडे कल आणि मानवी व्यवहारातल्या वैज्ञानिक पद्धतींच्या प्रयोगांबद्दल तीव्र अनास्था.[३] कठोर शिस्त, परिश्रम, पारंपरिक विषयांचं अध्ययन आणि लिहिण्या-वाचण्याचा दर्जा या गोष्टींना या शाळांनी आपली

रीत आणि ओळख बनवण्याचा प्रयत्न केला. ही व्यवस्था राबवण्यासाठी त्यांनी अभिजनवर्गाची मदत घेतली. या वर्गाच्या मुलांना उत्तमोत्तम शिक्षण देऊन सामाजिक आणि राजकीय प्रतिष्ठेच्या उच्च पदांपर्यंत पोहोचवणं या शाळांचं उद्दिष्ट बनलं. एकोणिसाव्या शतकातल्या इंग्लंडला जगभर पसरलेल्या त्यांच्या वसाहतींसाठी सक्षम आणि निष्ठावान अधिकाऱ्यांची गरज होती. स्वतः इंग्लंडनं आपल्या जुन्या साम्राज्यशाहीच्या लोकशाहीकरणाद्वारे नोकरशाहीसाठी प्रशासक पुरवणं आपलं कर्तव्य मानलं. या शाळांचं काम होतं अभिजनांच्या मुलांना सत्तेच्या वापरासाठी तयार करणं. यासाठी 'पब्लिक स्कूल्स'नी आपलं वैशिष्ट्य आणि मुलांचा उच्च सामाजिक स्तर यांचा मेळ साधणारी एक शैली विकसित केली. हळूहळू मध्यमवर्गीय महत्त्वाकांक्षी लोकांसाठी पब्लिक स्कूल्स म्हणजे सामाजिक प्रतिष्ठेच्या स्पर्धेत प्रगतीचं प्रतीक झालं. या शाळांना एक प्रकारच्या शैक्षणिक यंत्रणेचं रूप मिळालं आणि याद्वारे सत्ता आणि प्रतिष्ठा मिळत होती. बराच काळ अजमावल्यानंतर या यंत्रणेची विश्वासार्हताही वाढली होती.

इंग्लंडमध्ये आज दरवर्षी जवळपास पंधरा हजार मुलं, जी त्यांच्या वयाच्या एकूण मुलांच्या २% आहेत, पब्लिक स्कूलमध्ये प्रवेश घेतात. सर्वेक्षणांमधून असं दिसून आलं आहे, की व्यावसायिक-व्यापारी संस्थांच्या सर्वोच्च पदांवरच्या तिघांपैकी एक आणि इतर विविध सेवांमधल्या तिघांपैकी दोघेजण 'पब्लिक स्कूल'मधून शिकलेले आहेत.

भारतातल्या पब्लिक स्कूल्सचा इतिहास इंग्लंडमधल्या पब्लिक स्कूल्सपेक्षा थोडा वेगळा आहे. सध्याच्या काळात पब्लिक स्कूल म्हणवणाऱ्या किती संस्था आहेत, हे सांगणं अवघड आहे. कारण आता शुल्क घेऊन शिक्षण देणाऱ्या जवळपास प्रत्येक नव्या संस्थेचं उपनाम इंग्लिश मिडिअम पब्लिक स्कूल असं असतं. देशभरातल्या जुन्या, प्रतिष्ठेच्या पब्लिक स्कूल्सची संख्या नगण्य आहे. त्यांचं शुल्कही हजारो रुपये महिना असं प्रचंड आहे. यातल्या काहींची सुरुवात एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात झाली. इंग्रजी राजवटीत मिळालेल्या प्रोत्साहनानं काही लोकांनी या खाजगी शाळा काढल्या. यात इंग्रज आणि भारतीय दोन्ही होते. अठराव्या शतकातच भारतात ख्रिस्ती मिशनऱ्यांनी शालेय शिक्षणाच्या क्षेत्रात पाय रोवायला सुरुवात केली होती. यात त्यांना असंख्य राजकीय अडचणींचा सामना करावा लागला होता. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटी शेवटी व्हॉइसरॉय कर्झनच्या धोरणाप्रमाणे शिक्षणावरचं सरकारचं नियंत्रण घट्ट व्हायला सुरुवात झाली. याचा अप्रत्यक्ष हेतू शाळा-कॉलेजातून फोफावणाऱ्या राष्ट्रभावनेच्या प्रसाराला रोखणं हा होता. या धोरणाचा एक परिणाम म्हणजे ख्रिस्ती मिशनरी आणि खाजगी संस्थाचालकांवरही मर्यादा आली. आपल्या अस्तित्वाच्या सुरक्षिततेसाठी त्यांनी सधन वर्ग, शिक्षण आणि कठोर शिस्त यांची ढाल वापरली. इंग्लंडमधल्या पब्लिक स्कूल्सना एव्हाना एक आकार आणि रूप प्राप्त झालं होतं. ही इंग्लिश स्कूल्स वरील भारतीय स्कूल्ससाठी अनुकरणीय ठरली. इंग्रजीचा महिमा तर या शाळांमध्ये आधीपासूनच होता. आता गरज होती आपल्या या दराऱ्याला एक टिकाऊ सामाजिक आधार मिळवून देण्याची. इंग्लंडमधल्या शाळांप्रमाणेच त्यांनीही नोकरशाहीतल्या मानाच्या खुर्च्या हे आपल्या मुलांसाठीचं ध्येय ठरवलं. त्यासाठी लागणाऱ्या अर्हतांची तयारी आपल्या शिक्षणपद्धतीत त्यांनी समाविष्ट करून घेतली. इंग्रजीवर प्रभुत्व, अष्टपैलुत्व दर्शवणाऱ्या आवडी (ज्याची झलक भारतीय प्रशासकीय सेवेच्या सामान्य ज्ञानाच्या प्रश्नपत्रिकेत मिळते.) शिस्तबद्ध आणि शिष्टाचारयुक्त व्यवहारवर्तन, कामाच्या प्रत्यक्ष अनुभवाऐवजी पुस्तकी ज्ञानाला महत्त्व या गोष्टी भारतीय पब्लिक स्कूल्समध्ये महत्त्वाच्या होत्या आणि त्या इंग्लंडमधल्या पब्लिक स्कूल्सच्या मुख्य उद्देशांशी मिळत्याजुळत्या होत्या.

स्वातंत्र्यानंतर पब्लिक स्कूलच्या ध्येय-धोरणांत आणि पद्धतीत काही बदल झाला नाही. या शाळा म्हणजे श्रीमंत कुटुंबातल्या, मोठ्या अधिकाऱ्यांच्या आणि मंत्र्यांच्या मुलांसाठीचे अड्डे बनले. मुलं खोल्यांमध्ये किंवा ओसरीवर बसवली जातात अशा देशभरातल्या लाखो शाळांमध्ये आणि या पब्लिक स्कूल्समध्ये काहीही साम्य नव्हतं. उघड उघड या शाळा शालेय शिक्षणाच्या मुख्य प्रवाहापासून दूर होत्या आणि समाजातल्या समृद्ध, संपन्न आणि मागासलेल्या लोकांमधलं अंतर वाढवत होत्या. याचा परिणाम म्हणून आजही सरकारी आणि खाजगी क्षेत्रातील उच्च पदांवरील अधिकांश व्यक्ती पब्लिक स्कूलमधून आलेल्या दिसतील.

पब्लिक स्कूलबाबत सरकारचा दृष्टिकोन नेहमीच सौम्य असत आला आहे. खरं तर पब्लिक स्कूलबाबत सरकारी पातळीवर कधीही गंभीर वाद निर्माण झाले नाहीत. साधारण समज असा आहे, की शिस्त आणि शिक्षणाच्या बाबतीत पब्लिक स्कूलचा दर्जा फारच उच्च असल्याने त्यांच्या मर्यादित वर्तुळाला सहन केलं पाहिजे. हा परीघ वाढवण्याच्या घोषित उद्देशासाठी १९७३ साली सरकारनं एका नव्या योजनेअंतर्गत पब्लिक स्कूल्समध्ये मागासवर्गीय मुलांसाठी राखीव जागा निश्चित केल्या. शाळेचं भरमसाट शुल्क आणि इतर खर्चासाठी सरकारी शिष्यवृत्ती द्यायचा निर्णय झाला. ५०० राखीव जागा ठेवाव्यात असं ठरलं. पालकांचं मासिक उत्पन्न ५०० रुपयांपेक्षा कमी असावं, ही शिष्यवृत्तीसाठीची अट ठरली. १५% जागा

अनुसूचित जाती आणि भटक्या आणि विमुक्त जातींसाठी राखीव ठेवण्यात येतील असं ठरलं.

आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांतील मुलांना पब्लिक स्कूल्समध्ये शिकण्यासाठी सरकारी मदत देण्याची एक योजना इंग्लंडमध्ये १९६८ साली जाहीर करण्यात आली होती. त्या योजनेशी ही भारतीय योजना मिळतीजुळती होती. ब्रिटिश पब्लिक स्कूल्सच्या मुख्याध्यापकांना काळजी ही होती, की त्यांच्या शाळा मुख्य प्रवाहापासून अलग पडल्या आहेत आणि पब्लिक स्कूल्सना होणारा एकूण विरोध यामुळे इंग्लंडमध्ये ही योजना जाहीर करण्यात आली होती. भारतात असे वादविवाद किंवा चिंता नव्हती. पण ही गोष्ट स्पष्ट आहे की, दुर्बल घटकांतील मुलांना या शाळांमध्ये प्रवेश देऊन सरकारला या शाळांना एक सामाजिक वैधता मिळवून द्यायची होती. या शाळा केवळ श्रीमंत मुलांसाठीच आहेत, असा आरोप तत्त्वतः तरी यामुळे करता येणार नव्हता. अशा शाळांमधून दिलं जाणारं शिक्षण उच्च प्रतीचं आहे आणि असं जर कुठे ते दिलं जात असेल तर ते बंद करायची काय आवश्यकता आहे, असं शिक्षणतज्ज्ञांचं मत होतं. पब्लिक स्कूलमधून केवळ अभिजनवर्गाचे संस्कार होतात आणि त्यामुळे समाजात समतेचं वातावरण निर्माण होऊ शकत नाही, हे वास्तव त्यांना माहीत नव्हतं, असं नाही. पण उघडपणे तसं मान्य करायला ते तयार नव्हते. स्पर्धेशिवाय प्रगती नाही अशी त्यांची धारणा अजूनही आहेच. सामाजिक डार्विनवादावरच्या त्यांच्या विश्वासामुळेच भारतात पब्लिक स्कूल्सना सामाजिक आणि राजकीय वैधता मिळाली आहे.

गरीब आणि दलित वर्गांतल्या मुलांना श्रीमंत मुलांबरोबर शिक्षण देण्याचे काही मानसिक आणि राजकीय परिणाम होऊ शकतात. देशातल्या अधिकांश पब्लिक स्कूल्सचे माध्यम इंग्रजी आहे. या माध्यमात मुलांना शिकवणारे पालक ज्या आर्थिक वर्गात राहतात, तो वर्ग इंग्रजीनं बांधलेला आहे. त्यांची व्यक्तित्वं आणि जगणं इंग्रजीविभूषित आहे आणि देशी भाषा आणि आचार-विचार यांना त्यात अत्यंत खालचं असं स्थान आहे. इंग्रजीची चरबी वैचारिक पोकळीला झाकते. या वर्गातल्या मुलांबरोबरचं गरीब आणि दलित मुलांचं साहचर्य या दुसऱ्या मुलांसाठी अत्यंत विषम मानसिक परिस्थिती निर्माण करेल. भाषेच्या संकटापासून सुरुवात होऊन आर्थिक विषमतेवर आधारित आरोग्य, आत्मविश्वास, मानसिक क्रियाशीलता यांवर परिणाम होऊन गरीब मुलांचं व्यक्तिमत्त्व संपूर्णपणे डळमळीत होईल. त्यातून सावरण्यासाठी एकच मार्ग त्यांच्याकडे असेल, तो म्हणजे आपल्या बहुसंख्य सहाध्यायींच्या जगण्याच्या पद्धतींना आदर्श मानणं. यामुळे त्यांच्या अस्तित्वाला तात्कालिक सुरक्षितता मिळाली तरी त्यासाठी आपला अहम्, मनोबल आणि आत्मविश्वासाचा त्यांना बळी द्यावा लागेल.

हा व्यक्तिगत पराभव झाला, पण अशा समृद्ध आणि 'अभिजात' वातावरणात वाढलेलं गरीब, दलित मूल आपल्या वर्गातल्या लोकांपासून मानसिक दृष्टीनंही तुटेल. त्याच्यावर लादले गेलेले उच्चवर्गीय संस्कार त्याच्या वर्गाची जाणीव नव्हे, तर प्रतिगामी जाणीव निर्माण करतील. ही प्रतिगामी जाणीव शासनाच्या धोरणातच अनुस्यूत आहे, असा संशय घ्यायला वाव आहे. गरीबवर्गातल्या तडफदार-चमकदार मुलाला 'अभिजात' वातावरणात वाढविण्याचा उद्देश हाही असू शकेल, की या वर्गातून येणारी संघर्षशील जाणीव सुरुवातीलाच दाबून टाकता येईल. हेतू हा असो वा नसो, परिणाम तोच होईल. भारतीय समाजातल्या या वर्गाची नियतीच 'स्व'चं चिरडणं ही झाली आहे. त्यामुळे ज्या क्रौर्यानं त्यांच्या आयुष्याची परवड झालेली आहे, ते पाहता या वर्गातल्या मुलांकडून बड्या लोकांच्या व्यवस्थेतून निर्माण झालेल्या दहशतीला संघर्षासाठीची शक्ती म्हणून बदलणं शक्य होईल, असं वाटत नाही. ज्या थोड्याफार मुलांमध्ये ही प्रक्रिया घडू शकते ते कदाचित 'पब्लिक' स्कूलमध्ये जातील.

विशेष योग्यतेच्या दलित मुलांसाठी राखीव जागा ठेवणं आणि त्यातून विषमता कमी करण्याचा प्रयत्न करणं भारताच्या आर्थिक आणि राजकीय धोरणांशी सुसंगतच आहे. त्याच व्यापक पार्श्वभूमीवर हे प्रयत्न तपासून पहायला हवेत. आपण समाजातले विभाजक नष्ट करू इच्छित नाही कारण आपल्यावर मुळात विषमतेचे संस्कार झालेले आहेत. फक्त हे विभाजक उघड उघड दिसू नयेत; त्यांना सामाजिक वैधतेचं आवरण मिळावं अशी आपली अपेक्षा असते. ज्या प्रेरणेनं एखादा धनवान आश्रम सुरू करतो, त्याच प्रेरणेनं भांडवलदार गरीब विद्यार्थ्यांना महागडे शिक्षण मिळवून देईल. त्याच्या हेतूबद्दल शंका घेणंही व्यर्थ आहे. गरीब मुलांना 'बड्यां'च्या मुलांबरोबर त्यांना खरोखरीच शिकवायची इच्छा असती, तर गरीब मुलांसाठी त्यांनी विशेष योग्यतेची कसोटी ठेवली नसती. बड्यांची मुलं पैशाच्या बळावर शिकतील आणि गरिबांची त्यांच्या योग्यतेच्या बळावर त्याच्या सोबत बसण्याची परवानगी मिळवतील. अशा सहअस्तित्वातून समतेचा आग्रह टिकू शकणार नाही.

नवी दिल्ली नगरपरिषदेने मागच्या दशकात 'नवयुग पब्लिक स्कूल' या नावाने एक संस्था स्थापन केली होती. त्यात प्रवेशासाठी दिलेल्या एका शब्दातूनच नगरपरिषदेचा हेतू ध्वनित होतो. नगरपरिषद नागरी संस्था असल्याने उघड उघड असं म्हणता येणं शक्य नव्हतं की 'नवयुग'मध्ये शुल्क देऊ शकणाऱ्यांच्याच मुलांना प्रवेश मिळेल. मग त्यांनी असा मार्ग शोधला ज्यामुळे त्यांना योग्य शुल्क देऊ शकणारी

मुलंही मिळतील आणि ते लोकशाहीविरोधीही वाटणार नाही. जाहिरातीतलं त्यांचं चलाख वाक्य होतं : 'नवयुग पब्लिक स्कूल फॉर गिफ्टेड चिल्ड्रन'. 'गिफ्टेड' शब्दाला श्लेष आहे. त्यानुसार प्रतिभा म्हणजे निसर्ग आणि नियतीचं दान. ती मिळवायला स्वत: असं काही करावं लागत नाही. नवयुग पब्लिक स्कूलचा उद्देश म्हणजे अशीच मुलं मिळवणं, ज्यांची औपचारिक परीक्षा घेऊन ते 'गिफ्टेड' असल्याची साक्ष काढता येईल.

या शाळेत कोणती मुलं येतील? तर मध्यमवर्गातल्या अशा पालकांची, ज्यांच्याकडे जुन्या, महागड्या पब्लिक स्कूलमध्ये प्रवेश घेण्यासाठी पिढीजात प्रतिष्ठा, पैसा किंवा पदं नाहीत. स्वातंत्र्यानंतर भारतात महानगरं आणि गावांच्या विकासाबरोबर मध्यमवर्गाचाही प्रचंड विस्तार झाला आहे. त्यांच्या गरजा पूर्ण करणाऱ्या आर्थिक, सांस्कृतिक संस्था वाढल्या आहेत. एकीकडे विजेवर चालणाऱ्या वस्तूंची विक्री वाढली आहे तर दुसरीकडे विमा कंपन्या, फिल्मकंपन्या आणि विशेष सोयीसुविधा असलेल्या शाळा वाढल्या आहेत. जुन्या पब्लिक स्कूल्सच्या पद्धतीच्या, भरपूर शुल्क घेणाऱ्या शाळा जवळपास गल्ली-बोळात वेगाने उघडताहेत. स्थानिक पातळीवरील एखादी संघटना किंवा वेगवेगळ्या धंद्यांमधले व्यापारी या शाळांचे संचालक असतात. या आणि सरकारी शाळांमध्ये कोणतीच स्पर्धा नाही, कारण समाजातला कोणताही नागरिक आपलं मूल तिथे पाठवू शकतो. समृद्धीच्या मागे लागलेल्या मध्यमवर्गाच्या मुलांना या नवीन 'पब्लिक स्कूल्स' इतर बहुजनांच्या मुलांपासून दूर ठेवून शिक्षण देतात. इंग्रजी कशी का असेना, बोलायला शिकवतात. साहेबांसारख्या सवयी लावतात. पिंजऱ्यासारख्या रिक्षा, व्हॅन्समधून घरापर्यंत सोडण्याची व्यवस्था करतात. मध्यमवर्गाचा त्या व्यवस्थित गैरसमज करवून देतात, की ते कुंभार, न्हावी, धोब्यांपेक्षा वरच्या स्तरावरचे आहेत. मध्यमवर्गाचा हा प्रिय गैरसमज आहे.

शुल्क घेऊन शिक्षण देणाऱ्या या खाजगी स्वायत्त आणि सरकारी शाळांची संख्या सतत वाढत आहे. विशेष सोयीसुविधा देणाऱ्या या शाळा विषमतापोषक आहेतच, पण सरकारी शाळा समतापोषक आहेत असंही नाही. १९६६ च्या शिक्षण आयोगानं संपूर्ण देशभरात 'नेबरहुड' शाळांची शिफारस केली होती, परंतु नंतरच्या वर्षांत शिक्षणाचं धोरण मर्यादित प्रमाणात या विशेष सोयीसुविधा असणाऱ्या शाळा सुरू करण्याचं राहिलेलं आहे असं दिसतं. यांचा जाहीर उद्देश होता की खालावणारा दर्जा थांबवण्यासाठी आपल्या भागातील सर्वसाधारण शाळांना मार्गदर्शन करणं. 'बहुउद्देशीय', 'आदर्श' किंवा 'केंद्रीय' शाळा याच उद्देशानं सुरू करण्यात आल्या. आपल्या शेजारच्या शाळांना मार्गदर्शन वगैरे या शाळा काही करू शकल्या नाहीत; कारण त्यांच्यात आणि इतर शाळांमध्ये संपर्क आणि परस्पर सहकार्याच्या शक्यता खूपच कमी होत्या. त्यामुळे उलट या शाळा बिनसरकारी विशेष सोयीसुविधा असणाऱ्या शाळांप्रमाणे, मध्यमवर्गीयांच्या मुलांना मागासवर्गीय मुलांपासून वेगळं ठेवण्याचं साधन बनल्या. अभिजाततेचा सगळ्यात हिडीस विकास एकूण ६३३ केंद्रीय शाळांनी केला. केंद्रसरकारच्या सेवेत असणाऱ्या अधिकाऱ्यांची मुलं या शाळांमधून शिकतात. केवढ्या सहजतेनं आपण या मुलांसाठी वेगळी शालेय व्यवस्था असणं मान्य केलंय ! समतावादी समाजाच्या मानसिकतेपासून आपण किती दूर आहोत, हेच यावरून दिसतं.

१९८६ सालच्या 'नव्या' शिक्षण धोरणात प्रस्तावित नवोदय विद्यालयांच्या सुरुवातीनं भारतीय शिक्षण व्यवस्थेचं विषमतामूलक चरित्र अधिकच स्पष्ट झालं आहे. या योजनेचं समर्थन करताना असं म्हटलं गेलं आहे, की ग्रामीण भागातल्या हुशार विद्यार्थ्यांना पुढं जाण्याची संधी मिळत नाही, त्यामुळे प्रत्येक जिल्ह्यात अशी एक सरकारी शाळा असावी, जिच्यात हुशार ग्रामीण विद्यार्थ्यांना अधिक चांगल्या दर्जाचं शिक्षण मिळेल. नवोदय विद्यालयात तूर्तास ११ वर्षं वयाच्या हुशार विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जातो. या योजनेत जिल्हास्तरावर दोन सैद्धांतिक दोष आहेत. एकतर प्रतिभा किंवा हुशारी खात्रीलायकरीत्या लहानपणातच ओळखणं हे अतिशय अवघड काम आहे. प्रतिभेचं कोणतं रूप पूर्ण तऱ्हेनं केव्हा ओळखणं शक्य आहे याबाबत मानसशास्त्रही संभ्रमात आहे. लहानपणातच बुद्धिमत्ता किंवा प्रतिभा ओळखणं योग्य समजणारे बहुधा प्रतिभेची रूढ, मर्यादित समजूतच बाळगून असतात. अशा समजुतीतून नवोदय विद्यालयंही वाचलेली नाहीत. हुशार मुलांना विशिष्ट वातावरणात ठेवल्यानं हुशारी वाढेल, हे या योजनेतलं अध्याहृत गृहीतकच दुसरा सैद्धांतिक दोष आहे. उपलब्ध पुरावे याच्या उलट आहेत. त्यांनुसार मुलांचा बुद्धिमत्ता स्तर समान गृहीत धरून नैसर्गिक गतीनं वाढण्याची संधी मिळवणं मुलं ही गोष्ट फक्त शिक्षकांकडून, पुस्तकांतूनच शिकत नाहीत तर परस्परांकडूनही शिकतात. वेगवेगळ्या आर्थिक, सांस्कृतिक, कौटुंबिक वातावरणातून आलेल्या मुलांनी एकत्र शिकणं त्यांच्यात नव्या शैक्षणिक शक्यता निर्माण करतं.

हे दोष असूनही सरकारनं नवोदय विद्यालयाची योजना पुढे रेटायची दोन कारणं आहेत. एक तर देशातल्या सगळ्या मुलांना उत्तम शैक्षणिक साधनं उपलब्ध करून देण्याची इच्छा आणि आशा आपल्या शासनाला नाही. आणि त्याची गरजही त्यांना वाटत नाही. कारण मुलांचं शिक्षण हा काही सार्वजनिक चिंतेचा किंवा

लोकचळवळीचा मुद्दा नाही. प्रत्येक जिल्ह्यात एक शाळा चालवून कौतुक करवून घेता येत असेल तर जिल्ह्यातल्या इतर शाळा व्यवस्थित चालवायची काय गरज आहे? दुसरं कारण म्हणजे सध्याच्या राजकारणात ग्रामीण सधन वर्गाला खूश ठेवण्याला बरंच महत्त्व आहे. बुद्धिमत्ता चाचणीत राखीव जागा सोडून इतर जागांसाठी उशिरा का असेना योग्य मुलं मिळतील. त्यांचे आई-वडील पैसे खर्चून परीक्षेची तयारीही करवून घेतील. एरवीही पाचवीपर्यंत दोनतृतीयांश मुलं शाळा सोडतातच. या गळतीमुळे ग्रामीण भागातल्या निर्धन नागरिकांची मुलं शिक्षणासाठी अयोग्य म्हणून सिद्धच करून दाखवली जातात. नवोदय विद्यालयाच्या सहाव्या इयत्तेसाठी त्यांना वेगळ्या रीतीनं 'अयोग्य' म्हणून दाखवायची गरज उरत नाही.

■

**संदर्भ :**

१. सुरेशचंद्र शुक्ल, 'एलिमेंटरी एज्युकेशन इन ब्रिटिश इंडिया ड्युरिंग लेटर नाइनटीन्थ सेन्च्यूरी' दिल्ली, केंद्रीय शिक्षण संस्था, १९५९
२. 'ग्रामर स्कूल' हा शब्द इंग्लंडमध्ये मध्ययुगात चर्च आणि बिगरधार्मिक संस्थांद्वारा काढलेल्या शाळांसाठी वापरत. बराच काळ या शाळांमध्ये लॅटिन व्याकरणाला बरंच महत्त्व होतं.
३. एडवर्ड ब्लिशेन (संपादक), ब्लॉंड्स एन्सायक्लोपिडिया ऑफ एज्युकेशन, लंडन, १९६९ मध्ये 'पब्लिक स्कूल्स'च्या अंतर्गत.

*समाजशास्त्रीय कल्पनाशक्तीचं वैशिष्ट्य म्हणजे समाजाकडे पाहण्याच्या एका दृष्टिकोनाकडून दुसऱ्या दृष्टिकोनाकडे जाण्याचे असे वैचारिक बळ देणं आणि त्यातूनच समाजातल्या विविध समूहांचं समाधानकारक सामर्थ्य निर्माण करणं.*

**सी. राईट मिल्स.**

# समाजशिक्षण

बऱ्याच वर्षांपूर्वी मला नवी दिल्लीतल्या सरदार पटेल विद्यालयाच्या सामाजिक शास्त्राच्या एका विशेष तासाला बसायची संधी मिळाली होती. हा संसदेचा तास होता. शाळांमधून नेहमी आयोजित केली जाते तशी ही नाटकातली संसद नव्हती. नाटकातल्या संसदेत मुलं 'खऱ्या' नेत्यांसारखं दिसण्याचा, बोलण्याचा प्रयत्न करतात. संसदेच्या तासांसारख्या आयोजनांना शिक्षणखातंही मुलांना दिलं जाणारं संसदीय प्रशासन पद्धतीचं प्रशिक्षण मानतं. त्यासाठी आर्थिक मदत दिली जाते आणि राष्ट्रीय स्तरावर एक वार्षिक बाल संसदही आयोजित केली जाते. शाळांमध्ये ही पाठ्यक्रमाबाहेरची ॲक्टिव्हिटी असते. एखाद्या नाटकांसारखं त्याचं आयोजन असतं.

सरदार पटेल विद्यालयातली ती संसद अशी नाटकी नव्हती. अशा नाटकी संसदेत जो थाटमाट असतो, तसा तिथं नव्हता. 'खऱ्या' संसदेतल्या नेत्यांची नक्कल करण्याचा मुलाचा इरादा दिसत नव्हता. त्यांचे शिक्षक श्री. बी. डी. मेहतांनी सामाजिक शास्त्राच्या वर्गात दर आठवड्याला संसदीय प्रणालीचा एक तास ठेवला होता. संसदीय पद्धतीच्या चर्चेचं वातावरण निर्माण करावं असा त्यात उद्देश होता. कडाक्याच्या थंडीत मागच्या बाकावर बसून मी पाहत होतो, की मुलं वर्गाचं वास्तव विसरण्याचा अजिबात प्रयत्न करीत नव्हती. विचारल्या, उत्तर दिल्या जाणाऱ्या प्रश्नोत्तरांशिवाय संसदीय वास्तवाशी त्यांचा काही संबंध नव्हता. त्यांचा सत्ताधारी पक्ष, विरोधी पक्ष, अध्यक्ष, मंत्री सगळे हाफ पँट-स्कर्टमध्ये आपल्या नेहमीच्या जागेवर बसलेले होते. संसदेतल्या औपचारिकतेकडे लक्ष देण्याऐवजी ते वर्गातल्या स्वाभाविक वातावरणाला आहे तसं, जिवंत ठेवण्याचा प्रयत्न करीत होते. खोली वर्गच वाटत होती, प्रेक्षागृह नव्हती. हे बघताना मला नाही वाटलं की या मुलांना ती मुलं आहेत हे विसरायचं आहे. त्यांना माहीत होतं की त्यांचे प्रेक्षक म्हणजे त्यांचे शिक्षक श्री. मेहता आणि पाहुणा मी त्यांचं नाटक बघायला आलेलो नाही. आपल्या पद्धतीनं एक प्रणाली म्हणून संसदीय परंपरा या आठवीच्या मुलांनी केवळ आपलीशी केली नव्हती, तर ती अधिक चांगली करण्याचा प्रयत्न केला होता. एखाद्या 'मंत्र्या'कडून दिली जाणारी माहिती आणि कोषातून मिळणारी मदत तातडीनं तपासून पाहायला ही मुलं तत्पर दिसत होती. सत्ताधारी पक्ष आणि विरोधी पक्ष असं विभाजन त्यांच्यासाठी महत्त्वाचं नव्हतं. त्यांना रस होता, चर्चेच्या विषयांवरच्या सांगोपांग वाद-संवादात. कधी कधी असंही झालं, की काही 'मंत्री' एकदम संतापले, पण विरोधी पक्षावर वरचढ होण्याचा त्यांचा तसा प्रयत्न दिसत नव्हता. वर्गातली हुशार मुलं त्या दिवशी विरोधी पक्षात बसलेली होती. महत्त्वाची वस्तुनिष्ठ माहिती त्यांनी गोळा करून आणली होती आणि ती सादर करण्याची वाट बघत ती शांतपणे बसलेली होती. सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे वर्गशिक्षक श्री. मेहतांचं तिथं असणं मुलांना दडपण आणत नव्हतं. माझ्या दडपणाचा तर प्रश्नच नव्हता कारण मी एक अनोळखी पाहुणा होतो आणि मुलांनाही सतत हरघडी आपल्या कृतीबद्दल सावध असण्याची सवय लावलेली नव्हती.

या सगळ्या चांगल्या गोष्टींशिवाय त्या वर्गसंसदेच्या काही मर्यादा होत्या. पण त्या मुळातच सामाजिक अध्ययनाचं आकलन आणि पद्धतीच्याही होत्या. या मर्यादांबद्दल चर्चा करण्याअगोदर त्या वर्गाबद्दल मला आठवतं, त्या दिवशी तिथं वर्ग किंवा शाळेबाबत कोणताही मुद्दा कुणीही काढला नव्हता. ज्या विषयांवर चर्चा झाली त्यात तेलाचं संकट हा प्रमुख मुद्दा होता. थोडीफार चर्चा शस्त्रव्यापाराबद्दलही झाली. या विषयांवर चर्चा झाली, कारण हे विषय सार्वजनिक होते. त्या काळात या विषयांवर वर्तमानपत्रामधून भरपूर छापून यायचं. रेडिओ-टीव्हीवरच्या कार्यक्रमात तेल संकटाचा विषय असायचा. काही दिवसांपूर्वीच झालेल्या शिखर परिषदेच्या पार्श्वभूमीवर अनेक पत्रकारांनी शस्त्रास्त्र स्पर्धेविषयीचे लेख लिहिले होते. या विषयांबद्दल तपशील गोळा करणं सोपं होतं. फक्त काही वर्तमानपत्रं आणि रेडिओ-टीव्हीशी थोडा वेळ घालवून तेल-प्रश्नावरचा विशेषज्ञ होणं अवघड नव्हतं. सरदार पटेल विद्यालयात श्रीमंतांची मुलं शिकतात. एकेका मुलावरचा मासिक खर्च बऱ्यापैकी असतो. शहरातल्या संपन्न मध्यमवर्गातली ही मुलं असतात. सगळ्यांकडे वर्तमानपत्र येतं, रेडिओ आहे आणि बहुतेकांच्या घरी दूरदर्शन संच आहेत. या प्रसारमाध्यमांद्वारे

मिळणारी माहिती मिळवणं या मुलांसाठी सहज अशी गोष्ट होती.

याउलट जर त्यांना वर्ग किंवा शाळेविषयी काही चर्चा करावी लागली असती तर त्यांना स्वतःच्या आकलन-हुशारीनं विषय शोधावे लागले असते. ही मुलं एका अतिशय शिस्तबद्ध शाळेचे विद्यार्थी होते. राजधानीतल्या 'चांगल्या' म्हणवल्या जाणाऱ्या शाळेची परंपरा, गौरवाला साजेशी व्यवस्था, स्वच्छता आणि शिस्त पटेल विद्यालयात होती आणि अजूनही असेल. सगळीकडे सगळ्या गोष्टी जागच्या जागी होत्या. कॉरिडॉरमध्ये शांतता होती. कधीतरी एका वर्गातून दुसऱ्या वर्गात जाणारी मुलं तेवढी कॉरिडॉरमध्ये दिसायची. विद्यालयाच्या गणवेशातली ही मुलं स्वच्छ, सुंदर आणि निरोगी दिसत होती. मुताऱ्यांतही स्वच्छता आणि शिस्त. शाळेच्या सगळ्या भिंती स्वच्छ-सफेद. व्यवस्थेच्या एवढ्या दबदब्यात एखादा दोष काढणं मुलांनाच काय, बाहेरच्या व्यक्तीसाठीही कठीण होतं. दोषच का, शाळेच्या कोणत्याही पैलूचं विश्लेषण करणं अवघड होतं. प्रत्येक प्रक्रियेत एवढी संगती होती, की त्यामागे काहीही पाहणं अशक्य होतं. कोणतं मूल कुठल्या कुटुंबातलं असेल हे समजण्याची शक्यता गणवेशानं कमी केली होती. चेहऱ्यावरून ओळखता येईल तेवढंच. समाजाच्या मधोमध उभ्या असलेल्या या शाळेत समाज मात्र अदृश्य होता. सामाजिक अभ्यासासाठी ही अतिशय वाईट परिस्थिती होती.

त्यामुळे मुलांनी सांसदीय चर्चेची पद्धतच नव्हे, तर चर्चेचे मुद्देही संसदेतून घेतले होते यात काही आश्चर्य नव्हतं. 'नाटकी' संसदेचे दुर्गुण टाळूनही सामाजिक अभ्यासाची अशी एखादी रीत शोधून काढता आली नव्हती, जी सांसदीय चर्चांच्या मर्यादेपलीकडे घेऊन जाईल. मी स्वतः अजून संसदेत गेलेलो नाही. त्यामुळे तिथल्या कार्यप्रणालीचा मला प्रत्यक्ष अनुभव नाही. पण वर्तमानपत्रातील संसदवार्ता वाचून सांसदीय लोकशाहीच्या काही खास बाबी मला आता कळू लागल्या आहेत. हेच जगभरातल्या राजकारणाबाबत खरं आहे. कारण त्याचा संबंध कोणा एका संसदेशी नाही तर घडामोडींकडे पाहण्याच्या पद्धतीशी आहे. मला असं वाटतं, की सांसदीय चर्चांनी आपल्याला समस्या आणि घटनांकडे औपचारिक दृष्टिकोनाने पहायला शिकवलं आहे. माहितीच्या देवाणघेवाणीच्या ऐवजी संसद आपल्याला केवळ विचार करायला आणि ऐकायला शिकवते. तिची एक भाषा घडली आहे आणि देशात घडणाऱ्या घटनांच्या माहितीअभावी ती बोथट आणि खोटी झाली आहे. या भाषेत लोकांसाठी नाही, राजकीय घटकांसाठी केवळ जागा आहे. 'रशियानं अमेरिकेला सांगितलं आहे' किंवा 'मध्यप्रदेशाचं शैक्षणिक धोरण यंदा बदलणार आहे' किंवा 'भारतात पाठवलेला गहू खराब लागला' असे वाक्यांश भाषाशास्त्राच्या दृष्टीनं अमूर्त आहेत. यात उच्चारलेल्या वस्तू, घटना किंवा लोकांबद्दल ते वाक्यांश काही सांगत नाहीत. उलट आधीच मान्य केलेल्या चौकटींबद्दल सांगतात. 'रशिया' आणि 'अमेरिके'चा अर्थ सरकारं, 'मध्यप्रदेश'चा अर्थ तिथली नोकरशाही आणि 'भारत' म्हणजे खराब गहू खाऊ शकणारा देश असा आहे. जुन्या ऐतिहासिक ग्रंथात असे उल्लेख असायचे, की अमुक देशाच्या राजाने तमुक देशाच्या राजाला संदेश पाठविला. म्हणजे हे स्पष्ट होतं, की संसदेच्या देवाणघेवाणीत प्रजेचा काही संबंध नाही. मात्र युद्धांच्या प्रसंगी त्याही काळात प्रजा किंवा सैनिक लढायचे, भांडण मात्र दोन राजांमधलं असायचं. आज युद्ध दोन 'देशां'मध्ये होतात, मैत्रीही दोन 'देशां'मध्येच होते, खरं तर ही मैत्री दोन पंतप्रधानांमध्ये होते आणि काही सुशिक्षित, संपन्न प्रतिनिधींमध्ये वाढते. आपली राजकीय आणि वर्तमानपत्रीय भाषा आणि शैली एवढी पोकळ झाली आहे, की खरी परिस्थिती माहीत असूनही तिचा आपल्याला बातमीशी संबंध लावता येत नाही. सत्तेची शक्ती वाढताच देशांच्या आत आणि बाहेरही शक्तिसंतुलन सूक्ष्म पातळीवर होऊ लागलं आहे. हे देशांच्या परस्परावलंबनामुळे घडलं आहे. देशांचं परस्परांवरचं अवलंबन वाढलं असतं, तर अमेरिकेचा ग्राहक भारतातल्या काजू किंवा चहा-उत्पादकाची परिस्थिती समजू शकला असता. लॅटिन अमेरिकेतून आलेलं मांस खाताना त्याला संकोच वाटला असता. कारण धान्याच्या उत्पादनापासून वंचित ठेवलेल्या जमिनीवर पाळलेल्या प्राण्यांचं ते मांस आहे. खरं म्हणजे एका देशातली जनता दुसऱ्या देशातल्या जनतेबद्दल पूर्वीपेक्षा जास्त बेफिकीर झाली आहे. बेफिकिरीचं प्रमाण आणि आर्थिक विषमतेचं प्रमाण समान असतं. जेवढी आर्थिक विषमता जास्त तेवढं दुसऱ्या देशातल्या लोकांना समजून घेणं कमी. आर्थिक दृष्टीनं गरीब असलेल्या दोन देशांतल्या लोकांतही परस्परांबद्दलची ही समज कमी असते. अमेरिकेचा नागरिक भारतातल्या शेतकऱ्याचं दुःख समजून घेऊ शकत नसेल, तसा भारतातला शेतकरीही श्रीलंका किंवा ब्राझीलमधल्या शेतकऱ्याची वेदना समजून घेऊ शकत नाही. आता फक्त सरकारं एकमेकांना ओळखून असतात. लोक मात्र पूर्वीपेक्षा अधिक स्थानिक आणि प्रादेशिक परिघांमध्ये सीमित झाले आहेत. त्यांच्यातल्या सुशिक्षित वर्गामध्ये माहितीचं प्रमाण निश्चित वाढलं आहे, समज मात्र वाढलेली नाही. सरदार पटेल विद्यालयाची मुलं त्या सकाळी माहितीचाच सांसदीय वापर करत होती.

स्वतःच्या समजुतीचा, आकलनाचाच शोध त्यांना घ्यायचा असता, तर तेल-संकटाच्या मुद्द्यापेक्षा त्यांनी आपली शाळा, घर, मोहल्ला यांत अधिक रस घेतला असता. हे करताना त्यांनी अगदी छोटासाच मुद्दा अभ्यासाला घेतला असता,

विशिष्ट प्रचलित भाषा वापरली नसती. त्यांना ते प्रश्न सोडविण्यासाठी स्वतःच मार्ग शोधायला लागले असते. पण या सरावातून त्यांना आंतरराष्ट्रीय राजकारणाची सखोल ओळख नीटपणे झाली असती. ते फार परकं, दूरचं वाटलं नसतं.

त्यांच्या त्या संसदेत जाण्याआधी काही मिनिटं मी एक घटना पाहिली होती, जी मी चर्चेसाठी पुरवू शकलो असतो. पण वर्गातलं वातावरण पाहून मी ते टाळलं. शाळेत आत येण्याअगोदर मला त्यांच्या ऑफिसात वाट पाहत थांबावं लागलं होतं, कारण वेळेच्या थोडा आधीच मी तिथं पोहचलो होतो. तिथं एका छोट्या मुलीला येताना मी पाहिलं. शिक्षकांनी सांगितलं म्हणून ती खडू न्यायला आली होती. ते घेताना तिनं गरजेपेक्षा थोडे जास्त घेतले. ते घेताना कुणी पाहिलं नाही, पण दारातून बाहेर पडताना एक विशालकाय हात, जो कुठल्याशा कामानं तिथं आलेल्या एका शिक्षकाचा होता, अचानक तिच्यासमोर आला. चेहऱ्यावर माया दाखवत त्यानं तिच्याकडे दोन-तीन तुकडे ठेवून बाकी सगळे परत घेतले आणि तिला जाऊ दिलं.

ही घटना संसदेत चर्चेसाठी मुद्दा होऊ शकली असती. याप्रकारे त्या मुलीकडून खडू हिसकावण्याचा त्या शिक्षकाला काय अधिकार होता? त्यातल्या किती तुकड्यांची तिला गरज आहे, असं तिला विचारावंसं त्या शिक्षकाला का वाटलं नाही? ती मुलगी जास्तीचे खडू 'वाया घालवायला' किंवा खेळायला चोरून घेऊन जाते आहे, असं त्या शिक्षकानं का समजावं? यावर जर त्या संसदेत चर्चा झाली असती, तर शाळेची एकूण व्यवस्था आणि शिक्षक-विद्यार्थी संबंध निश्चित करणाऱ्या 'राजकारणा'चं अधिक सखोल असं विश्लेषण मुलं करू शकली असती. सामाजिकशास्त्राच्या वर्गासाठी हा योग्य सराव ठरू शकला असता. पण या विषयाच्या पारंपरिक समजुतीत ते बसू शकलं नसतं.

ही पारंपरिक समजूत तीन विषयांचं मिश्रण आहे. हे विषय आहेत — इतिहास, भूगोल आणि नागरिकशास्त्र. समाजाचा समग्र अभ्यास करताना हे निश्चितच उपयुक्त ठरणारे विषय आहेत. परंतु त्यांचा एकमेकांशी संबंध लावून ते शिकवले गेले तरच त्यांचा उपयोग आहे. यांचा परस्परांशी संबंध असल्यामुळेच ते सामाजिक विषय आहेत. स्वतंत्रपणे ते शिकवल्यानं ते निव्वळ कोरे राहतात आणि त्यांचा काही उद्देशच शिल्लक राहत नाही. परंतु दुर्दैवानं या विषयांची परस्परपूरकता मुलांना समजावून देईल असं पुस्तक दुर्मीळ आहे. बहुतेक पुस्तकांत इतिहास, भूगोल आणि नागरिकशास्त्राचे स्वतंत्र विभाग असतात. चांगल्या शिक्षकाला ज्याचा उपयोग करता येईल असा काही ताळमेळ त्यात असण्याची शक्यता यात नसते. भूगोलात राजस्थान हे वाळवंट असतं तर इतिहासात ते युद्ध आणि जोहारांच्या अभिमानास्पद कहाण्यांनी भरलेलं असतं. नद्या-पहाड ही भौगोलिक अढळ सत्यं असतात तर काही वंशांचा उदय आणि ऱ्हास म्हणजे इतिहास होतो. देशाचा भूगोल इतिहासानं जिवंत होत नाही आणि इतिहासही भूगोलानं प्रमाणित होत नाही. या विषयांचा परस्परांशी ताळमेळ नसतो कारण हे विषय लोकांशी जोडलेलेच नसतात. ते समाजनिरपेक्ष आणि स्वतंत्रच राहतात. त्यामुळे इतिहास म्हणजे किस्सेबाजी होतो आणि भूगोल केवळ मनोरंजक चर्चेच्या पातळीवर राहतो. एखादा भूभाग सखल पठाराचा किंवा वाळवंटी असल्यानं तिथल्या रहिवाशांवर, त्यांच्या जीवनावर काय परिणाम होतो हे समजून घेणं मुलांसाठी अशक्य होतं. त्यांना वाटतं की लोकांचं जीवनमान, तिथल्या जमिनीचा उंच-सखलपणा, तिथलं हवामान या आपापल्या जागी असणाऱ्या गोष्टी आहेत, त्यांचा परस्परांशी संबंध नाही. त्यांना हेही कळू शकत नाही की इतिहासात उदय किंवा ऱ्हास एखाद्या राजाचा होत नसतो तर समाजाच्या संस्कृतीचा होत असतो.

एखाद्या प्रदेशाच्या भौगोलिक परिस्थितीचा संबंध तिथं राहणाऱ्या लोकांशी जोडणारी पुस्तकंच उपलब्ध नाहीत असं म्हणणंही खरंतर चुकीचं आहे. साधारण पस्तिसेक वर्षांपूर्वी *बालसंसार* हे वैशिष्ट्यपूर्ण पुस्तक भूगोल कार्यालयानं छापलं होतं. त्यात निव्वळ भौगोलिक सीमा, पर्वतशृंखला आणि पठारांची फक्त यादी न देता त्या प्रदेशात राहणाऱ्या मुलांची दिनचर्या, राहणीमानाशी तिथल्या भौगोलिक, सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीचा संबंध उलगडून दाखवला होता. माध्यमिक स्तरावर अशी काही बरी पुस्तकं मी पाहिली आहेत, पण त्यांची शैली खूपच नाटकी आणि माहितीही अपुरी आहे. प्राथमिक स्तरावर जी पुस्तकं उपलब्ध आहेत ती तर या संदर्भात अतिशय वाईट चित्र उभं करतात. राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषदेनं प्रकाशित केलेलं एक पुस्तक *आमचा देश भारत* मला बिहारमधल्या एका शाळेत चौथीच्या वर्गात वाचायला मिळालं. दुसऱ्या प्रकरणात उत्तर भारतीय मैदानी प्रदेशाची माहिती होती. ज्या शाळेत मी हे प्रकरण शिकवत होतो तो भाग याच मैदानी प्रदेशात येतो. दरवर्षी तिथं पूर येतो. मोठी हानी होते. तिथली भौगोलिक, आर्थिक आणि राजकीय परिस्थिती समजून घेण्याचं पूर हे चांगलं माध्यम होऊ शकतं. पण *आमचा देश भारत*च्या दुसऱ्या प्रकरणात उत्तर भारतातल्या नद्या आणि पुराबद्दल फक्त एवढंच लिहिलं होतं : 'लाखो वर्षांपासून या नद्या आपल्याबरोबर माती वाहून आणत आल्या आहेत. कधी कधी पावसाळ्यात या नद्यांमधलं पाणी दोन्ही तीरांवर दूरदूरपर्यंत पसरतं. त्याला पूर असं म्हणतात.' नद्या आणि पुराचं हे वर्णन जर सामाजिक अभ्यासाच्या संदर्भात कुठे आलं तर त्याला असामाजिक

अभ्यास निरीक्षणच म्हणावं लागेल. नद्या माती वाहून आणायचं साधन आहेत, एवढा अर्थ फक्त निर्जन प्रदेशासाठीच वापरता येईल. उत्तर भारतातल्या नद्या जिथून वाहतात तो सर्वाधिक घनदाट लोकसंख्येचा भाग आहे. तिथं राहणारे लोक, त्यांची संस्कृती यातल्या प्रत्येक बाबीवर नद्यांची खूण उमटलेली आहे. या त्याच्या छापाचा अभ्यास म्हणजे सामाजिक अध्ययन. वाहणारी माती म्हणजे सामाजिक अध्ययन नव्हे. या पुरांचा उत्तर भारताच्या जनमतावर परिणाम झालेला आहे. त्यांच्या एकूण विचारप्रक्रियेत पुरांची महत्त्वाची भूमिका आहे. पूर आणि जनजीवनाचा परस्परसंबंध समजून घेणं हाच इथं सामाजिक अभ्यासाचा उद्देश असला पाहिजे. पुराच्या संदर्भात या भूगोलाचा उपयोग चौथीतल्या मुलाला होऊ शकतो. माती वाहून आणणाऱ्या नद्या आणि दोन्ही बाजूंना पसरत जाणारा पूर तो फक्त निर्विकारपणे केवळ परीक्षेत काहीतरी लिहिण्यासाठीच लक्षात ठेवतो. या निव्वळ भौगोलिक माहितीसाठी त्यानं संवेदनशील जिज्ञासा कशी काय दाखवावी? अनेक वर्षं अशा पद्धतीनं भूगोल शिकून विशिष्ट शिस्त त्याच्यात तयार होईलही. असा पुस्तकी भूगोल त्याच्यासाठी आवडीचा, चर्चेचा आणि संशोधनाचा विषयही होईल, तसं अनेक व्यावसायिक विशेषज्ञांच्या बाबतीत घडतंही. पण दहा वर्षाच्या मुलासाठी ते अशक्य आहे आणि तीच त्याच्या बालपणाची मोठी देणगी आहे. संशोधन संस्थेतल्या वातानुकूलित कार्यालयात बसून मुलांसाठी पुस्तकं लिहिणाऱ्यांना हे कळणार नाही. अलाहाबादच्या भूगोल कार्यालयाचे संस्थापक श्री. रामनारायण लाल यांनी तीस-चाळीस वर्षांपूर्वी मुलांची ही चौफेर भूक ओळखली असणार. वेगवेगळ्या देशांवरची त्यांची लेखनमाला मुलांसाठीच्या भूगोल लेखनाचं आजही एक उत्तम उदाहरण आहे. आता आता काही वर्षांपूर्वीपर्यंत वृद्धावस्थेतही खांद्यावर पुस्तकांची पिशवी घेऊन शाळाशाळांमध्ये ही पुस्तकं विकताना ते दिसायचे.

सामाजिकशास्त्र अभ्यासाची ही दुःस्थिती प्राथमिक स्तरापर्यंतच मर्यादित नाही. विषयाचं विभाजन हे या शतकात शिक्षणाची आवश्यक अटच बनली आहे. एखाद्याचं शिक्षण जेवढं 'उच्च' तेवढा त्याचा परीघ कमी कमी होत जाणार. अधिकाधिक विस्तार हा खरा तर उच्चशिक्षणाचा अर्थ होता. 'ज्ञान आणि बुद्धी' शीर्षकाच्या लेखात बर्ट्रांड रसेलनं बुद्धीच्या वैशिष्ट्यांमध्ये समग्रतेला पहिल्या क्रमांकावर ठेवले आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार ज्ञानविस्ताराबरोबरच बुद्धिसामर्थ्य कमी कमी होत गेलं आहे. अणूच्या शक्तीविषयी संशोधन करणारा वैज्ञानिक राजकारण समजू शकत नाही. रसेलना वाटणारी काळजी ज्ञानाच्या शाखा चाकोरीबद्ध झाल्याने आहे. विशेषीकरणाच्या (स्पेशलायझेशन) स्पर्धेत अभ्यासकाच्या सीमा संकुचित होतात. त्यावर नियंत्रण ठेवणं सोपं जातं. अणुशोधाचा राजकीय संदर्भ जाणून असलेले वैज्ञानिक अपवादात्मकच आहेत. अलीकडेच अमेरिकेतल्या अनेक अणुवैज्ञानिकांनी आपल्या पदांचे राजीनामे दिले आहेत.[१] अणुशोधाचे धोके कळल्यावर त्यांच्या लक्षात आलं की या संशोधनात फायद्यापेक्षा तोटेच जास्त आहेत. त्यातल्या एका वैज्ञानिकाचे – डेल ब्रायडेन बॉ (Dale Briden Baugh) याचे – उद्गार आहेत, 'माणसांसाठी जोखीम आणि अनिश्चितता तसेच प्रजजनांसंबंधित अज्ञात परिणाम पाहता मी या निष्कर्षाला आलो आहे की अणुशक्तीची निर्मितीच होणं अयोग्य आहे.'[२] ज्या अनेक क्षेत्रांमध्ये जगभराचे वैज्ञानिक संशोधनामागे लागले आहेत त्यातलं एक अणुशक्तीविषयक संशोधन आहे आणि त्यांच्या प्रयत्नांचे राजकीय, आर्थिक, परिणाम काय होतील याबद्दल ते सजग नाहीत. त्यांच्या योग्यतेविषयी, त्यांच्या क्षेत्रातील अधिकाराविषयी संशय घ्यायचं कारण नाही, पण त्यांच्या ज्ञानात व्यापकतेचा अभाव आहे. त्याचीच चर्चा रसेलनं आपल्या निबंधात केली आहे. विज्ञानाचे ते भलेही पंडित का असेनात. त्यांचा सामाजिक अभ्यास तोकडा आहे.

सामाजिक शास्त्रातला तिसरा विषय नागरिकशास्त्र. हा तर स्पष्टपणे राजकीय विषय आहे. मुलांना त्यांच्या सामाजिकतेचं ज्ञान नागरिकशास्त्रानं देणं अपेक्षित आहे. पण ते केवळ शासनपद्धतीची ओळख करून देतं. संविधानापासून जिल्हा प्रशासनापर्यंतची माहिती नागरिकशास्त्राच्या पाठ्यपुस्तकात दिली जाते. हेच वर्गात पुन्हा पुन्हा वाचत, ज्याची प्रौढ वाचक किंवा शिक्षकाला कल्पनाही येणार नाही, अशी एक समजूत मुलं समाजाबद्दल करून घेतात. त्यांच्या समजुतीनुसार फक्त प्रशासन हाच वैध धंदा असतो. जिल्हाधिकाऱ्यापासून पटवाऱ्यापर्यंतची श्रेणी त्यांच्यासाठी समाजाचं चित्र तयार करते. नागरिकशास्त्राच्या चालू सामग्रीनुसार समाज दोन तऱ्हेच्या लोकांत विभागलेला असतो. प्रशासक आणि प्रशासित. पहिल्या वर्गातले सगळे लोक या ना त्याप्रकारे शासनयंत्रणेशी संबंधित आहेत. अनेक पुस्तकांमध्ये या वर्गात हुशारीनं सरकारी नोकऱ्यांच्या अंतर्गत असलेल्या सफाई कर्मचारी, पोस्टमन आणि शिक्षकांचाही समावेश केलेला असतो. मुलांना अशी जाणीव करून देण्याचा प्रयत्न असतो की हे कर्मचारी आहेत, समाजाचे सदस्य नाहीत. कारण यांचे व्यवसाय शासनानं निर्माण केलेले आहेत. दुसरा जो प्रशासितांचा वर्ग आहे तो माहिती देण्याच्या खटाटोपात लुप्तच झालेला असतो. दुकानदार, खेळाडू, विणकर, मजूर, कारागीर यांच्यासह सगळा अशासक समाज नागरिकशास्त्राच्या पुस्तकात अदृश्यच असतो. कुठेतरी एखाद्या वाक्यात त्याला गुंडाळलेलं असतं. त्याच्या कल्याणासाठी, सुखासाठी सरकारी कर्मचारी काम करतात. अधिकारी आदेश

देतात, धरणं बांधली जातात. गावागावात वीज पोहोचते.

सामाजिक शास्त्राची पाठ्यपुस्तकं मुलांसाठी असं अतिशय अर्धवट चित्र निर्माण करतात. याच पुस्तकांत इतरत्र मी शिक्षण आणि साक्षरतेत फरक दाखविण्याचा प्रयत्न करताना प्रचार सामग्रीचा, पाठ्यपुस्तकातील आशयाचा कसोटीसाठी वापर केला आहे. मला असं वाटतं जे शिक्षण शिक्षित व्यक्तीला अशा आशयाचा ग्राहक बनवतं ते निव्वळ साक्षरतेहून वेगळं नाही. या दृष्टीनं भारतात मुलांच्या प्राथमिक शिक्षणाला केवळ एक साक्षरता कार्यक्रम म्हटलं पाहिजे. प्राथमिक स्तरावर जेव्हा अगदी सुरुवातीला मुलांवर संस्कार होऊ लागतात तेव्हा शाळेत शिकवलं जाणारं साहित्य ना शिक्षकांच्या अनुभवातून लिहिलेलं असतं, ना मुलांच्या निवडीचं असतं. सरळ सरळ ते शिक्षण खात्याच्या अधिकाऱ्याचं उत्पादन असतं. यातले बरेच कधीतरी शिक्षक म्हणून नोकरी केलेले असतातही, पण मुलांची ही पुस्तकं शिक्षकांनी लिहिली आहेत की गैर-शिक्षकांनी ही समस्या नाही. फार तर तो एक महत्त्वाचा प्रश्न असू शकतो. मूळ समस्या ही आहे की प्राथमिक स्तरासाठीचं साहित्य असंच रूढ आणि पारंपरिक असावं का? ही कसोटी प्रचार साहित्याला सर्जनात्मक साहित्यापासून वेगळं करते. रूढ झालेलं पाठ्यपुस्तकामधलं सगळं साहित्य एकदा तयार झालं की बराच काळपर्यंत तेच वापरात राहतं. ते सर्जनशील असू शकत नाही. शिक्षकाच्या क्षमता सतत वाढविण्याऐवजी त्याला साच्यात ढकलतं. हे साहित्य किती का रंजक असेना आणि शिक्षक किती का कष्टाळू असेना, त्याच एका परिघात काम करता करता मुलांच्या वर्गातल्या अनुभवाला तो सर्जनात्मक पातळीवर नेऊ शकत नाही. हे मग प्रचाराचं काम बनतं. एका शासनपद्धतीचाच प्रचार असायला पाहिजे असं नाही. प्रचार काही कविनांचा असू शकतो. (काही चित्रांचा किंवा केवळ अशा संस्काराचाही असू शकतो.) पूर्वीपासून चालत आलेली पाठ्यपुस्तकं शिक्षकाकडून वाचून घेणं म्हणजे शिक्षण. सामाजिक अध्ययनाच्या बाबतीत सर्जनात्मक साहित्य आणि प्रचार साहित्यातला फरक दाखवताना केलेली ही उपरोक्त चर्चा म्हणजे विषयांतर झालं. कारण सध्याची सामाजिक अध्ययनाची पुस्तकं सर्जनात्मक असण्याचा प्रश्नच नाही. ती सरळ सरळ प्रचार पुस्तकांसारखी आहेत. त्यांचा सामाजिक परीघ किती छोटा आहे हे आता स्पष्ट झालं असेलच. मुलांना समाजाच्या जवळ आणण्याचा त्यांचा दावा असेल तर तो फोल आहे. पटेल विद्यालयातल्या पाऊण तासाच्या शिस्तबद्ध चर्चेनंतर मी बाहेर पडलो तेव्हा मला हे कळलं होतं की पेट्रोल कोणत्या मापात मोजलं जातं आणि कोरियातला शेवटचा अमेरिकन सेनाप्रमुख कोण होता. त्या वर्गातली मुलं जेव्हा सरकारी सेवांमध्ये जातील तेव्हा या प्रकारचं ज्ञान, ज्याला सामान्य ज्ञान म्हटलं जातं, - त्यांच्या उपयोगाला येईल.

भविष्यात जेव्हा कधी सामाजिक शास्त्राची पुरेशी आणि चांगली पुस्तकं लिहिली जातील तेव्हा या विषयाचं स्वरूप निश्चितच परिणामकारक होऊ शकेल. पण पुस्तकं सामाजिक अभ्यासासाठी एका मर्यादेपर्यंतच साधन बनू शकतात. समाज हेच सामाजिक अभ्यासासाठीचं सगळ्यात फायदेशीर साधन आहे. समाजाचं सध्या शाळेशी काही नातं नाही. समाजाची जी थोडीफार वानगी शाळेत मिळते ती पुस्तकांमधूनच. म्हणजे समाजाला आधी काळ्या अक्षरात बदलावं लागतं, मग ही काळी अक्षरं मुलांच्या मनात समाजाचं चित्र उभं करतील अशी आशा केली जाते. दूरदर्शनसारखं आधी चित्राला ध्वनितरंगांमध्ये आणि ध्वनीला चित्रात रूपांतरित करून हुबेहूब चलच्चित्र निर्माण करण्यासारखं ते सोपं आणि यांत्रिक नाही. पुस्तकांच्या माध्यमातून मुलांच्या डोक्यात जाता जाता समाज स्वत:च पुस्तकी बनून जातो. मुलांची ग्रहणक्षमता तीव्र असूनही शब्दांचा वास्तवाशी असलेला संबंध थेट असा राहत नाही. समाज गतिमान वास्तवासारखा त्या मुलांपर्यंत पोहचू शकत नाही. समाजाचं शाळेशी, मुलांशी नातं प्रस्थापित झाल्याशिवाय हे शक्य नाही. त्यासाठी मुलांचं शाळेच्या आतलं जग आणि बाहेरचं जग यांत फार फरक नसेल तर नातं तयार होऊ शकतं. शिक्षकांशिवाय इतर कुणी प्रौढ व्यक्ती शाळेत जात नाही. समाजातल्या तमाम धंद्या-व्यवसायातले लोक प्राथमिक शाळेसाठी थोडा वेळ काढून जायला लागले तर मुलांचा व्यावहारिक आणि बौद्धिक परीघ निश्चितच विस्तारेल. मोठ्यांनी ठरवलं तर ते ही आपली जबाबदारी मानू शकतील. आपले व्यवसाय, कौशल्यांची वैशिष्ट्यं, उपयुक्तता यांची त्यांना मुलांशी ओळख करून द्यावी लागेल. न्यायाधीश आणि विणकर दोघांसाठीही हे काम अवघड पण मजेदार असेल. शिक्षक नसलेली अशी प्रौढ मंडळी शाळेत आल्यानं मुलांचं निव्वळ शिक्षकांवर असलेलं अवलंबन कमी होईल. शिक्षकांवरचा ताणही थोडा कमी होईल. पण सगळ्यात महत्त्वाची गोष्ट ही की मुलं समाजाला जवळून समजू शकतील.

■

**संदर्भ:**

१. पीस न्यूज (Peace News), लंडन, अंक २०१८, १८ एप्रिल १९७६
२. तत्रैव, अंक २०१६, १९ मार्च १९७५

*एक तर मिळणारं अनुदान मुळात कमी आणि त्यात काही खर्च. कधीतरी सरकारनं दोन-चार लाख जादा दिले तर ते इन्स्पेक्टर आणि डायरेक्टर यांच्या भांडणात आणि वाटावाटीत जातात, शिक्षक मात्र होता तसाच राहतो. दुर्दैवानं सरकारला वाटतं तपासणी व्यवस्थित व्हायला पाहिजे, नाही शिकवलं गेलं तरी चालेल. निरीक्षणं-तपासण्यांवर पैसा खर्च होतो. पण शिकवलं कसं जातं हे पाहिलं जात नाही. तपासण्या कधी शिकवण्याची जागा नाही घेऊ शकत. पण हे सरकारला केव्हा कळणार?*

# शाळेची शासनयंत्रणा आणि शिक्षक

भारतात शाळा खात्याची गणना जास्तीतजास्त नोकऱ्या देणाऱ्या शासकीय विभागांमध्ये केली जाते. प्राथमिक आणि माध्यमिक शाळांमध्ये दिवसेंदिवस वाढ होत आहे. ही वाढ लवकर संपणारीही नाही. शाळा चालवायची असेल तर कमीतकमी शिक्षकाची आवश्यकता असतेच. भारतात शिक्षक ही शाळेची किमान गरज मानली जाते. इमारत आणि फर्निचर नसलं तरी शाळा चालू शकते पण शिक्षक पाहिजेच. शिक्षक असेल आणि मुलं नसली तरी चालतं. कारण अशा परिस्थितीत ती सुट्टी समजली जाईल, पण शाळा असेलच. देशातल्या कित्येक हजार ग्रामीण शाळा वर्षातले बरेच दिवस मुलांशिवाय चालतात यात काही आश्चर्य नाही. कारण मुलांना त्यांच्या आई-बापांबरोबर काम करावं लागतं. पण शिक्षक मात्र आवश्यक असतोच. तो पगार घेतो, शाळा उघडतो, बंद करतो. सगळ्यात महत्त्वाचं म्हणजे सरकारकडून वेतन मिळणाऱ्यांच्या यादीत त्याचं एक नाव असतं. शिक्षक हा शाळेच्या प्रशासनयंत्रणेचा सगळ्यात आवश्यक सभासद असतो.

मात्र त्याचं स्थान सगळ्यात खाली असतं. त्याला या यंत्रणेचं आधारभूत स्थानही म्हणता येईल. पण हा असा आधार आहे जो त्यावर उभ्या असलेल्या इमारतीच्या तुलनेत खूपच दुबळा आहे. त्याच्यावर शिक्षणातली सगळी नोकरशाही असते. तालुका शिक्षणाधिकारी, जिल्हा शिक्षणाधिकारी, प्रादेशिक विभागाचा शिक्षणाधिकारी आणि सगळ्यात वर प्रांत किंवा राज्याचा शिक्षण अधिकारी. अधिकाऱ्यांची कामं कार्यालयीन असतात, पण त्यांचा शिक्षकांवर सरळ अंकुश असतो. शाळांशी त्यांचा संबंध मुख्यत: तपासण्यांद्वारे असतो. स्वत: शिक्षक नसूनही शिक्षकांच्या कार्यक्षमतेचं मूल्यमापन करण्याचे त्यांना अधिकार असतात. कारण फार आधी कधीतरी ते शिक्षक असतात आणि अधिकारी म्हणून पदोन्नत झाल्यानं शिकवणं बंद झालेलं असतं. भारतात एकोणिसाव्या शतकात इंग्रजांनी

शाळातपासणीची व्यवस्था सुरू केली. त्यांचे सामाजिक आदर्श मानणारी नोकरशाही होतीच. इंग्रजी राजवटीत नोकरशाहीच्या अभिमानास्पद शिस्तीत ही तपासणी चाले. त्या राजवटीतल्या इतर अनेक व्यवसायांप्रमाणे तपासणीही आता केवळ एक औपचारिकता राहिली आहे. शिक्षणाधिकारी शाळांमध्ये जात नाहीत, शाळेत गेले तर वर्गात जात नाहीत. नोकरशाहीचे स्थानिक प्रतिनिधी असलेले मुख्याध्यापक फुलांच्या कुंड्यांनी शाळा सजवून चहा-नाश्त्यानं पाहुण्यांचं स्वागत करतात. आपला दौरा रजिस्टरमध्ये नोंदविण्यात अधिकाऱ्याला रस असतो. मुख्याध्यापकाला अधिकाऱ्यानं ठीकठाक शेरा लिहिण्यात रस असतो. दोघांचाही मुलांमध्ये रस नसतो म्हणून ते शेरे फक्त रजिस्टर्सच्या पानांमध्ये नोंदलेले दिसतात.

तपासणीची अशी तऱ्हा असूनही अधिकाऱ्याचा शिक्षकावर असलेला दबाव कमी झालेला नाही. अगदीच थातूरमातूर अयोग्य अधिकाऱ्यांच्या औपचारिक सूचना आणि डाफरणंसुद्धा तरुण आणि योग्य शिक्षक सहन करतात. अधिकाऱ्याच्या हातात सरकारनं दिलेल्या सत्तेला शिक्षक घाबरतो. ही सत्ता शिक्षकाची नोकरी, त्याच्या अपुऱ्या सुविधा आणि त्याच्या भविष्यावर परिणाम करू शकते. अधिकारी नाराज झाला तर बदली, वेतनवाढ रोखणं किंवा निलंबनाचा आदेश देऊ शकतो. उलट प्रसन्न झाला तर काही नवीन सवलती देऊ शकतो. तपासणी अधिकारी वस्तुत: शासन आणि शिक्षकाच्या मधलं संपर्कसूत्र असतो. भारतात शासन आणि व्यक्ती यांच्यामधले दहापैकी नऊ मार्ग नोकरशाहीतून जातात. दहावा मार्ग तात्त्विकदृष्ट्याच अस्तित्वात असतो, व्यवहारात नाही. निवडून गेलेले प्रतिनिधी स्वत:च नोकरशाहीवर एवढे अवलंबून असतात की पुन्हा त्यांच्यापर्यंत पोहचण्यासाठी नोकरशाहीशी सामना करावा लागतो. शिक्षकासाठी निवडून गेलेल्या प्रतिनिधीचं महत्त्व तितकंसं नाही. कारण शिक्षणात नोकरशाहीला प्रतिनिधींच्या मदतीनं काम करावं लागत नाही. शिक्षण हा पूर्णत: कार्यालयीन विषय आहे. त्यामुळे शिक्षक हा पूर्णपणे अधिकाऱ्याच्या मर्जीवर अवलंबून असतो.

हे अवलंबन दोन प्रकारचं आहे. नोकर म्हणून आणि शिक्षकाच्या रूपात. चपराशी किंवा कारकुनासारख्या कार्यालयीन कर्मचाऱ्यापेक्षा नोकर म्हणून त्याची परिस्थिती वेगळी नाही. कामाचे तास, पगार किंवा सेवाशर्ती यांबाबतीत कारकून आणि शिक्षकात काही फरक नाही. शिक्षकाला मुलांबरोबर सतत एका सर्जनशील पातळीवर रहावं लागतं, फायलींशी झटण्यापेक्षा ते जास्त अवघड आहे. पण सरकारला याच्याशी काही देणं-घेणं नसतं. शिक्षकानं आपली योग्यता आणि माहिती सतत वाढवत नेण्याची गरज असते हेही सरकारला मंजूर नसतं. बहुतेक वेळा काही ठिकाणी शिक्षकांसाठी प्रशिक्षण शिबिरं घेतली जातात आणि त्याचा उद्देशही प्रत्येक शिक्षकाला सगळे विषय शिकवण्यासाठी तयार करणं हाच असतो. कुठेकुठे त्यांच्यामध्ये काही मोफत पुस्तिकांचं वितरण झालं आहे. अशा काही शिक्षकांना मी भेटलो आहे. त्यांच्या वीसहून अधिक वर्षांच्या नोकरीत पाठ्यपुस्तकांशिवाय त्यांनी काहीही वाचलेलं नव्हतं आणि या प्रशिक्षण पुस्तिकांनी ते अधिकच गोंधळून गेले होते. जिथं स्थानिक किंवा प्रादेशिक वृत्तपत्राशिवाय एखादं नियतकालिक येत असेल अशा शाळांचं प्रमाण आपल्या देशात अत्यल्प आहे. ग्रंथालयाची सोय असलेल्या सरकारी प्राथमिक शाळा तर आणखी कमी असतील. ज्या शाळेत खुर्चीऐवजी शिक्षकाला पालथ्या बादलीवर बसून काम निभवावं लागतं अशा शाळांमध्ये ग्रंथालय आणि मासिकांविषयी बोलणं निरर्थक वाटू लागतं. वर्गांमध्ये अंधार, ओल आणि खड्डे असतात. छत असलं तर पावसाळ्यात गळत असतं. देशात एखाद्या कार्यालयाची अशी अवस्था क्वचितच असेल. कोणत्याही साधारणशा कार्यालयातही एक कपाट, टेबल-खुर्ची तर असतेच. शाळेत तर हेही नसतं. कदाचित मुलं पाऊस सहन करू शकतात. फायलींना ते शक्य नसतं म्हणूनही असेल. या दृष्टीनं शाळा हे सरकारचं सगळ्यात दरिद्री कार्यालय आहे. साधनांचा एवढा अभाव असूनही सरकारची ही अपेक्षा असते की कारकून जेवढे तास काम करतो तेवढंच शिक्षकांनीही केलं पाहिजे. रसेल यांनी म्हटलं होतं, 'मुलांच्या सान्निध्यात दोन तासांपेक्षा जास्त वेळ नियमित काढणं प्रौढांच्या मानसिक आरोग्यासाठी धोकादायक आहे.' त्यांचं हे विधान सरकारच्या दृष्टीनं विशेष अर्थ असलेलं आहे असं वाटत नाही.

मुलांचा गोंगाट आणि शाळेच्या भिंतींना आलेली ओल यांपासून सरकार बरंच दूर असतं. कामाचे तास, पगार आणि सेवाशर्तींच्या बाबतीत सरकार शिक्षक आणि कारकुनात फरक करीत नाही. अनेक राज्यांत आजही कितीतरी खाजगी शाळा अशा आहेत ज्या शिक्षकांना अत्यंत कमी वेतन देतात. सरकारी शाळांमध्येही बऱ्याच राज्यांत शिक्षकांना हजार रुपयांच्या आसपास पगार मिळतो. प्रचंड चलनवाढीच्या या काळात हा पगार केवळ बेरोजगाराला परवडू शकेल आणि तोही फक्त काही दिवसच. शिकलेल्या बेरोजगारांचा सुटलेला धीर आणि वैफल्यावरची तात्पुरती मलमपट्टी म्हणूनच शिक्षकांच्या नोकऱ्यांकडे पाहिलं जात आहे. आता अशा योजना बनताहेत की बालवाड्या सुरू करून बेरोजगार तरुणांना शंभर रुपये मानधन देऊन त्यांवर ठेवलं जाईल. पूर्वप्राथमिक शिक्षणासाठी लागणाऱ्या गांभीर्याची सरकारला किती जाण आहे हे यावरून स्पष्ट होतं. शालेय शिक्षणासंबंधी सरकारच्या

दृष्टिकोनाबाबत काहीही आशा ठेवणं गैर आहे असं वाटतं. हरयाणातल्या ४०,००० शिक्षकांनी १९७३च्या फेब्रुवारीत वेतनवाढीच्या मागणीसाठी मोठा संप केला होता आणि शेवटी त्यांना हार मानावी लागली होती. संप चालू असताना हरयाणाच्या शिक्षणमंत्र्यांनी सांगितलं होतं की संपाला ते घाबरत नाहीत कारण सरकार सहज नव्या शिक्षकांची नियुक्ती करू शकतं. मंत्र्यांच्या म्हणण्याचा अर्थ असा होता की बेरोजगार तरुणांच्या मोठ्या याद्यांचा फायदा घेऊन ते संप सहज मोडून काढू शकतील. शिक्षकांच्या अनुभवाचं त्यांना काही मोल नव्हतं. नोकरी गेल्यावर या शिक्षकांची, त्यांच्या कुटुंबाची दशा बेरोजगार तरुणांपेक्षाही जास्त वाईट असेल याचीही त्या मंत्र्यांना चिंता नव्हती. या आधीही इतर प्रदेशांमध्ये झालेल्या संपांमध्ये शाळाशिक्षक दमनयंत्रणेची शिकार झाले आहेत.

वैचारिक क्रियाशीलतेशी वेतनाचा सरळ संबंध आहे. पण इथं शिक्षकांकडून अपेक्षा असते की त्यानं आदर्शांवर आणि अधिकाऱ्यांच्या प्रोत्साहनावर जगावं. अर्धशतकापूर्वी हे आदर्श लोकप्रिय होते. शिकवण्याची आणि मुलांची आवड यामुळे कमी पगार असूनही अनेकजण हा पेशा पत्करायचे. आजच्या तरुण-तरुणींना सामाजिक अन् राजकीय अपेक्षाभंगाचा चांगलाच अनुभव आहे, अध्यापनातली आदर्शमूलक महानता आणि शिक्षकांचं सोसत राहणं त्यांना आता आकर्षित करीत नाही. ते जाणतात की पुरेसं उत्पन्न जगण्याचं आधारभूत मूल्य आहे. मग हे मूल्य तुम्ही सामाजिक म्हणा, राजकीय किंवा नैतिक म्हणा. म्हणून स्वत:चा कल आणि योग्यता दुय्यम मानून जास्तीतजास्त उत्पन्नाच्या कसोटीवर ते व्यवसाय निवडतात. शाळेतल्या अध्यापनाचं आता कुणाला आकर्षण नाही, कारण त्यातून मिळणारं उत्पन्न आणि सामाजिक प्रतिष्ठा खूपच कमी आहे आणि काम कंटाळवाणं आहे. ज्यांना इतर व्यवसाय शक्य नाही असेच तरुण आता अध्यापनात येत आहेत. अशा विवशतेनं शिक्षक बनलेलेही दुसरा अधिक चांगला व्यवसाय मिळताच अध्यापन सोडायला तयार असतात. एका आंतरराष्ट्रीय सर्वेक्षणाच्या अहवालानुसार भारतात एका प्राथमिक शाळा शिक्षकाचं उत्पन्न एखाद्या डॉक्टरच्या घोषित उत्पन्नाच्या २५.८% तर माध्यमिक शाळा शिक्षकाचं उत्पन्न ६१.६% असतं.[१] १९६४-६५ मध्ये प्रशिक्षण महाविद्यालयाच्या १८००० प्रशिक्षणार्थ्यांच्या सर्वेक्षणातून लक्षात आलं की ७०.९% प्रशिक्षणार्थी तिसऱ्या श्रेणीच्या आकड्यापर्यंत पोहचले होते.[२]

शिक्षकाचं कमी वेतन आणि कार्यालयीन सेवेएवढेच कामाचे तास योग्य मानणाऱ्यांच्या मते शिक्षकांना सध्या मिळतात त्यापेक्षा अधिक सोयी-सवलती मिळण्याची त्यांची योग्यता नाही. १९७२ साली *दिनमान*मध्ये मी एक चर्चा आयोजित केली होती. त्यात सहभागी झालेल्यांनी शिक्षकांसाठी वापरलेली विशेषणं म्हणजे मेंदूनं क्षीण, भयग्रस्त प्राणी, मन आणि डोक्यानं शून्य, परंपरावादी, कामचुकार, भित्रा, स्वार्थी आणि चलाख अशी होती. ही विशेषणं वापरणाऱ्यांमध्ये शिक्षक फारसे नव्हते. काही विद्यापीठ आणि शिक्षणशास्त्राशी संबंधित होते. (उघड आहे की केवळ शिक्षक आणि शालेय शिक्षणावर त्यांना टीका करायची होती. परिस्थितीची सापेक्षता त्यांना व्यर्थ अडचण वाटत होती.) आतापर्यंत मी जितक्या शाळा-शिक्षकांना भेटलो आहे त्यातल्या अनेकांना ही विशेषणं निश्चितच लावता आली असती. परंतु त्यांचं जगणं आणि परिस्थिती पाहून त्याची कारणं समजू शकत होती. देशातल्या गरीब, ग्रामीण शाळांमधल्या शिक्षकांना आपण अयोग्य आणि आळशी म्हणत असू तर त्याचं कारण ज्या परिस्थितीत त्यांना ठेवलं गेलं आहे ती परिस्थिती भयंकर आहे. आजच्या काळात देशातले प्राथमिक शाळांचे शिक्षक विद्यापीठातल्या शिक्षकांपेक्षा एक-तृतीयांश किंवा त्याहीपेक्षा कमी पगार घेऊन त्यांच्यापेक्षा तिप्पट किंवा त्याहीपेक्षा जास्त वर्गांना शिकवत आहेत. एका वर्गात सरासरी पन्नास मुलं असतात आणि आठवड्याचे असे साधारण छत्तीस तास घ्यावे लागतात. विद्यापीठातल्या शिक्षकाला असा अनुभव एक दिवस जरी दिला तरी त्याच्या भयावहतेचा अंदाज येऊ शकेल. मग लक्षात येईल की शारीरिक आणि मानसिक शोषणाच्या परिणामांपैकी अक्षमता आणि आळस या अगदी सामान्य व्याधी आहेत. यापेक्षा गंभीर अशा व्याधींनी शिक्षक स्वत: ग्रस्त आहेत आणि मुलांच्याद्वारे त्या समाजात पसरवत आहेत. यात परपीडा, क्रौर्य आणि लाचारी आहे. रोज-रोजच्या जड, थकविणाऱ्या दिनचर्येनं शिक्षक संतुलित राहू शकत नाही. माझे एक शिक्षक सातव्या तासाला येऊन रोज चिंतामणी नावाच्या मुलाला आल्या आल्या मारायचे. मग त्यांना काहीसं ताजंतवानं वाटायचं. मग ते भूगोल शिकवायला सुरुवात करायचे. अजूनही सरकारनं बंदी घालूनदेखील अनेक शाळांमधून शिक्षेचे वेगवेगळे प्रकार वापरले जातात. शासनाच्या हे लक्षात येत नाही की असे प्रयोग शिक्षक स्वेच्छेनं नव्हे तर मानसिक व्याधीतून आलेल्या असहायतेपोटी करत असतात.

शासन आणि शिक्षकाचं नातं औद्योगिकक्षेत्रातल्या मालक आणि नोकरासारखं असतं. या क्षेत्रात नोकराचं स्थान केवळ एका कर्मचाऱ्याचं असतं आणि त्याच्या जागी कुणीही कर्मचारी चालू शकतो. शासनासाठी शिक्षक म्हणजे शाळेशी जोडली गेलेली व्यक्ती नसते तर तो फक्त एक तृतीय श्रेणीचा कर्मचारी

असतो. कोणत्याही कार्यालयात बसून ज्या प्रकारे एखादा कारकून फाईलींवर काम करील, त्याचप्रमाणे शिक्षक कुठेही राहून मुलांना शिकवू शकतो. त्याची राज्याच्या कोणत्याही कोपऱ्यात बदली होऊ शकते. बदली-प्रक्रिया म्हणजे प्रादेशिक शिक्षण विभागाचं सार्वभौमत्व दाखविणारं, सतत कार्यरत असं माध्यम आहे. दरवर्षी काही हजार शिक्षकांची एका शाळेतून दुसऱ्या शाळेत बदली केली जाते. बदलीच्या ठिकाणातलं अंतर वीस-पंचवीस मैल असू शकतं. पाचशे मैलही असू शकतं. बदल्यांची कारणं विविध असतात. पदोन्नती, मुख्याध्यापकाशी विसंवाद आणि शिक्षकाची स्वत:ची इच्छा. जिल्ह्याच्या अधिकाऱ्याच्या कोपाशिवाय निव्वळ तिथल्या कार्यालयातल्या कर्मचाऱ्यांची इच्छाही बदलीचं पुरेसं कारण असू शकतं. बदल्या रद्द करण्यासाठी प्रादेशिक मुख्यालयाच्या ठिकाणी चकरा मारणं, अर्ज-विनंत्या करणं, पैसे देणं अशा गोष्टी कराव्या लागतात.

शिक्षकाच्या इच्छेशिवाय बदलीचं आणखी एक उत्तम कारण कोणतं असू शकेल? सरकारी अधिकारी सांगतात, एकाच ठिकाणी काम करता करता शिक्षक कामचुकार होतात, चुका करायला लागतात, कधी कधी स्थानिक राजकारणात भाग घेऊ लागतात. हे जर खरं असेल तर सगळ्या शिक्षकांच्या विशिष्ट कालावधीनंतर बदल्या व्हायला पाहिजेत. पण अधिकारी आणि स्थानिक राजकारण्यांना अनुकूल असणारे शिक्षक पंधरा-वीस वर्षं जागेवरून जात नाहीत. अशा प्रकारचं वजन नसलेल्या पण स्वतंत्र राजकीय विचारांच्या आणि योग्य शिक्षकांच्या बदल्या वर्षदोनवर्षांनी नियमितपणे होत असतात. मध्यप्रदेशच्या शिक्षणखात्यानं बदल्यांसाठीचं एक दुर्दैवी कारण १९७३ साली दिलं. त्यांनी घोषणा केली की ज्या शाळेच्या अकराव्या इयत्तेचा वार्षिक निकाल १०% पेक्षा कमी लागेल त्या शाळेच्या मुख्याध्यापकाची बदली राज्याच्या दुर्गम भागातल्या ग्रामीण शाळांमध्ये करण्यात येईल. हे जाहीर करताना शासनानं दोन गोष्टींचा विचार केला असेल, एक म्हणजे अयोग्य मुख्याध्यापकाला शिक्षा करायची म्हणजे त्याला दुर्गम भागात पाठवून द्यायचं. पहिला निर्णय शिक्षणाबद्दलच्या अज्ञानातून आलेला होता, तर दुसरा प्रतिगामी राजकीय विचारातून आलेला होता. कोणत्याही शाळेचा दर्जा तिथल्या मुख्याध्यापकावर तितकासा अवलंबून नसतो. वेगवेगळ्या विषयांच्या उपयुक्त शिक्षकांवर आणि आवश्यक साहित्याच्या उपलब्धतेवर दर्जा अवलंबून असतो. तरीही समजा मुख्याध्यापक अयोग्य आहे हे गृहीत धरलं तरी त्याला गावाकडे पाठवून शिक्षा दिल्यानं त्याच्यासाठी काही गैरसोयी होतीलही, पण अयोग्य असा शिक्का मारून पाठवलेली व्यक्ती गावात आल्यानं गावकऱ्यांचा शासनाबद्दल काय समज होईल? त्यांची काळजी शासनाला अर्थातच नाही. आधीच आपल्या परिस्थितीनं आणि शासनाच्या निष्क्रियतेमुळे गाव बाकी जगापासून तुटलं आहे, शिक्षणाच्या सोयीही अपुऱ्या आहेत, तिथं शिक्षा म्हणून मुख्याध्यापकाला पाठवणं म्हणजे उरलीसुरली कसर पूर्ण करणंच आहे.

शिक्षकांच्या अधिकाऱ्यावरच्या अवलंबनाचा दुसरा पैलू शिकविण्याशी संबंधित आहे. अध्यापनासाठीचा विषय, वेळ, क्रम, साहित्य याविषयीचा निर्णय घेण्याचा अधिकार शिक्षकाला दिलेला नाही. अतिशय रूढ पद्धतीनं ही कामं केंद्रीय स्तरावर केली जातात. नव्यानं ती प्रत्येक वर्षी करायची गरज नसते, कारण शिक्षणविभागाला त्याची उपयुक्तताही वाटत नाही आणि आवश्यकताही. एकदा जी पाठ्यपुस्तकं स्वीकारली ती वर्षानुवर्षे चालू राहतात. अभ्यासक्रमातही कमीतकमी बदल करून तो 'नवा' केला जातो. भरपूर गाजावाजा झालेल्या १०+ २ योजनेसाठी केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळाद्वारे प्रकाशित झालेल्या अभ्यासक्रमाच्या पुस्तकाच्या (ज्या विषयी जोरजोरात व अभिमानानं बोललं जातं) प्रस्तावनेत म्हटलं आहे, 'नवी योजना प्रगतिशील असली तरी जुन्या योजनेत आमूलाग्र बदल केलेले नाहीत. कारण नव्या अभ्यासक्रमासाठी आधार म्हणून तीच जुनी प्रमाणं आणि माहिती आहे, जिच्याशी शिक्षक आणि विद्यार्थी परिचित आहेत.'

जे काही थोडेबहुत बदल अभ्यासक्रमात केले जातात, त्यांच्या निश्चितीसाठी शिक्षणखात्याचे अधिकारी, शिक्षक प्रशिक्षण महाविद्यालयातले व्याख्याते आणि काही संशोधन केंद्रांशी संबंधित तथाकथित शिक्षणतज्ज्ञ पुरेसे समजले जातात. कधीतरी काही ज्येष्ठ शिक्षकांना बोलावून त्यांची संमती घेतली जाते. जे शिक्षक असहमत असतात, त्यांना कार्यवाहीमध्ये बाधा मानून पुढच्या वेळी टाळलं जातं. शिक्षकांचं मत विचारात घेऊनही अभ्यासक्रम बनविण्याची प्रक्रिया होती तशीच चालू राहते. प्रादेशिक शिक्षण मंडळांमध्ये शिक्षकांचा सहभाग अत्यल्प आहे. १९६७च्या एका सर्वेक्षणानुसार देशातल्या १५ माध्यमिक शिक्षण मंडळांच्या एकूण ४३५ सभासदांपैकी फक्त ३७ किंवा ८.४% सभासद शिक्षक होते. मुख्याध्यापकांचं प्रतिनिधित्व यापेक्षा थोडं बरं म्हणजे ७४ सभासद एवढं होतं.[३] शालेय शिक्षणाचा सरळ संबंध त्या भागाच्या सामाजिक परिस्थितीशी, भौगोलिकत्वाशी आहे. प्रादेशिक वैविध्याचा समावेश करायचा असेल तर रूढ अभ्यासक्रम असू नये आणि तो केंद्रीय पातळीवर बनवलाही जाऊ नये. त्यात स्थानिक, संस्थात्मक इतकंच काय व्यक्तिगत बाबींचंही प्रतिबिंब पडलं पाहिजे. जोवर पाठ्यपुस्तकं आणि अभ्यासक्रम यांच्या निर्मितीत शिक्षकांचा सहभाग वाढत नाही, त्यांच्या कामाचा दैनंदिन कालावधी

कमी होत नाही, तोवर हे शक्य नाही. मागच्या काही वर्षांच्या अनुभवावरून असं दिसतं की आपण जे आवश्यक आहे त्याच्या बरोबर विपरीत दिशेनं प्रगती करत आहोत. शिक्षण आयोगानंतर (१९६४-६६) आपलं शैक्षणिक धोरण सातत्यानं केंद्रीय नियंत्रणाकडे जात आहे. अभ्यासक्रमाविषयीच्या आपल्या विचारात काहीही बदल झालेला नाही, पण अभ्यासक्रमाच्या साहित्य निश्चितीमध्ये केंद्रीय धोरणाचा सतत पगडा असत आला आहे.

पाठ्यपुस्तकाचं लेखन अभ्यासक्रमाहूनही जास्त केंद्रीय आहे. अभ्यासक्रमात बदल करण्याआधी काही प्रदेश-समित्या किमान सल्ला-मार्गदर्शनासाठी तरी शिक्षकांना आमंत्रित करतात. पाठ्यपुस्तकांचं लेखन मात्र पूर्णत: गैरशिक्षक शिक्षणतज्ज्ञ करतात. पूर्वी पाठ्यपुस्तकं खाजगी प्रयत्नातून लिहिली जायची. लिहिणारे बहुधा महाविद्यालयातले प्राध्यापक आणि कधीतरी शाळांचे मुख्याध्यापकही असायचे. आता हे काम विद्यापीठातले प्राध्यापक आणि राष्ट्रीय शिक्षण संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेच्या अधिकाऱ्यांसाठी राखीव म्हणून ठेवलं आहे. या लेखकांचा शाळा आणि मुलांशी कोणताही प्रत्यक्ष संबंध नसतो. बहुतेक राज्यांमध्ये पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचं पूर्णत: किंवा आंशिक राष्ट्रीयीकरण झालं आहे, त्यामुळे खाजगी प्रकाशक आणि लेखक आता जवळपास बाहेर फेकले गेले आहेत. सरकार स्वत:च पुस्तकं लिहवून घेतं आणि छापतं. ज्या शाळांमध्ये ही पुस्तकं शिकवली जातात त्या शाळेतल्या शिक्षकांचा या निर्मितीत काहीही सहभाग नसतो. त्यामुळे पाठ्यपुस्तकं विद्यार्थी आणि शिक्षकाची आवडीची नव्हे, तर लादलेली गोष्ट बनतात. शिक्षकाचं या पाठ्यपुस्तकांपासून परकं होणं वस्तुत: वर्गातल्या अडचणी आणि पेच यांपासून परकं होण्यासारखं असतं. दिल्ली किंवा प्रादेशिक राजधानीत बसून पाठ्यपुस्तकं लिहिणाऱ्यांसाठी वर्गाचं वातावरण निर्माण करणं अशक्य असतं. यामुळे पुस्तकात पावलापावलावर अनेक अव्यावहारिक सूचना, प्रश्न इत्यादींचा समावेश होतो आणि ज्या गोष्टी तिथं पाहिजेत त्या तिथे नसतातच. शिक्षकाजवळही असं एखादं माध्यम नसतं ज्यावर प्रयोग करून तो आपले प्रश्न सोडवू शकेल. प्रादेशिक राजधानी तर शाळेपासून खूपच दूर असते. वर्गाला कळेल अशा कुठल्यातरी प्रकारे शिक्षक पुस्तकाचा अर्थ वर्गापर्यंत नेण्याचा प्रयत्न करतो. परीक्षेची तयारी करवून घेतो आणि आपल्यापुरतं समाधान मिळवतो.

तूर्तास शिक्षकाच्या शैक्षणिक जबाबदाऱ्या कार्यालयीन पातळीवरच्या होत चालल्या आहेत. आतापर्यंत शाळेतले प्रवेश वाढविण्याची जबाबदारी त्याच्यावर होती. अनेक ठिकाणी वाढत्या प्रवेशांच्या संख्येशी शिक्षकाची पदोन्नती जोडली गेली होती. जिथं असं नव्हतं तिथंही व्यवस्था अशी होती की प्रवेश जास्त होत नसतील तर शिक्षकांना कारणं विचारली जावीत. याचा परिणाम असा झाला की जे शिक्षक प्रवेश वाढवू शकत नव्हते त्यांनी खोटे दाखले केले. ऑक्टोबर १९७२ मध्ये शिक्षण मंत्रालयानं हे मान्य केलं की वस्तुस्थिती आणि मुलांच्या प्रवेशाचे जाहीर झालेले आकडे यात बराच फरक आहे. सगळ्या देशातली ही फरकाची टक्केवारी २५% होती. जम्मू-काश्मीरमध्ये ६७, उत्तरप्रदेशात ४७, बिहारमध्ये ४२, राजस्थानात ४०, मध्यप्रदेशात ३५ आणि इतर राज्यांमध्ये ७ ते ३८ टक्क्यांपर्यंत होतं. केवळ सरकारी दबाव हे या फरकाचं एकमेव कारण नव्हतं, पण महत्त्वाच्या कारणांपैकी एक निश्चित होतं. शिक्षणाचा विकास आणि धोरणांबाबत निर्णय घेताना आकड्यांची विश्वासार्हता ही एक मोठी अडचण असते. काही अंशी ही अडचण दूर करता आली असती. जास्त प्रवेशसंख्या दाखवण्यामागचा उद्देश शैक्षणिक नसून राजकीय आहे. जास्त प्रवेशांसाठी दबाव आणला नसता तर एक अडचण दूर झाली असती.

शिक्षकाचं कोणतंही काम हे नोकरीची सुरक्षितता किंवा पदोन्नतीसाठी अट म्हणून वापरण्याची पद्धत शिक्षणाबद्दलचा सरकार आणि समाजाचा त्याच्याबद्दलचा अविश्वासच स्पष्ट करते. यात एक पूर्वग्रह हाही आहे की राष्ट्रीय विकासाची चिंता जेवढी अधिकाऱ्यांना आहे तेवढी शिक्षकांना नाही. शिक्षकाविषयी सतत संशय हे आपल्या शिक्षणव्यवस्थेचं मूलभूत आणि दुर्दैवी सत्य आहे. शिकवण्याशिवाय शिक्षकाकडून इतर कार्यालयीन कामं करवून घेणं ही सरकारची जुनी खोड आहे. यात जनगणना, पशुगणना, निवडणुकीविषयीची कामं, कुटुंबनियोजनाचा प्रचार, आरोग्याधिकाऱ्यांना मदत अशी कामे करावी लागतात. सरकारची अपेक्षा असते की आपल्या कर्मचाऱ्यांबरोबर शिक्षकांनीही ही कामं करावीत. मुळात शिक्षकाचं शैक्षणिक कामच किती जास्त असतं आणि ते कार्यालयीन कामापेक्षा वेगळंही असतं. पण त्याची सरकारला पर्वा नाही. शिक्षकाचं मोजमाप सरकार एवढ्या उच्च आदर्शांनी करत असतं की ते शारीरिक आणि मानसिक श्रमांच्या मर्यादेबाहेर जातं. शिक्षक नीट कामं करीत नाहीत असं सरकारी अधिकाऱ्यांचं नेहमीच म्हणणं असतं. शिक्षकांसाठीची नवनवीन कामं मात्र वाढतच राहतात. स्वाभाविकच त्यांच्या कर्तव्यात मग ते मागे नाही का राहणार?

शिक्षकांच्या शोषणाला शिक्षक संघटनाच विरोध करू शकतात. पण त्यांच्या संघटनांची अवस्थाही फारशी चांगली नाही. त्यांची संघटनात्मक शक्ती क्षीण आहे आणि राजकारण लंगडं आहे. जवळपास प्रत्येक राज्यातल्या संघटनेत विभाग, पक्ष

किंवा जातीच्या आधारावर गट झाले आहेत आणि याचा फायदा सत्तापक्षाचे नेते किंवा नोकरशाहीतले अधिकारी घेत असतात. संघटनेच्या नेत्यांमध्ये कोणत्याही गंभीर राजकीय वैचारिकतेची चिन्हं नसतात. व्यापक परिवर्तनाचे वाटेकरी व्हायचं असेल तर भविष्यात संघटनेत एकी आणि राजकीय विचारनिष्ठा वाढणं आवश्यक आहे.



**संदर्भ :**


१. हॅरी पॅसो आणि इतर, 'द नॅशनल केस स्टडी : ॲन एम्पिरिकल स्टडी ऑफ ट्वेंटीवन एज्युकेशनल सिस्टिम्स', स्टॉकहोम, आमक्विस्ट अँड विकसेल इंटरनॅशनल, १९७६.
२. एल.के.ओड आणि एस.एल.कौशिक, 'द स्टेटस अँड वेल्फेअर ऑफ टीचर्स इन इंडिया; आणि *नया शिक्षक* (१९०३) जानेवारी, मार्च १९७७, पृ. १२-२४
३. तत्रैव


*पाठ्यपुस्तक हे शिक्षणाचं माध्यम मानलं तर शिक्षकाच्या वाणीला काही किंमतच उरणार नाही. जो शिक्षक मुलांना पाठ्यपुस्तकातून शिकवतो तो विद्यार्थ्यांना स्वतंत्र आणि मौलिक विचार करण्याची शक्ती देऊ शकत नाही. यामुळे शिक्षक स्वतःच पाठ्यपुस्तकाचा गुलाम होतो, स्वतःचं तेज दाखविण्याची संधी त्याला मिळत नाही. यावरून हे लक्षात येतं की पाठ्यपुस्तकं जेवढी कमी असतील तेवढा शिक्षकांचा आणि विद्यार्थ्यांचा जास्त फायदा होईल.*

**महात्मा गांधी**

# पाठ आणि पुस्तकं

इयत्तावार व्यवस्था हा आपल्याकडे शालेय शिक्षणाचा आधार आहे आणि पाठ्यपुस्तकं हा त्या त्या इयत्तेचा आधार मानला जातो. पाठ्यपुस्तकं शिकवणं हा शालेय शिक्षणाचा अपरिहार्य आणि किमान असा कार्यक्रम असतोच, याच विश्वासावर देशभर शाळा सुरू झाल्या आहेत. काही वेळा तर पाठ्यपुस्तकांच्या छपाईला विलंब झाला म्हणून शाळा बंद ठेवाव्या लागल्या आहेत.[१] पाठ्यपुस्तकं नसताना शाळा आणि बाहेरच्या जगामधलं संपर्काचं सूत्रच नाहीसं होतं. अशा स्थितीत अख्खा वर्ग भरकटतो आणि तो चालू ठेवणं फार कठीण होऊन बसतं. एखादं मूल घरी पुस्तक विसरून आलं, तर अनेक शिस्तप्रिय कठोर शिक्षक त्याला वर्गाबाहेर काढतात. सांगण्यासाठी कारण असतं की पुढे ते मूल वर्गात नियमित पुस्तक घेऊन येईल. पण खरं तर स्वत: शिक्षकाची ही अडचण असते की त्यांना पाठ्यपुस्तकाशिवाय मुलांशी संवादच साधता येत नाही.

सर्वसाधारण पुस्तकांपेक्षा पाठ्यपुस्तकं वेगळी असतात. कारण त्यात माहिती किंवा साहित्य नव्हे तर 'पाठ' किंवा 'धडे' असतात. शाळेच्या संदर्भात 'पाठा'चा एकच अर्थ असतो तो म्हणजे शिकवणं. हा शब्द कधी कधी शिक्षणाला समानार्थी म्हणूनही वापरला जातो. इंग्रजीत 'लेसन' हा शब्द वापरला जातो आणि त्याचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. उपयुक्ततावादी दृष्टिकोन मुलाचा प्रत्येक अनुभव त्याच्यासाठी शिकवणच मानतो आणि हाच भारतीय मध्यमवर्गाचा दृष्टिकोन आहे. शाळेच्या मर्यादित शिकण्याचा स्रोत पाठ्यपुस्तकं असतात कारण प्रत्यक्ष अनुभवांच्या शक्यता खूपच कमी असतात. वर्णमालेपासून विज्ञानापर्यंत सगळं काही 'पाठां'च्या घटकात विभागलं आणि बांधलं गेलेलं असतं. जीवनाचं सर्वांगीण आणि वैविध्यपूर्ण रूप शिकवणुकीच्या पातळीवर सपाट केलं जातं. धड्यांचं वाचन मुलांना आयुष्य अनुभवण्याचं स्वातंत्र्य देत नाही, तर त्याच्या प्रत्येक अनुभवाला पूर्वनिश्चित योजनेप्रमाणे मूल्यबद्ध करतं. समाजाच्या सांस्कृतिक आणि राजकीय वातावरणातून मूल्यं घेतलेली असतात.

अनुभव आणि पाठातील द्वंद्व वस्तुत: दोन तत्त्वांमधलं द्वंद्व आहे. व्यक्तीचं मोल मानलं तर अनुभवाचं मोलही स्वीकारता येतं. ज्या समाजात व्यक्तीसाठी मान आणि मोल सोडाच, करुणेसाठीही जागा नसते तिथं अनुभवाचं स्वातंत्र्य घेण्याची सत्ताही राहात नाही. सामूहिक अनुभवाला अधिमान्यता, तर व्यक्तिगत अनुभवाला दुय्यम स्थान मिळतं. ज्या समाजात विशिष्ट व्यक्तिगत अनुभवाकडे संशयानं पाहिलं जातं, त्याच्याकडून अपेक्षा केली जाते की सर्वमान्य अनुभव आणि नियमांनुसारच त्यानं जगावं, तिथं अनुभवांना एका शैक्षणिक मूल्याच्या रूपात मान्यता मिळू शकत नाही. अशा समाजात शिक्षणाचा जगण्याशी मेळ बसत नाही. कारण शिक्षण म्हणजे जगण्याऐवजी शतकानुशतकांच्या अनुभवांचं सार असणार किंवा सामान्य अनुभवांच्या सैद्धांतिक अर्थांशी संबंधित असणार. हे शिक्षण समाजाच्या रूढ मूल्यांचंच पोषण करेल आणि कधीही परिवर्तनशील शक्तींना मदत करणार नाही.

भारतात शालेय विद्यार्थ्यांना अनुभवांच्या ऐवजी अनुभवांच्या पुस्तकी अर्थांची सवय लावली जाते. उत्तर भारतातल्या सात राज्यांतल्या प्राथमिक वर्गांसाठी वापरल्या जाणाऱ्या पाठ्यपुस्तकांचा अभ्यास केल्यानंतर मी या निष्कर्षावर आलो आहे.[२] प्रामुख्यानं प्रशासकीय मूल्यांच्या आधारावर ही पुस्तकं अनुभवांचं विश्लेषण करतात. धर्म, शासन, नागरिकता एवढंच नव्हे तर विज्ञानाबद्दलची माहितीही या पुस्तकातून प्रशासकीय दृष्टिकोनातून दिली जाते. पाठ्यपुस्तकाची लेखनपद्धती पाहता हा दृष्टिकोन स्वाभाविकच म्हणता येईल. मुलांशी या लेखकांचा काही संपर्क नसतो. मुलांच्या भोवतालच्या वास्तवाचं प्रतिबिंब या पुस्तकामध्ये दिसत नाही. त्याऐवजी जे मुख्य प्रवाही केंद्रीकृत वास्तव शासकवर्ग प्रसारित करू इच्छिते, त्या वास्तवाचं प्रतिबिंब या पुस्तकात दिसतं. त्या वास्तवाची काही मोजकी प्रतीकं वापरली जातात. या प्रतीकांद्वारे प्रशासक-लेखक आपला दृष्टिकोन मुलांवर लादायचा प्रयत्न करतात. पुढील विश्लेषणात वापरलेल्या उदाहरणांवरून हा दृष्टिकोन अधिक स्पष्ट होईल. हे विश्लेषण[३] पाठ्यसामग्रीच्या विषयांवर आधारित अशा तीन भागांत विभागलं आहे. पहिल्या भागात हिंदी पाठ्यपुस्तकांचं विश्लेषण केलं आहे. दुसऱ्या भागात सामाजिक शास्त्रांचं तर तिसऱ्या भागात विज्ञानाच्या पुस्तकांचं विश्लेषण केलं आहे. हिंदी आणि सामाजिक शास्त्राची पुस्तकं प्राथमिक वर्गांची आहेत तर विज्ञानाची पुस्तकं प्राथमिक

आणि माध्यमिक अशा दोन्ही स्तरांची आहेत.

(१)

भाषाज्ञानाच्या सुरुवातीला पारंपरिक पद्धतीनं प्रत्येक अक्षरानं सुरू होणाऱ्या प्रचलित शब्दाच्या चित्रानं त्या अक्षराची ओळख करून दिली जाते. वर्णमालेचा हा सुरुवातीचा धडा फार महत्त्वाचा आहे. वर्णमालेतल्या चित्राच्या मदतीनं मूल भाषेच्या रहस्यमय जगात प्रवेश करतं. शिकणाऱ्या पहिल्या शब्दामधून त्याच्यावर सामाजिक आणि भाषिक संस्कार होतात. या शब्दांचा आणि त्यासोबतच्या चित्रांचा जर त्याच्या भोवतालच्या जगण्याशी जर संबंध नसेल तर ती भाषाही त्याच्या जगण्याचा, त्याच्या नितांत अशा अनुभवाचा भाग होऊ शकत नाही. सिल्विया एश्टन वॉर्नरनं मुलांसाठी त्यांच्या आवडत्या गोष्टींची नामपट्टी (कार्ड) द्यायची पद्धत वापरली होती.[१] मुलं आपल्या प्रिय वस्तूचं शब्दांकन स्पर्श करून, ते आपल्या जवळ ठेवून सहजपणे या शब्दातील ती अक्षरं शिकायची.

भाषेच्या वर्णमालेतील अक्षरज्ञान करून देणारी चित्रं आणि शब्द अतिशय रूढ आणि गुळगुळीत झाले आहेत. तुम्ही हिमाचलमध्ये असा की मध्यप्रदेशात, वर्णमालेतली चित्रावली एकसारखीच असते. राजस्थानच्या वर्णमालेत झाड-नद्या आहेत, वाळू नाही. हिमाचल प्रदेशच्या वर्णमालेत हिमाचा पत्ता नाही. जुन्या वर्णमालेतले 'क्ष' क्षत्रियाचा, 'न' नळाचा, 'ण' गणेशाचा यांना तर अखिल भारतीय महत्त्व प्राप्त झालं आहे. या पुस्तकांमध्ये आजही सजून-धजून उभ्या असलेल्या धडाचं नाव आई असतं, मिशा आणि शस्त्र घेतलेलं धड म्हणजे क्षत्रिय असतो. उपयुक्तता संशयास्पद असलेले या प्रकारचे शब्द राजकीय आणि सामाजिक संस्कार करत असतात. निव्वळ भाषिक प्रभावाच्या दृष्टीनं पाहिलं तरी काही विशिष्ट रूढ शब्दांचा प्रयोग सदोषच वाटू शकतो. तेच-ते शब्द वापरून मुलांचं अक्षरज्ञान बोथट होतं. मला एक छोटा मुलगा भेटला होता. त्याला 'क' कबुतराचा एवढ्या कठोरपणे शिकवलं होतं की जिथं जिथं 'क' लिहिलेलं दिसायचं म्हणजे कमळ, कट्यार, त्याला तो कबुतरच म्हणायचा.

अक्षरओळखीची एक वेगळीच पद्धत राजस्थानच्या पुस्तकात वापरली आहे. सुरुवातीच्या पानांवर अक्षरांशिवायच्या चित्रचौकटी दिल्या आहेत अन् मुलांना त्यांच्याशी 'बोलायला' सांगितलं आहे. रूढ शब्दांच्या वापरापेक्षा ही पद्धत निश्चितच चांगली आहे. पण त्याचा नीट उपयोग शिक्षकाच्या कल्पना आणि आवाक्यावर अवलंबून आहे.

अक्षरांची ओळख झाल्यावर लगेचच शिकवले जाणारे 'पाठ' भाषासंस्कारांच्या दृष्टीनं अतिशय महत्त्वाचे असतात. यात मुलांना चित्रांच्या मदतीशिवाय भाषेच्या रहस्यात शिरायचं असतं. चित्रं असतात, पण 'पाठा'शी त्यांचा संबंध नसतो. या स्तरावरच्या पुस्तकांसाठीचं साहित्य खूप विचार करून लिहिलं पाहिजे. निरर्थक शब्द यात वापरणं हा एक ठळक दोष आहे. एकही काना-मात्रा न वापरता वाक्य तयार करण्याच्या कसरतीत लेखक अर्थहीन वाक्यरचना करतात.

*थप रतन। घर थप। घर थप रतन।*

*थप थप। घर थप।*

(राजस्थान)

*मगर उधर मत रख। खबर उधर मत रख।*

(मध्यप्रदेश)

काना-मात्रा टाळण्याच्या नादात वाक्यसदृश्य रचना अर्थ घालवून बसतात. मुलांनी रचनांचा अर्थ न बघता केवळ अक्षरओळखीचा यांत्रिक सराव करणं त्यांच्या मते आवश्यक आहे. जर एखाद्या मुलानं प्रयत्न केला तरी कंटाळून त्याला अक्षरांच्या यांत्रिक ध्वनिक्रमाकडे परत यावं लागेल. याप्रकारे मुलांच्या पुस्तकाच्या आवडीवर विपरीत परिणाम होऊ शकतो किंवा त्याची अर्थ समजून घेण्याची क्षमता तो घालवू शकतो. वस्तुत: अक्षरांना मात्रांपासून मुक्त करून शिकताना हिंदीचा विकृत संस्कार मुलांवर होतो कारण मात्रा भाषेचं एक अंगच आहे. हळूहळू मात्रा देत आणि शब्द शिकत मुलांचा बराच वेळ वाया जातो. दोन-चार वर्षांनी शिक्षण सोडणाऱ्या अशा मुलांना मात्रा वेगळ्या ठेवून अक्षरं वाचण्याची सवय होते. अक्षरं आणि मात्रा वेगळं करून शिकवण्याची ही पद्धत मुलांच्या वाचनाच्या गतीलाही मारक ठरते.

मात्रेपासून मुक्त असलेल्या वाक्यांनंतर या पुस्तकात मात्रेच्या सरावासाठी काही यांत्रिक उदाहरणं दिली आहेत. ज्यात सरळ वाक्यरचनेचं गद्य किंवा पद्य आहे. वर्णमाला शिकल्यावर राजस्थानातली मुलं पुढील कविता वाचतात :

*ककड़ी पर आई मकड़ी*

*ककड़ी ने कहा भाग।*

*मकड़ी ने मारी लात।*

आणखी काही 'पाठां'नंतर तिजोरीशी बसलेल्या एका जाड्या शेठजीकडून

पैसे मिळविण्याची कला मुलं शिकतात.

*एक एककर पैसा जोडो तो बन जाओगे धनवान।*

पुस्तकी ज्ञानाचे हे प्राथमिक 'पाठ' मुलांच्या भाषिक संस्कारांबरोबरच त्यांचा वैचारिक पायाही घडवतात. हरियाणातल्या मुलांना हिंदीचं हे पुढील रूप सरळ गद्याचा नमुना म्हणून समोर येतं.

*वह ऋषि जी आए*
*ऋषि जी तृण लाए*
*तृण किस लिए लाए*
*तृण मृग खाएगा*

मध्यप्रदेशातल्या पहिल्या वर्गाच्या पुस्तकात 'बाहुलीचं लग्न' शीर्षकाच्या 'पाठा'चा शेवट या गाण्यानं होतो,

*एक लाख की चूनर उसकी*
*सवा लाखकी साडी है*
*गुडिया राजदुलारी है।*

पहिल्या वर्गाच्या पुस्तकातली वरील उदाहरणं मुलांच्या नितळ ताज्या कल्पनाशक्तीला ज्या प्रकारचं राजकीय प्रशिक्षण देतात ते स्वतंत्र भारताच्या जाहीर धोरणाशी सुसंगत आहे असं म्हणवत नाही. खर्चिक लग्नं आणि पैसा-पैसा करणाऱ्या शेठजींच्या परंपरेतली महालांची शान आणि चमकधमक आपल्या बालसाहित्याचा प्रिय विषय असत आला आहे. पाठ्यपुस्तकांमधूनही हेच दिसतं. चांदोबाच्या राजमहालातले कापराचे दिवे, सोन्याचे मुकुट, हिऱ्या-जवाहरांनी मढलेली सिंहासनं, चपळ घोड्यांवरचे राजकुमार आणि फुलांच्या बिछान्यावर तळमळत असलेल्या राजकन्या, गरीब प्रजेचे हाल जाणून घेण्यासाठी वेष बदलून निघणारे राजे, दुष्काळापासून सुटका झाल्यावर राजाचा विजयघोष करणारे प्रजाजन ही चित्रं आपल्या मुलांना कोणत्याही प्रकारच्या समाजवादी देशाचे नागरिक बनविण्यासाठी तयार करीत नाहीत. यातल्या नव्याण्णव टक्के मुलांच्या जीवनाचा या चित्रांशी काहीही संबंध नाही. पाठ्यपुस्तकंच कशाला, लोकप्रिय बालसाहित्य आणि मुलांच्या मासिकांचा दृष्टिकोनही मुळात सरंजामशाहीचाच आहे. 'सव्वा लाखाची' साडी नेसणाऱ्या 'राजकन्या' बाहुल्यांसारख्या सजून-धजून असणाऱ्या उच्चमध्यमवर्गातल्या बालिकांचे चेहरे हिंदीच्या सर्वाधिक खपाच्या *पराग* किंवा *नंदन*च्या मुखपृष्ठांची शोभा वाढवत असतात. वास्तववादाचं रूप प्रौढ साहित्यात दिसू लागलं असेल, पण बालसाहित्य — ज्यात पाठ्यपुस्तकंही येतात — ते मात्र आजही मध्ययुगीन मानसिकता आणि मध्यमवर्गीय नैतिकतेनं ग्रस्त आहे.

पाठ्यपुस्तकातून दिसून येणारी नैतिक दृष्टी उघड उघड अभिजात संस्कृतीच्या जीवनपद्धतीतून आलेली आहे आणि तीच आता आधुनिक भारतातल्या मध्यमवर्गानं मनापासून अंगीकारलेली दिसते. जगण्याच्या प्रत्येक अनुभवाला ही नैतिक दृष्टी फायदा-तोट्याच्या गणिताच्या पातळीवरून पाहते. 'फायदा' आणि 'तोटा' अशी दोन लेबलं आहेत. ज्यांच्या जागी आपण नैतिक विभाजन दाखविणारे कितीतरी जोड-शब्द ठेवू शकतो. उदाहरणार्थ, सत्य-असत्य, चांगलं-वाईट, दुष्ट-दयाळू. आपल्याकडे बालसाहित्यातलं नैतिक तत्त्वज्ञान जीवनाला अति सरल अशा तुकड्यांमध्येच वाटून पाहतं. कदाचित बालसाहित्याचे लेखक आणि कवी असं समजतात की मुलांची दृष्टी इतकी वरवरची असते की जगण्याचं जटिल मूल्यमापन करून ती आणखीनच गोंधळून जाईल. फार पूर्वीपासूनच तत्त्ववेत्ते कवितेला आपल्या उपदेशाचं साधन मानून सुभाषितांची रचना करत आले आहेत. असं सुभाषितयुक्त साहित्य मुलांना शिकवणं आणि घोकून घेणं नेहमीचं झालेलं आहे. एकीकडे या सुभाषितांमधून सटीप उदाहरणांचे चमत्कार दिसतात तर दुसरीकडे दृष्टिकोन आणि भावनेचा ढोबळपणाही दिसतो. रहीमच्या दोह्यातली ही ओळ पहा,

*हित रहीम तब जानिए जब अटकै कछु काम।*

(मध्यप्रदेश, इयत्ता तिसरी)

सरळ साध्या रूपकांच्या आधारे एकवेळ अवघडात अवघड असलेलं नीतिशास्त्र मुलांपर्यंत सहज पोहोचेल, पण नव्या कवींच्या कवितांद्वारे ते स्पष्ट होत नाही. हे होणं कठीणच दिसतं आहे. या कवींची दृष्टी एवढी विशाल आहे की त्यात संगती लावता येत नाही. छोट्याशा वाळक्या काडीलाही त्यांनी उपदेशकाच्या दृष्टीच्या आरोपातून सोडलेलं नाही. त्यांच्या मते झाडं-झुडपं, फुलं, आकाश, नद्या-नाले, पर्वत, फुलपाखरांपासून पोलीस-शिपायापर्यंत प्रत्येक वस्तू ईश्वरानं आणि प्रशासनानं मुलांच्या शिक्षणासाठीच जणू बनवली आहे. राजस्थानातील चौथीतील ही लोकप्रिय कविता पहा. फळं-फुलं-वेली, हवा, सूर्य, झाडं, पाऊस, दिवे, पृथ्वी आणि जलधारांबरोबरच दूध, पाणी आणि धुरापासूनही काही ना काही शिकवूनच सोडायची प्रेरणा देते :

*दूध और पानी से सीखो मिलना और मिलाना*
*और धुंए से सीखो बच्चों उंचेही पर चढना।*

या कवितेबरोबरच दुसऱ्या एका 'पाठा'त समाजाचं चित्र आदर्शांच्या भांडाराच्या रूपात दाखवलं आहे, ते असं :

*भंगी शिक्षा देता है कि समाज की गंदगी दूर करो।*
*भिश्ती यह बतलाता है कि बगीचा सींचो और*
*प्यासों को पानी पिलाओ। गाय सिखाती है की*
*बच्चों को प्यार से दूध पिलाकर पालो। सिपाही*
*कहता है कि सावधानीसे देश की रक्षा करो।*
*रसोइया कहता है कि गरमागरम बढिया चीजें बनाओ, खाओ, खिलाओ।*

मुलांसाठीचं हे असं घोर तत्त्वज्ञान एकीकडे त्यांचा वाच्यार्थ समजून घेण्याच्या क्षमतेला मारतं तर दुसरीकडे निसर्ग आणि समाजाशी असलेल्या संबंधाला एक प्रकारची यांत्रिकता देतं. नैतिक तत्त्वज्ञानाच्या ओझ्यामुळे या 'पाठां'ची भाषा जड होते. या पाठांच्या हास्यास्पदतेमुळेही त्यांची निरर्थकता लपू शकत नाही. अशा रचना करणाऱ्यांची बारीक नजर प्रतीकांच्या योजनेबाबत पूर्णतः उदासिन असते. कवितांमध्ये परस्परविरोधी प्रतिमा एवढ्या असतात की एखाद्या ठिकाणी योग्य प्रतिमेचा वापर दिसला की आश्चर्य वाटतं. लेखक कवींना हे माहीत नसतं की मुलं शब्दांनी नव्हे तर प्रतिमांच्या सहाय्यानं विचार करतात. साहित्याच्या अभ्यासाचीही तीच खरी पद्धतही आहे. ती ताकद वय वाढत जातं तशी शब्दांच्या औपचारिक व्यवहारबाहुल्यामुळे सहसा क्षीण होत जाते.

उत्तरप्रदेशच्या दुसऱ्या इयत्तेच्या मुलांना गांधींची थोरवी या शब्दात सांगितली जाते :

*लगते तो थे दुबले बापू*
*थे ताकत के पुतले बापू*

पाठ्यपुस्तकांच्या जगात शक्तीचा पुतळा असणं स्वाभाविक आहे. जसं पाषाणांमध्ये फुलं फुलवून, पर्वतांना धूळ बनवून म्हणणं की

*नम्रता भरी है, नस-नस में देखो*
*पर नही विरोधी के सम्मुख झुकते*
(मध्यप्रदेश, इयत्ता दुसरी)

अशा कविता वाचून मुलांना कविता म्हणजे परीराज्यातली गोष्टच वाटत असेल तर त्यात आश्चर्य वाटायला नको. पाठ्यपुस्तकांचे बहुतेक कवी भाषा आणि कल्पनेच्या दृष्टीनं रीतिकालीन काव्यपद्धतीच्या जवळचे आहेत. ते रूढ प्रतिमा, प्रतीकं, उपमा आणि शब्दच वापरतात. हिंदीतल्या गीतकाव्याप्रमाणे बालकाव्यातही रूढ शब्द आणि वाक्यांशाचं प्रमाण इतकं वाढलं आहे की मुलांपर्यंत काव्यदृष्टीसाठी आवश्यक असणारं संप्रेषण होऊ शकत नाही.

प्राथमिक इयत्तांमध्ये बहुतेक कविता कवीचं नाव न सांगताच शिकवल्या जातात. एखादी कविता जास्त प्रचलित झाली की ती सरकारी संपत्ती होते की काय? तरीही जी थोडीफार नावं दिसतात त्यात सोहनलाल द्विवेदी, द्वारिकाप्रसाद माहेश्वरी, निरंकारदेव 'सेवक', वेंकटेशचंद्र पांडेय आणि सुभद्राकुमारी चौहान हे सर्वाधिक बालोपयोगी समजले जातात. रामनरेश त्रिपाठी, ज्यांच्या 'छींक'सारख्या कवितांनी बालकवितेत नव्या शक्यता निर्माण केल्या होत्या, त्यांचं नाव कुठेही दिसत नाही. जुन्या कवींमध्ये तुलसी, सूरदास, मीरा आणि रसखान सर्वाधिक प्रचलित दिसतात. नव्या-जुन्या कवींच्या कवितांच्या शेवटी त्या पाठ करून त्यातून बोध घेण्याच्या सूचना दिलेल्या असतात.

राष्ट्रीय शिक्षण संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेने प्रकाशित केलेल्या चौथी आणि पाचवीच्या पुस्तकांत कवितांच्या शेवटी काही प्रश्न दिलेले आहेत. सर्वसाधारणपणे 'या कवितेचा सारांश थोडक्यात सांगा', 'भावार्थ लिहा' किंवा 'या कवितेतून तुम्हाला काय शिकवण मिळते ते लिहा'-- अशा स्वरूपाचे हे प्रश्न आहेत. सूरदासाच्या प्रसिद्ध पदावरुन 'मैया, कबहू बढेगी चोटी' मध्यप्रदेशातल्या पाठ्यपुस्तकात सांगितलेली 'शिकवण' म्हणजे दूध प्यायल्यानं आपलं आरोग्य उत्तम राहतं ! किंवा राजस्थानात *तुलसीमानस*बाबत शिकवलं जातं की हा ग्रंथ लिहून गोस्वामी तुलसीदासांनी भारतीय जनतेवर मोठाच उपकार केला आहे. कवितेला उपदेशाचं साधन बनवल्यानं संदेश शोधत राहणं हा कवितेलाच पर्याय बनतो आणि त्याशिवायचे शब्द केवळ सजावटीसारखे उरतात. ते नेमके बाजूला करून मग 'सारांश' लिहिला जातो. बहुधा या दुष्ट प्रक्रियेचा आधी विचार करूनच मग पाठ्यपुस्तकांसाठी कवितांची निवड होत असावी. अन्यथा अशा हास्यास्पद शब्दजुळवणीला कोण कविता म्हणेल?

*भौतिक सुखसुविधा सबको हो*
*सब जन होवे संत*
*बने कर्मयोगी जग सारा*
*हो संसार ससार*

*बनाएँ एक नया संसार*
*धरापर स्वर्ग मोक्ष अवतार।*

(राजस्थान, इयत्ता पाचवी.)

*एक एक भी शब्द नया प्रतिदिन रट पाएँ,*
*दो वर्षोंमें शब्द नए कितने आ जाएँ।*
*बडे वीर जौहर उन्होंने लिखाए*
*खिले वे कसौटी कुदिन पर कसाए*
*निखरते मिले वे विपद बांध पाए,*
*बने ठीक कुंदन गए जब तपाए।*

(हरियाणा, इयत्ता चौथी.)

नैतिकतेशिवाय मातृभूमीची स्तुती आणि ईश्वराच्या गुणगानासाठीही पाठ्यपुस्तकात कवितेची मदत घेतलेली आहे. एका धर्मनिरपेक्ष देशात ईश्वराचं अस्तित्व निराकारच असू शकतं. ईश्वराच्या चेहऱ्याविषयी सरकारला असलेला संकोच त्याच्या कवींनी कौशल्यानं सांभाळला आहे! त्यांनी ईश्वर शक्तीस्रोतालाच वंदन करून स्तुत्य मानवी गुणांनाही कवितेत आणलं आहे. या ईश्वर प्रार्थनांसोबत मुलांना निरपेक्ष भक्त म्हणूनच गृहीत धरलं आहे. त्याच्या पुष्ट्यर्थ या प्रार्थनासोबत दिलेल्या चित्रांमध्ये गणवेशातली हात जोडलेली मुलं दाखवलेली असतात. या कवितांमधून भक्ती आणि करुण रस पाझरत असतो.

*जिस ओर निगाहें जाती है*
*उसकेही दर्शन पाती है।*

(मध्यप्रदेश, इयत्ता पाचवी)

*सत्यवचन दो, बना मगन दो,*
*नई लगन दो हे भगवान।*

(राजस्थान, इयत्ता तिसरी.)

*जीभ मेरी आप के*
*गुणगान नित्य किया करे।*
*आपके चरणों में रह*
*मन चंचरीक जिया करे।*

(हरियाणा, इयत्ता तिसरी.)

शेवटच्या कडव्यात शिकवलेली जिभेबाबत शिस्त मुलांना मोठं झाल्यावर ईश्वरभक्तीबरोबर सामाजिक आणि कार्यालयीन व्यवहारातही उपयोगी पडेल असं बहुधा त्यांना सांगायचं असेल. धार्मिक सणांशी निगडित असलेला आणखी एक प्रश्न आहे: राष्ट्रीय शिक्षण संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेच्या दिल्ली आणि बिहारमध्ये प्रचलित असलेल्या 'आओ पढें और समझें' या पुस्तकात 'आपले सण' या कवितेत दिवाळी-दसऱ्याच्या वर्णनानंतर लिहिलं आहे :

*आया है त्यौहार बड़ा दिन, खुश होते ईसाई।*
*और ईद के दिन*
*ठाठ-बाट से ईदगाह को जाते मुस्लिम भाई।*

दिवाळी-दसऱ्याचा उल्लेख करताना हे हिंदूंचे सण आहेत असा उल्लेख करायची गरज भासली नाही, पण ईस्टर आणि ईदचा उल्लेख करताना मात्र 'भाई' म्हणून भिन्न धर्मीयांचा वेगळा उल्लेख आवश्यक का वाटला? वर्गाचं 'धार्मिक' संतुलन अशा विभाजनानं कुठेतरी आतल्या आत ढळू शकतं.

पाठ्यपुस्तकातल्या गद्य रचनांमध्येही सैल भाषेचा वापर सर्रास दिसतो. सैल भाषा म्हणजे ज्यात अनैसर्गिक सुबोधीकरण किंवा सुलभीकरण केलेलं आढळतं अशी भाषा. मोठ्या वाक्यांची लहान लहान अनेक वाक्य करणं म्हणजे सुलभ भाषा नव्हे. लेखकाची दृष्टी आणि त्याच्या विचारातली स्पष्टता आणि प्रामाणिकपणा यावर भाषेची सरलता अवलंबून असते. उत्तर भारतातल्या सगळ्या तीस-चाळीस पुस्तकांमधून मुश्किलीनं तीन-चार पुस्तकांत काही ठिकाणीच सुबोध गद्य वाचायला मिळतं. मुलांसाठी प्रवाही आणि रोचक लिहिणं दोनच स्थितीत शक्य आहे-

१. लिखाणाचा विषय मुलांच्या जगण्याशी प्रत्यक्ष संबंधित असेल.

२. लेखक प्रत्येक गोष्टीकडे मुलांच्या दृष्टीनं बघण्याचा प्रयत्न करील.

दोन्ही स्थितींत लेखकाच्या मनात मुलांची जीवनशैली आणि त्यांच्या दृष्टीबद्दल आदर असला पाहिजे. मोठ्यांची नजर आणि जग त्यानं मुलांवर लादू नये. एखाददुसरा लेखक सोडला तर हिंदीतल्या बहुतेक बालसाहित्यकारांना मुलांचं 'ज्ञानवर्धन आणि मनोरंजन' करण्यातच रस आहे. मुलांना मूल म्हणून राहण्याचा हक्क आहे आणि कुणा दुसऱ्याला त्यांच्या जगात प्रवेश कराया असेल तर त्याला आधी मूल व्हावं लागेल, हे ते स्वीकारतच नाहीत. पाठ्यपुस्तक लिहिणारे सरकारनियुक्त अधिकारी आणि लेखक हे कधीच समजून घेऊ शकत नाहीत आणि सरकार तर स्वत:च लवकरात लवकर मुलांना मोठं करून देशाचा कारभार त्यांच्या

हाती सोपविण्याचं नाटक करत असतं. हा उद्देश साध्य करण्यासाठी शासन, गाव आणि नगर प्रशासन व्यवस्था, पोलिसांचं काम, दळणवळण, देशाची महानता, समृद्धीची 'अस्सल' उदाहरणं, नेत्यांची चरित्रं असे विषय बालोपयोगी समजले जातात. अगदी सुरुवातीच्या वर्गांमध्ये असे विषय शिकवण्याचा हेतूच कदाचित हा असतो की मुलांची दृष्टी आणि कल्पनाविश्व आपल्या भोवतालाविषयी सजग होण्याआधीच देशाचं राजकारण मुलांनी गांभीर्यानं घ्यावं. त्याचा नंतर उपयोग होऊ शकतो.

प्रसिद्ध व्यक्तींची चरित्रं प्राथमिक वर्गांना शिकवून मुलांनी त्यातून प्रेरणा आणि स्फूर्ती मिळवावी हा हेतू समजण्यासारखा आहे. पण हे कधी शक्य आहे? जेव्हा मोठ्यांनी महत्त्वाच्या मानलेल्या कर्तृत्वाला मुलं महत्त्वाचं समजतील. रविशंकर शुक्ल कधी मुख्यमंत्री झाले किंवा देशात 'जागृती' आल्यानं एक हरिजन मुलगा उपजिल्हाधिकारी झाला हे सरकारी लेखकाला महत्त्वाचं वाटत असलं तरीही मुलांच्या मनात काही असं स्वाभाविक कुतूहल नसतं आणि असूही शकत नाही. त्यामुळे हे लेखक प्रशासकीय पदांचं महत्त्व मुलांच्या मनात ठसवत असतात आणि धाडसी सफरी, कठीण संकटातून एकट्यानं निभावलेल्या जबाबदाऱ्या किंवा व्यक्तिवैविध्यातल्या गोष्टींमधला मुलांचा नैसर्गिक कल हळूहळू कमी करत जातात. कंटाळवाण्या शैलीतली चरित्रं, राजकीय चरित्रातले वैतागवाणे किस्से यांचं प्रमाण वाढवून टाकून मुलांचा शिकण्यातला रस कमी कसा होईल हे बहुधा पाहिलं जात असावं. मध्यप्रदेशातल्या मुलांना चंद्रशेखर व्यंकटरामन यांचा धडा आहे. त्यात लिहिलं आहे, 'खात्यातल्या परीक्षेत पहिले आल्यानंतर खात्यातल्या सगळ्यात मोठ्या अधिकाऱ्यानं स्वत:च्या मुलीशी त्यांचं लग्न लावलं अन् नंतर त्यांनी मानाची मोठी नोकरी सोडून साधी शिक्षकाची नोकरी पत्करली.' यात कुठेही रामन यांनी केलेल्या संशोधनाचा उल्लेख नाही.

विनोबा, गांधीजी, नेहरू, पटेल यांची चरित्रं पाठ्यपुस्तकात खूपदा दिसतात. पण प्रेमचंद, रामानुजन, अल्लाउद्दीन खान, राहुल सांस्कृतायन, च्यवन, भारतेंदू अशी नावं कुठे दिसत नाहीत. एकाच प्रकारची श्रेयं गवसलेल्या राजकीय, कधी कधी सामाजिक अशा क्षेत्रातल्या व्यक्तींपुरतीच ही व्याप्ती ठेवून ही पाठ्यपुस्तकं जीवनाचं अतिशय ढोबळ असं चित्र मुलांपुढे मांडतात. विज्ञान, तत्त्वज्ञान, साहित्य, प्रवास, संगीत अशा क्षेत्रांतल्या प्रतिभावान व्यक्ती दुर्लक्षित राहतात.



हिंदी आणि सामाजिक शास्त्र या दोन्ही विषयांच्या जवळ जवळ सगळ्या पाठ्यपुस्तकांमध्ये पौराणिक नायक-नायिकांची चरित्रं आहेत. राम, कृष्ण, सुदामा, सावित्री आणि ध्रुव यांच्या कथा आपल्या सांस्कृतिक वारशाचा भाग आहेत हे कुणी अमान्य करणार नाही. आपल्या सामूहिक आंतरिक जाणिवेचाही त्या एक भाग असणं शक्य आहे. पण एवढ्यावरून असं मानायचं का की या कहाण्यांची चरित्रसृष्टी आणि त्यातली नैतिकता आपण आहे तशी स्वीकारून मुलांना सोपवावी? जर आपण एक नवं जीवनदर्शन, नवी सामाजिक दृष्टी स्वीकारली असेल, तर आपली सामूहिक आंतरिक जाणिवही निरपेक्षपणे समजून आणि पारखून घेतली पाहिजे. भूतकालाच्या गौरवातच जगत राहणं, आपल्या सांस्कृतिक वारशात सामावत राहण्याचा प्रयत्न करणं, गतगौरवाच्या मिथकांना राष्ट्रीयतेचा मुलामा देणं असे प्रकार दैववादी मानसिकतेतून उत्पन्न होतात. विशुद्ध सांस्कृतिक असं काही नसतं. धर्म किंवा निसर्गाबद्दल प्रेम वाटणंही. राजकीय आणि सामाजिक व्यवस्था आपल्या व्यक्तिमत्त्व, कल्पना आणि विचारांवर अटळ असा प्रभाव टाकत असतात. राम, कृष्ण आणि दुष्यंत कितीही 'महान' असोत, पण शेवटी अशा एका व्यवस्थेचा एक भाग होते ज्या व्यवस्थेत राजाचं जीवन, जन्म, मरण, विवाह हीच त्यांच्या अतिविशिष्ट अशा सामाजिक परिस्थितीची ओळख असायची.

पुराणांमधल्या आणि इतिहासपुरुषांच्या चरित्रांत राजकीय संस्कारांमधलं सरंजामीपण तर असतंच, या शिवाय दुसरी समस्या म्हणजे लैंगिकतेविषयीचे संस्कार आणि त्या संबंधीचा दृष्टिकोन. नायकांचा नायिकांविषयी असलेला दृष्टिकोन किंवा सावित्रीसारख्या पत्नीचे आदर्श प्राथमिक शाळेच्या मुलांमध्ये दुर्दैवी अशा प्रकारची विसंगती निर्माण करू शकतात. सरंजामी भूतकाळातूनच भारतात स्त्री-पुरुषांची विषम सामाजिक परिस्थिती निर्माण होत गेलेली आहे. राजकीयदृष्ट्या आपण सरंजामशाहीविरुद्ध असू तर सामाजिक संदर्भांबाबतही तसा पक्ष आपल्याला घेता येणार नाही. दुष्यंत -शकुंतला, सावित्री-सत्यवान, नल-दमयंती, राम-सीता यांच्या कहाण्या अशा समाजातल्या आहेत, ज्यात प्रेमाची सुरुवातच पत्नीचं संरक्षण किंवा तिची परीक्षा घेण्याच्या अधिकारातून होते. तिची हरएक बाब पुरुषाच्या अधीन आहे.

प्राथमिक स्तरावर देशात पन्नास टक्क्यांहून अधिक शाळांमधून सहशिक्षण दिलं जातं, पण सहशिक्षणासाठीच्या आवश्यक अशा मानसिकतेची तयारी कुठे काडीमात्र दिसत नाही. पाँडिचेरीच्या श्री. अरविंद आश्रमातल्या शिक्षणकेंद्रासारख्या

काही संस्था याला अपवाद आहेत. तिथं मुला-मुलींना एकत्र जगण्याच्या पद्धती शिकवल्या जातात. सहशिक्षणाची मानसिकता तयार करण्यात पाठ्यपुस्तकांची मदत होऊ शकते. पण आपली वर्तमानकालीन पाठ्यपुस्तकं ही जबाबदारी जाणतात असं दिसत नाही. उलट संधी मिळेल तेव्हा मुलं-मुलींना वेगवेगळी मनोभूमी तयार करण्याचा सल्ला देतात. हरियाणातल्या बालवर्गाच्या पाठातला मुलगा आईकडे बंदूक मागतो. या बंदुकीनं तो शत्रूला 'ठोऽ' करणार आहे. पण मुळाक्षराच्या चित्रामधली स्त्री अलंकारांनी व सौंदर्यपूर्ण वेषभूषेनं युक्त, मर्यादशील अशी दाखवली आहे. उत्तरप्रदेशातली मुन्नी सदा ओढणीत लपेटून बाहुलीला चिकटलेली असते. मध्यप्रदेशातली भोळीभाबडी राणी मुलींसाठी 'व्यवस्थित' राहण्याचा आदर्श उभा करते. लक्ष्मीबाई हा एकमेव अपवाद ठरू शकली असती, पण तिला 'मर्दानी' ठरवलं गेलं आहे. मध्यप्रदेशातल्या एका शाळेतल्या प्रीती नावाच्या मुलीच्या वहीचं पहिलं पान मला अजूनही आठवतं. त्यावर लिहिलं होतं :

प्रश्न- सावित्रीला एक आदर्श स्त्री का मानलं जातं?

उत्तर- कारण ती एक पतिव्रता स्त्री होती.

तिसऱ्या इयत्तेत सामाजिक अभ्यासाचं स्वतंत्र पुस्तक दिलं जातं. इतिहास, भूगोल आणि नागरिकशास्त्राची माहिती देणं हा या विषयाचा उद्देश मानला गेला आहे. या तीन वेगवेगळ्या विषयांना एका तार्किक संगतीत गुंफून लिहिणं हीच पुस्तक लिहिणाऱ्यांसाठी समस्या असते. कोणत्याही प्रदेशाचा किंवा देशाचा भूगोल कशाप्रकारे त्याच्या इतिहासाशी आणि राजकीय-आर्थिक यंत्रणेशी जोडलेला असतो हे दाखवणं हे मोठंच यश म्हणायला हवं. हे यश अजूनही राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेच्या अत्यंत कष्टपूर्वक तयार केलेल्या पुस्तकांनाही लाभू शकलेलं नाही. या पुस्तकात रेखाचित्रं, नकाशे आणि छायाचित्रांचं मोठं प्रमाण निश्चितच आहे. पण तुकड्या-तुकड्यांतल्या कंटाळवाण्या वर्णनांमुळे या पुस्तकांना सरकारी प्रचारकी प्रकाशनाचं स्वरूप येतं. ही पुस्तकं वाचून आपल्या देशाचं, प्रदेशाचं किंवा जगाचं कोणतंही स्पष्ट चित्र मुलांच्या मनात तयार होऊ शकत नाही. शाळा सोडल्यानंतर गंगा-यमुनेच्या सखल प्रदेशाएवढंच दख्खनचं पठार सपाट वाटेल, हे अगदी शक्य आहे. वाळवंटातला शुष्कपणा, आसामातला पाऊस आणि हिमालयाच्या पर्वतरांगा हा त्यांना सांस्कृतिक ठेवा वाटू शकणार नाही. आणि खरं तर हा सामाजिक विषयांच्या अभ्यासाचा मुख्य हेतू असला पाहिजे. हजार-बाराशे पानं वाचूनही (किंवा घोकूनही) हरियाणातला बहादूर सरगुज्यातल्या आदिवासींबद्दल आणि बिहारच्या कोळसा खाणीत काम करणाऱ्या मजुराचा मुलगा राजस्थानातल्या राजपुतांबद्दल अनभिज्ञ असेल. रोज ईश्वर प्रार्थनेबरोबर देशातल्या तमाम शाळांतल्या मुलांना राष्ट्रीय एकतेची शपथ दिली जाते. जोवर सरकारी पाठ्यपुस्तकांतून भूगोलातील प्राकृतिक वैविध्य, लोकांचं राहणीमान यांऐवजी प्रशासकीय कौशल्यं आणि स्वातंत्र्योत्तर काळातही रोमँटिक दृष्टीनं दिसणारी प्रगती याच गोष्टी घोकून घेतल्या जातील, तोवर त्या एकतेच्या शपथेला आणि प्रार्थनेला काही अर्थ नाही. आपलं गाव, आपली पंचायत, आपलं सरकार, आपल्या योजना, आपली प्रगती, आपले पुढारी या सगळ्यांचं महत्त्व एवढ्या जोरजोरात सांगायचं कारण काय? याच्या तुलनेत आपली जंगलं, पर्वत, नद्या, पशु-पक्ष्यांचं वर्णन मात्र ही पुस्तकं जमाखर्च मांडण्याच्या शैलीनं करतात. पाचव्या इयत्तेसाठीच्या पुस्तकातील परदेश वर्णनात हे प्रमाण अगदी उलट आहे. यामुळे मुलं अर्जेंटिनातल्या रहिवाशांचं भौगोलिक वास्तव समजू शकतील पण बस्तरच्या आदिवासी नृत्याला प्रजासत्ताक दिनाच्या परेडची तयारीच समजत राहतील.

प्राकृतिक भूगोलाच्या मूलभूत बाबींसोबत प्रादेशिक भूगोलाचा ताळमेळ कोणत्याही पुस्तकात दिसत नाही. खरं तर अनेक पुस्तकांमध्ये प्राकृतिक भूगोलासंबंधी अक्षम्य चुका आहेत आणि निश्चितच त्या मुद्रणातल्या चुका नाहीत. पाऊस कसा पडतो या प्रश्नाचं उत्तर आजही अनेक पुस्तकातून जे मिळतं त्यावरून असं वाटेल की पाऊस खरोखरीच ढगांच्या आणि पर्वतांच्या टक्करीतून पडतो. ढग वाफेपासून बनतात की बाष्पापासून याबद्दल राजस्थान, मध्यप्रदेश आणि उत्तरप्रदेशातल्या विद्वानांमध्ये मतभेद आहेत. या पुस्तकांतल्या वर्णन, शब्दरचना आणि वाक्यरचनेतल्या सगळ्या चुका दाखवायच्या तर २५-३० पानांची पुस्तिकाच लागेल.

इतिहास हा विषय शिकवायची तऱ्हा आजही राजे-महाराजांची थोरवी विहिरी खणण्याच्या आणि सावलीसाठी झाडं लावण्याच्या माध्यमातून सिद्ध करण्याचाच प्रकार आहे. वेगवेगळ्या काळात देशातल्या लोकांचं सामाजिक आणि सांस्कृतिक जीवन कसं होतं हे जाणून घेण्याची बालजिज्ञासा पुढे नावं आणि सनावळ्यांच्या जंगलात हरवून जाते. धर्मशाळा बांधणं, विहिरी खोदणं, रस्त्यांवर झाडं लावणं हे एखाद्या राजाच्या कामाचं फलित आहे, असं म्हणणं म्हणजे लोकांच्या अधिकाराबद्दलची उदासीनता लपवणं आहे. ही उदासीनताच जणू इतिहासाच्या पानांमधून निघून स्वतंत्र भारताच्या लोकशाहीत घुसू पाहत आहे. जुन्या काळातल्या राजांचं जे कर्तृत्व सांगितलं जातं, ती लोकशाही सरकारची स्वाभाविक कामं आहेत अशी चलाखी भाषेत केली जाते. म्हणजे सरकारनं आपल्याला बसायला बागा केल्या आहेत, अंधार घालवायला वीज आणली आहे. मलेरिया-पोलिओ घालवण्याचे

कार्यक्रम चालू आहेत. डीडीटी फवारायला सरकारी कर्मचारी पाठवले जातात इत्यादी कवितेसारखंच इथेही मुलांना या शब्दांचा अर्थ विचारला तर कदाचित बिचारी हेच म्हणतील की सरकारनं भाग्नीय जनतेवर असंख्य उपकार केले आहेत. हे सगळं अशा रीतीनं शिकवण्यामागे अजब सरकारी धोरण आहे. 'म्हणजे समजा जवाहरलालांनी जर असं ठरवलं असतं की वडिलांचा वकिलीचा आरामाचा व्यवसाय करायचा, तर ते समृद्ध आणि आरामदायी आयुष्य जगू शकले असते. पण त्यांनी कष्टाचा मार्ग अनुसरला'. त्याचप्रकारे काहीच न करायचं सरकारनं ठरवलंही असतं, पण आपलं कर्तव्य जाणून सरकारनं बागा, रस्ते, धरणं आणि आणखी काय काय बांधलं. काम करणं ही काही सरकारची कृपा नाही, तर त्याच्या अस्तित्वाची ती अटच आहे, हे भारतातली मुलं कधी आणि कशी शिकणार आहेत? स्वातंत्र्योत्तर काळातल्या आजच्या शिक्षणव्यवस्थेत तरी ते अवघडच दिसत आहे.

उरलंसुरलं नागरिकशास्त्र दोन पानांत नागरिकांचे अधिकार (ज्यात संपत्तीच्या अधिकाराचा कोणत्याही प्रदेशातल्या पुस्तकात उल्लेख नाही.) आणि कर्तव्यं सांगत असतं. कधीतरी खेडी आणि शहराच्या संबंधावर काही उल्लेख असतात. या विषयाच्या पुस्तकात मध्यप्रदेशातल्या मोहनला आपल्या वडिलांकडून माहिती मिळते की 'शहरात लोकांना ना शुद्ध हवा मिळते ना शुद्ध पाणी, त्यामुळे त्यांची शरीरं पिवळी पडतात.' राजस्थानातला नरेंद्र विचारतो की 'त्याच्या गावाची प्रगती का होत नाही?' तेव्हा त्याचे आजोबा म्हणतात, 'हे खूप जुन्या काळी असं वसलेलं गाव आहे म्हणून इथले रस्ते असे वाकडे-तिकडे आहेत.' जुन्या गावावर काही उपाय असतो की नाही? समाजातल्या कुप्रथा आणि मागासवर्गीयांच्या जागृतीबद्दल काही पाठ्यपुस्तकात लेख सापडतात. राजस्थानातल्या पडदा-प्रथेवर आणि बालविवाहाच्या समस्येवर 'मुन्नी की शादी' नावाची कथा आहे. त्यातला सोहन आईला विचारतो, 'आपली मामी तर पडदा पाळते. पण तू तसं नाही करत.' यावर आई म्हणते, 'तुझे मामा जुन्या विचारांचे आहेत. पण तुझे वडील नव्या विचारांचे आहेत. त्यांना हे असं आवडत नाही.' या कथेत बालविवाह आणि पडदाप्रथेबद्दल जरा कळू लागतं. पण हा समज दृढ केला जातो की आई-बहिणीचं स्वातंत्र्य ही वडिलांची कृपा आहे.

याच प्रकारे 'आपले सामाजिक दोष' या निबंधात अस्पृश्यता आणि स्वच्छता यांचा गोंधळ उडवला आहे. 'बघा, चंदू (एक हरिजन मूल) कसा नीटनेटका, स्वच्छ होऊन आला आहे. आपण त्याची घृणा करू नये.' हरिजन सवर्णातला फरक आर्थिक आधारावर हिमाचल प्रदेशातल्या 'भाषेची ओळख'च्या पुस्तकात आणखी 'वरच्या' जातीतल्या दाखपलेल्या फरकातून प्रकट होतो : 'सुदामा ब्राह्मण होता, आणि कृष्ण क्षत्रिय. पण दोघांचं परस्परांवर खूप प्रेम होतं.' यातला गर्भित अर्थ असा की गरीब ब्राह्मण आणि क्षत्रिय 'समान' दर्जाचे आहेत, म्हणून ते मित्र होऊ शकतात. वस्तुतः आपल्या पाठ्यपुस्तकांत ज्ञान आणि माहितीच्या नावाखाली सतत जातींचे, वर्गांचे उल्लेख येतात. या परिस्थितीत समान राहणीच्या एका लोकशाही प्रजासत्ताकाची आपण कल्पनाच करायला नको.

(३)

विज्ञानाची पुस्तकं पाहताच लक्षात येतं की आपले पाठ्यपुस्तक निर्माते विज्ञानालाच वैज्ञानिक माहितीचा पर्याय समजत आले आहेत. एखाद्या दृष्टिकोनाचं नामाभिधानही विज्ञान असू शकतं, पण त्यांची अशी काही धारणा नसते. शब्द आणि व्याख्या घोकून घेणं हाच त्यांचा उद्देश असतो. वैज्ञानिक दृष्टिकोनाबद्दल तर ते उदासीन आहेतच; पण विज्ञानाची उपयुक्तता आणि आसपासच्या जगाशी असलेल्या त्याच्या संबंधाची ओळखही त्यांना बिनमहत्त्वाची वाटते. 'शिक्षणाला जगण्याच्या जवळ आणा' ही मागणी भारतासहित जगातल्या शिक्षणसमुदायातून होत आहे. भारतात त्याचा परिणाम असा झाला की शिक्षणाचा जीवनाशी जो काही थोडाबहुत संबंध होता तोही तोडला जातो आहे. शिक्षणाच्या माध्यमातून एक नवं, जादुई जग मानसिक स्तरावर निर्माण केलं जात आहे. यातून वास्तव जगातल्या समस्यांपासून पराङ्मुख होण्याचा सरावच फक्त होऊ शकतो. विज्ञानाची बहुतेक शालेय पुस्तकं वाचून तरी किमान असा समज होऊ शकतो. बिहारशिवाय इतर राज्यांतल्या पुस्तकांचा संबंध दैनंदिन जगण्यातल्या विज्ञानाच्या उपयोगांशी नाही असं दिसतं. विशेषतः शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेद्वारे वा त्यांच्या सहकार्यानं तयार केलेल्या पुस्तकांमध्ये प्रशासकीय शब्दरचना किंवा आधुनिक म्हणवणारी बोजड, मृतवत जटिलताच सापडते. ही पुस्तकं मुळात इंग्रजीत तयार केली गेली होती. हिंदी भाषक राज्यांत ती वापरायला सुरुवात झाल्यावर त्यांची भाषांतरं किंवा अंशतः पुनर्लेखन केलं गेलं. भाषांतरासाठी वर्षानुवर्षं सरकार मोठमोठे कोश तयार करवून घेत आहे. भाषेला संपन्न बनवण्याच्या नादात यांच्या निर्मात्यांनी शैलीतील सुधारणा किंवा स्वाभाविकतेला कायमच गौण मानलं. विज्ञानातल्या लॅटिन शब्दांना संस्कृत प्रतिशब्द देताना ते बोलीभाषेतले साधे सरळ शब्द विसरून गेले. त्यांचा उद्देश हिंदी भाषेतला जगातले संपन्न शब्दकोश तयार करण्याचा अधिक होता. विज्ञानाच्या पुस्तकातल्या या भीतिदायक कृत्रिम भाषेमुळे मुलांवर विकृत भाषिक

संस्कार होणं हे जास्त क्लेशकारक होतं. मध्यप्रदेशात मुलं ज्या हिंदी भाषेत विज्ञान शिकतात ती भारतात कुठेही बोलली जात नाही. तिच्यात किंचितही चित्रमयता नाही. ती निव्वळ क्रूर पुस्तकी भाषा आहे.

*तंत्रिका तंत्र तंत्रिका कोशिकाओंका बना होता है। प्रत्येक तंत्रिका-कोशिका में कोशिकाएँ, छोटे छोटे उद्‌वर्ध या तंत्रिकाक्ष होते है। आच्छाद में बंद तंत्रिकाओं को तंत्रिका-तंतू कहते है। (इयत्ता आठवी)*

हे वाक्य एका समीक्षालेखात उद्‌धृत केल्यावर मग नव्या आवृत्तीतून गाळलं गेलं. तरीही या पुस्तकात 'प्रगंडिका', 'उर्विका', 'मणिबंधिका', (ही मानवी शरीरातील हाडांची नावं आहेत) 'अध्यावरणीतंत्र', 'अग्रचर्वणके', 'बाह्यकर्णकुहर' आणि 'यमगोलाणू' यांसारखे डझनावारी शब्द आहेत, ज्यांचे उच्चारही मुलांसाठी अवघड आहेत. शिवाय भुलभुलैयांसारखी ही अशी वाक्यं :

*मस्तिष्क के प्रमस्तिष्क-गोलार्ध का बल्कुट हृदय तथा रुधिर वाहिकांओंपर प्रभाव डालता है।*

राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन आणि प्रशिक्षण परिषदेच्या सहकार्यानं मध्यप्रदेश पाठ्यपुस्तक मंडळाद्वारे निर्मित विज्ञानाची ही पुस्तकं म्हणजे हिंदी भाषेच्या इतिहासातला सगळ्यात भीतीदायक आणि धोकादायक प्रकारच्या प्रयोगांचा खजिना आहे. खाली दिलेल्या उदाहरणांमध्ये शाब्दिक क्लिष्टता नाही, पण रचनेतलं वैचित्र्य पहा :

*मछलियाँ मुँह में पानी लेती हैं जो गिलों में से लेकर गिलों के उपर से उस पानी को गिल दरार से बाहर निकाल देती है।*

(आओ करके सीखें; इयत्ता ५वी)

*बार-बार एवं जल्दी-जल्दी की क्रिया से पानी की लगातार जैसी धारा प्राप्त हो जाती है।*

(भौतिकशास्त्र; इयत्ता ६ वी)

ही भाषा वैज्ञानिक दृष्टिकोन किंवा माहितीचं संप्रेषण तर करीतच नाही कारण सामान्य लोकांच्या भाषेशी तिचा संबंध नसल्यानं ती तर चित्रमय नाहीच; पण अशा भाषेमुळे मुलांवर विकृत भाषिक संस्कार होऊन त्यांची दृष्टी प्रदूषित मात्र होऊ शकेल.

एकीकडे शब्दकोशांचा इतका उथळ वापर या विज्ञानाच्या पुस्तकांमध्ये दिसतो तर दुसरीकडे शैलीच्या दृष्टिकोनातून उपदेशात्मक प्रश्न वाईट तऱ्हेनं विचारण्याची वृत्ती दिसते. 'हा रूळ उचला', 'ती नळी ठेवा', हे पहा, ते पहा, 'आपल्या शिक्षकांना विनंती करा'. आपली विज्ञानाची पुस्तकं या प्रकारच्या आज्ञांनी भरून गेली आहेत. काही सांगून झाल्यावर लगेच प्रश्न विचारणं किंवा आदेश देण्याच्या या पद्धतीची तुलना दूरदर्शनच्या मुलाखतकर्त्यांशी होऊ शकेल.

*टॉर्च समजा सूर्य आहे आणि चेंडू म्हणजे पृथ्वी तर हे तुम्ही सांगू शकाल का की दिवस आणि रात्री कशा होतात? चेंडूच्या एका बाजूला 'भारत' आणि दुसऱ्या बाजूला 'अमेरिका' लिहा. अमेरिकेच्या भागातही तुम्हाला प्रकाश दिसतो?*

(इयत्ता तिसरी)

विज्ञानाच्या पुस्तकातल्या या भाषेचा संबंध जगभरातल्या माहितीला आणि शास्त्रीय ज्ञानाला विज्ञान शिक्षणाचं एक अपरिहार्य अंग मानणाऱ्या अवैज्ञानिक दृष्टिकोनाशी आहे. कोणत्या प्रक्रियेचं किंवा गतीचं काय नाव आहे याचा मुलांना काय उपयोग आहे? नावं किंवा व्याख्या आता भलेही उपयोगाच्या नसू देत, पण 'पुढे' जाऊन याचा उपयोग नक्कीच होईल असं म्हटलं जातं. असं म्हणणाऱ्यांना हे विचारलं पाहिजे की जी मुलं 'पुढे' जात नाहीत त्यांच्यासाठी या व्याख्यांचा काय अर्थ आहे? विज्ञानाचं हे सैद्धांतिकीकरण मुलांसाठी बौद्धिक दडपण मात्र बनून राहतं. पण हे म्हणणंही वस्तुस्थिती पुरेशी स्पष्ट करणारं नाही. समस्या बहुतेक मुलं 'पुढे' न जाण्याची नाही, तर मुलांसाठी अशा प्रकारचं सैद्धांतिकीकरण अनुपयुक्त असण्याचीच आहे. विज्ञानाच्या सैद्धांतिक बाजूपेक्षाही जास्त महत्त्व त्यांच्या कल्पनाक्षम आणि उपयोगी अशा बाजूंचं आहे. विहिरीवरचा रहाट आणि आत जाणारी बादली यांच्या गतींपैकी कोणती स्थानांतरणीय कोणती अस्थानांतरणीय आहे हे समजून घेणं म्हणजे रहाटाची उपयुक्तता सांगणं नव्हे. पण मध्यप्रदेशच्या सातव्या इयत्तेच्या विज्ञानाच्या पाठ्यपुस्तकात या गतींमधला फरक दाखवण्यात समाधान मानलं गेलं आहे. याच पाठाच्या सुरुवातीला स्थिर आणि गतिशील वस्तूंमधला फरक दाखवला आहे. त्यासाठी नदीकाठचं झाड (कमी गतिशील) आणि नदीचं वाहतं पाणी हे उदाहरण म्हणून दिलं आहे. याच्याबरोबर आधी असा उल्लेख आहे की वाहतं पाणी गतिशील वस्तू असून झाड ही स्थिर वस्तू आहे. हा विरोधाभास म्हणजे विज्ञानाला सैद्धांतिक बनवण्याच्या अट्टाहासाचा अंतिम परिणाम आहे.

माहितीच्या दडपणाचं सगळ्यात वाईट उदाहरण म्हणजे हरियाणा आणि

राजस्थानातली पुस्तकं आहेत. उघड उघड दिसतं की ती 'वरच्या' इयत्तेतल्या पुस्तकाची काटछाट करून बनवलेली आहेत. प्रयोगांच्या आणि तत्सम चित्रांची यात लयलूट आहे. परीक्षण नळ्या, फ्लास्क आदींनी युक्त ही चित्रं दिसतातही प्रभावी, पण शालेय मुलं, विशेषतः ज्यांच्या शाळांमध्ये प्रयोगशाळांचाच पत्ता नसतो, त्यांना ही चित्रं पाहून विज्ञान म्हणजे आपल्या जीवनाशी काहीही संबंध नसणारी गोष्टच वाटते. बिहारच्या पुस्तकांमध्ये मात्र विज्ञानाच्या प्रयोगांसाठी ग्रामीण वा घरातल्याच वस्तू दाखवल्या आहेत. चूल आणि पितळी पेल्यांच्या चित्रांतूनही विज्ञानाचे प्राथमिक प्रयोग करता येतात, हे ही पुस्तकं दाखवून देतात.

विज्ञानाच्या पुस्तकांमध्ये अलीकडे सामान्य ज्ञानाचा परिघ आणि ओझं वाढू लागलं आहे. पूर्वी विज्ञानाच्या वेगवेगळ्या विषयांचं स्वतंत्र अध्यापन आठवीनंतर सुरू व्हायचं. आता ते पाचवीनंतर होऊ लागलं आहे. असं म्हटलं जातं, की विज्ञानाच्या एकूण माहितीचं प्रमाण वाढत आहे. त्यामुळे अभ्यासक्रम 'खाली' सरकवणं आवश्यक झालं आहे. या अधोमुखी गतीचा मुलांच्या वयाशी संबंध शोधणं आवश्यक आहे. छोटी छोटी मुलं अवजड दप्तरं घेऊन शाळेवरच्या वाटेत कधीकधी क्षणभर थांबून विसावतात. हे त्यांचं सकाळी सकाळी असं थकणं सहज लक्षात येतं. त्यावरून हेही लक्षात येतं की अभ्यासक्रमात सामग्रीच्या प्रमाणात वृद्धी हा किती अवैज्ञानिक विचार आहे.

या सामग्रीच्या वाढीचा एक गमतीशीर पैलू असा आहे की अशी वाढ सगळ्या क्षेत्रांत झालेली नाही. भौतिकशास्त्र आणि रसायनशास्त्रात ही वाढ जास्त आहे. प्राणी आणि वनस्पतीशास्त्रात थोडी कमी आहे. आरोग्य आणि आहारविज्ञानात वाढीच्या ऐवजी सामग्री-साहित्याचं प्रमाण कमी झालंय. आरोग्यासाठी आवश्यक भोजन, स्वच्छता, योग्य सवयींच्या माहितीचं प्रमाण आधीच्या पुस्तकातही जास्त नव्हतंच, आता ते तेवढंही नाही. नखातल्या मळानं काय नुकसान होतं हे कोणत्याही पुस्तकांत लिहिलेलं नाही. सातवीतला विद्यार्थी जीवनसत्त्वांची रासायनिक नावं आणि त्यांचे गुणधर्म सांगूही शकेल, पण भाजी शिजविल्यानंतर कोणती तत्त्वं नष्ट होतात हे सांगू शकणार नाही. पाठ्यपुस्तकांमध्ये आरोग्य आणि आहाराच्या बाबतीत अज्ञानाची आश्चर्यजनक पोतडी आहे. आपल्याकडे पोषक आहार तर सोडाच पुरेसं जेवणही भाग्यवान लोकांनाच मिळतं. अशा परिस्थितीत मुलांना आरोग्य आणि पोषणविषयक ज्ञानापासून वंचित ठेवणं हा एक विशिष्ट राजकीय 'जाणिवे'चा कट आणि एक दुर्दैवी चूकही असू शकते. वस्तुतः आरोग्य आणि आहार हा विषय मुलांसाठी विज्ञान शिक्षणातला अतिशय उपयुक्त आरंभबिंदू होऊ शकतो. अज्ञान, गोंधळ किंवा उदासीनतेतून येणाऱ्या अनेक हानिकारक सवयी टाळण्यासाठी आरोग्यशिक्षण उपयुक्त ठरू शकतं. भारतात अशी अगणित मुलं आहेत जी ज्ञान आणि मदतीच्या अभावामुळे एका चक्रात सापडतात आणि मोठे होता होता अनैसर्गिक मानसिक समस्यांमध्ये अडकतात. मुलींच्या बाबतीत हे अधिक प्रमाणात होतं, कारण मुलांच्या तुलनेत अधिक एकाकीपण आणि चतुर्मुखी घेरावाची व्यवस्था समाजानं त्यांच्यासाठी केली आहे. अनैसर्गिक मानसिक विकासाची रूपं मुलांमध्ये काही प्रमाणात वेगळी असतात. पण ती उत्पन्न होतात शरीर, आहार आणि आरोग्याबाबतच्या अज्ञान आणि उदासीनतेमुळेच. विज्ञानाच्या पाठ्यपुस्तकात या विषयांचा समावेश करणं एका अतिशय महत्त्वाच्या सामाजिक परिवर्तनाच्या दिशेनं टाकलेलं पाऊल ठरू शकतं.

पण हे पाऊल उचलण्याआधी विज्ञानाबाबतचा आपल्या वागणुकीचा दृष्टिकोन सामाजिक होणं आवश्यक आहे. उच्च संशोधन केंद्रांपासून प्राथमिक शाळांच्या पाठ्यपुस्तकापर्यंत जो दृष्टिकोन आज आपण पाहत आहोत तो सामाजिक नसून प्रशासकीय आहे. दृष्टिकोनातलं परिवर्तन हे राजकीय परिवर्तनाशी जोडलेलं असतं हे खरं आहे. प्रशासकीय राजकारण कोणत्याही क्षेत्रात सामाजिक दृष्टिकोन देऊ शकत नाही. परंतु राजकीय जाणिवांमध्ये परिवर्तन हा काही कार्यक्रम होऊ शकत नाही; तो व्यापक जाणिवेचाच परिणाम असू शकतो आणि त्याचा एक भाग मुलांची पाठ्यपुस्तकं होऊ शकतील. आज केवळ इतकंच शक्य आहे की आपण मुलांच्या पुस्तकात अस्तित्वात असलेल्या राजकीय विचारांचं प्रशासकीय रूप ओळखायला हवं. सामाजिक अभ्यासविषयाच्या पुस्तकांच्या संदर्भात हा प्रयत्न मी मागील भागात केला आहे. विज्ञानाच्या पुस्तकांमधील प्रशासनाचं राजकारण ओळखण्याची एक पद्धत मी वर सूचित केली आहे. विषयांच्या निवडीचं परीक्षण करण्याची आरोग्य आणि आहारासारखे काही इतर विषय, ज्याबाबत पुस्तकातून मिळणारी माहिती खूपच कमी आहे किंवा अजिबातच मिळत नाही असे वास्तुशिल्प, पर्यावरण, प्रदूषण, कुटिरोद्योग आणि कृषी असे आणखी काही विषय आहेत. शेतीविषयक माहिती मला फक्त उत्तरप्रदेशातल्या पुस्तकांत मिळाली. ती बरीच आधी लिहिली होती आणि कदाचित आता बदलणारही आहे. वास्तुशिल्पाविषयी माहिती बऱ्याच पाठ्यपुस्तकांत दिसते; पण ती अत्यल्पच नाही तर पूर्वग्रहदूषितही आहे. उदाहरणार्थ, दिल्लीच्या पाचव्या इयत्तेच्या पुस्तकात गृहरचनेच्या पाठाखाली एक प्रश्न आहे, 'आपल्या घरातल्या प्रत्येक खोलीला किती खिडक्या-दरवाजे आहेत, स्वैंपाकघरात पाणी जाण्याची व्यवस्था आहे की नाही? वॉर्निश केलेलं आहे की नाही?' चांगल्या घरात अनेक दारं-खिडक्या, स्वैंपाकघरातून पाणी बाहेर जाण्याची

*राष्ट्रगीत में भला कौन वह*
*भारत-भाग्य-विधाता है*
*फटा सुथन्ना पहने जिसका*
*गुन हरचरणा गाता है*
*मखमल टमटम बल्लम तुरही*
*पगड़ी छत्र चँवर के साथ*
*तोप छुडाकर ढोल बजाकर*
*जय-जय कौन कराता है।*

**रघुवीर सहाय**

व्यवस्था, वॉर्निश्ड फर्निचर असणं आवश्यक आहे या पूर्वग्रहातून हे प्रश्न विचारलेले आहेत. एक गरीब मूल या प्रश्नाचं उत्तर देऊ शकत नाही आणि श्रीमंताचं मूल उत्तर देता येऊनही एक-दोन खिडक्यांचं छोटं घरही राहण्यायोग्य असू शकतं, हे समजू शकत नाही.

प्रदूषणासंबंधीची माहितीच जणू मुलांसाठी वर्ज्य आहे, या देशातल्या प्रौढांनाही त्यात रस नाही. आपल्या नद्यांचं पाणी आणि शहरातली हवा अजून आपल्या चिंतेचा विषय झालेला नाही. आत्ता आत्ता काही भागांत मलेरियाचं उच्चाटन करण्याचा निश्चय झाला आहे. पश्चिमेतली प्रदूषणाची चिंता आपल्याकडे स्वीकारण्याइतकी जुनी झालेली नाही. पश्चिमेत अणू आणि अवकाश विज्ञानाच्या क्षेत्रात प्रदूषणाच्या गंभीर परिणामाची भीती व्यक्त केली जात आहे आणि इथं हे विषय एवढे नवे आहेत की आम्ही आपल्या सफलतेच्या आनंदात ही दुसरी बाजू बघूच शकत नाही आहोत. मध्यप्रदेशातल्या तिसऱ्या इयत्तेच्या पुस्तकाची – जे ग्रामीण आणि आदिवासी मुलं शिकताहेत – त्याची सुरुवातच चंद्रावर उभ्या असलेल्या मनुष्याकृतीनं होते. अमेरिकन अंतरिक्षयात्री आणि भारतीय समाजाचं काहीही नातं नाही,पण जगातल्या शक्तिशाली देशांच्या राजकारणाशी आहे. आपले पाठ्यपुस्तकांचे निर्माते भारतीय मुलांना आधुनिक बनविण्याची कोणतीही संधी सोडत नाहीत. विज्ञानाचे महान शोध आणि प्रशासकीय राजकारणाशी त्यांचा जेवढा दाट संबंध आहे, तेवढा भारतीय मुलांशी असता तर त्यांना कळलं असतं की आठ वर्षांचं मूल भारतातल्या किंवा जगभरातल्या श्रीमंत वर्गानं तयार केलेल्या मोजपट्ट्या आपल्या जगण्याला लावत नाही.

■

**संदर्भ :**

१. उदाहरणार्थ, मध्यप्रदेशातल्या शाळा १९७३ साली १ जुलैऐवजी १५ जुलैला उघडल्या कारण पुरेशी पाठ्यपुस्तकं उपलब्ध नव्हती. (पहा : *दिनमान*, १९ ऑगस्ट १९७३.)
२. ही सात राज्यं आहेत : हरियाणा, राजस्थान, दिल्ली, उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश, बिहार आणि हिमाचल प्रदेश.
३. १९७२ साली हे विश्लेषण केलं गेलं होतं.
४. सिल्विया ॲश्टन-वॉर्नर : *टीचर,* लंडन, सॅकर अँड वारबर्ग, १९६३.

# प्रार्थना : एक शैली[१]

प्रार्थनेचं स्थान भारतीय जीवनात शाळेच्या तुलनेत खूपच पुरातन आहे. शाळेची उपयुक्तता म्हणजे शासनाच्या प्रचारापुरती उरली आहे. कारण शाळेचं समाजात, विशेषतः ग्रामीण समाजात, खास असं स्थान निर्माण झालेलं नाही. याउलट प्रार्थना ही सर्वसामान्य कृती आहे. तिचं एक निश्चित स्वरूप असतं. शाळेनं प्रार्थनेला एका दैनंदिन प्रथेप्रमाणे स्वीकारलेलं आहे. प्रार्थनेचं रूप बदलण्याऐवजी शाळेनं आहे तशाच स्वरूपात प्रार्थनेला आत्मसात केलं आहे. भारतीय जीवनात शाळा-घंटा, रांगा, वर्ग, हजेरी, पाठ्यपुस्तकं, परीक्षा, स्पर्धा, बक्षिसं, प्रमाणपत्रं अशा ज्या औपचारिक गोष्टी जिवंत आहेत, त्यांतली एक महत्त्वाची औपचारिकता म्हणजे प्रार्थना आहे. प्रार्थना रोज होते, प्रत्येक शाळेत होते, म्हणून काहीतरी होण्याचा आभासही निर्माण करते. त्यामुळे हे सगळं उपयुक्त आहे का असा प्रश्न कधी विचारला जात नाही. यात काहीच आश्चर्य नाही. प्रार्थनेचं प्रयोजन, त्यात व्यक्त केलेल्या दृश्य भावनांची वास्तविकता आणि तिचे मनोवैज्ञानिक अर्थ यांबाबतचे प्रश्न बहुतेकांना पडत नाहीत. त्यांच्यासाठी प्रार्थना एक पवित्र गोष्ट आहे. तिची परीक्षा घेतली जात नाही. कुणी जर म्हटलं की मुलं प्रार्थनेचा मान ठेवत नाहीत. तर ते म्हणतील, 'प्रार्थनेचा महिमा पुन्हा स्थापित करण्यासाठी प्रयत्न केले जावेत. खुद्द प्रार्थनेत काही खोट असू शकत नाही.'

धर्म वा संप्रदायाच्या नावावर किंवा पैशावर चालणाऱ्या शाळांमध्ये होणाऱ्या प्रार्थना आपण समजू शकतो. पण देशातल्या लाखो सरकारी शाळा आणि नगरपालिकेच्या शाळांमधून रोज प्रार्थना म्हटली जाते. धर्मनिरपेक्ष आणि लोकशाहीवादी शासनाने चालवलेल्या शाळांमधून कुणाची प्रार्थना केली जाते? त्या दैवताची आकृती कशी असते? ही दैवतं जर धर्मनिरपेक्ष असतील तर कोणती मूल्यं ती सांगतात? भारतीय सामाजिक जीवनात शाळेचं स्वरूप समजून घेण्यासाठी असे मूलभूत प्रश्न विचारणं आवश्यक आहे. त्या आधारेच हे कळू शकेल की स्वातंत्र्यानंतर स्वीकारलेल्या राष्ट्रीय मूल्यांचा मुलांच्या शिक्षणावर कोणता आणि कसा परिणाम होतो आहे? प्रार्थनेला शालेय जीवनाचा भाग मानणारे बरेच लोक शिक्षणक्षेत्रात आहेत. ते या प्रश्नांना अप्रस्तुत मानतात. त्यांच्या मनात कुठेतरी आजही शिक्षण म्हणजे एक प्रकारे धार्मिक संस्कार आहे. धर्मनिरपेक्ष राज्यात हा संस्कार कुणा एका विशिष्ट धर्माच्या मतापासून आणि संस्कारांपासून मुक्त असायला पाहिजे, पण असं झालेलं नाही. आपली धर्मनिरपेक्षता प्रत्यक्षात धर्माच्याबाबतीत शासकीय उदासीनता (तीही नावापुरती) दाखवते. समाजाला धर्मापेक्षा जास्त प्रतिष्ठा नाही. यामुळेच मुलांच्या शिक्षणाशी संबंधित असणाऱ्या लोकांना 'धर्म हेच शिक्षणाचं प्राणतत्त्व' मानणं शक्य झालं आहे.

धर्म आणि ईश्वराच्या रूपाशिवाय आणखी एका पातळीवर शिक्षण आणि धर्म यांच्यात युती झालेली दिसते. ही पातळी धर्माच्या मनोवृत्तीची आहे. व्यापक दृष्टिकोनातून असं म्हणता येतं की धर्माचा सगळ्यात सहज परिणाम म्हणजे समर्पणाची भावना आहे. भारतात मुलांच्या शिक्षणाबाबतचा लोकप्रिय समज शोधायचा झाल्यास 'समर्पणा'पेक्षा अधिक योग्य शब्द सापडणार नाही. शालेय जीवनाचा अभ्यास करण्यासाठी देशातल्या वेगवेगळ्या भागांतल्या शाळेत घालवलेल्या वेळेत मिळालेल्या अनुभवाच्या आधारावर मी हे सांगू शकतो की मुलांना शरणागत किंवा आज्ञेत राहायला शिकवणं, हा त्यांच्या शिक्षकांचा आणि त्यांच्यावर नियंत्रण ठेवणाऱ्या अधिकाऱ्यांचा डाव आहे. ती त्यांची स्थितिशीलताही आहे. शरणभावाचा हा संस्कार व्हावा म्हणून शाळेच्या जीवतोड प्रयत्नातील एक साधन म्हणजे प्रार्थना आहे. विनयाची जेवढी काही रूपं असतील तेवढी सगळी प्रार्थनांमध्ये कुठे ना कुठे असतातच. ज्यांच्यापुढे नत व्हावं अशा आराध्य रूपांना तीन कोटीत विभागता येईल.

१. ईश्वर, २. देश, ३. प्रशासक. याच्या स्वरूपाबाबतचं विश्लेषण या लेखाच्या तिसऱ्या भागात केलेलं आहे. पहिल्या भागात प्रार्थना व्यवस्था आणि तिच्या प्रयोजनावर दृष्टिक्षेप टाकला आहे. प्रार्थना निव्वळ कर्मकांड आहे की प्रभावी विधान आहे, याबाबत दुसऱ्या भागात विचार मांडले आहेत. लेखाच्या चौथ्या भागात प्रार्थनांमधल्या विषयांपैकी आणखी चार विषय चर्चेसाठी घेतले आहेत. निसर्ग,

समाज, जग आणि व्यक्तिमत्त्व. प्रार्थनेच्या आशयात ईश्वर, देश, प्रशासक, निसर्ग, समाज, शील या सहा सूत्रांशिवाय जवळ जवळ आणखी काहीही नसतं. प्रार्थनेचं संपूर्ण विश्लेषण करण्यासाठी त्यातल्या रूप, प्रतिमा आणि संस्कारांचा सखोल अभ्यास करणं आवश्यक आहे. कारण या बाबी भारतीय समाजातल्या प्रचलित धर्माचा भाग आहेत. अशा प्रकारचा अभ्यास प्रस्तुत लेखाच्या वा पुस्तकाच्या कक्षेबाहेरच शक्य होऊ शकेल. माझा उद्देश प्रार्थनेद्वारे बनणाऱ्या मुलांच्या मानसिक आराखड्याचा शोध घेणं असा आहे.

१

शाळेची अशी जी व्यवस्था असते तिच्या काही पैलूंबद्दल प्रस्तुत पुस्तकाच्या दुसऱ्या प्रकरणात चर्चा केलली आहे. हे पैलू शाळेच्या दिनचर्येत बहुतांश वेळ अदृश्य असतात. खोल्या-खोल्यांत विभागलेली शाळा वर्गाच्या आत विभागलेली दिसत नाही. फारतर ती एका अदृश्य व्यवस्थेनुसार चालू असल्याचं दिसतं. प्रत्यक्षात ही व्यवस्था शाळेची पठडी झाल्याचं आपल्याला प्रार्थनेच्या वेळी स्पष्टपणे दिसतं. प्रार्थनेच्या वेळी वयानुसार वर्गवार विभाजन पाहता येतं. व्यवस्थेच्या दृष्टीनं रांगांचं औचित्य समजू शकतं. पण त्यातून प्रकट होणारी आणखीही एक गोष्ट आहे. ती म्हणजे प्रार्थनेवर असलेल्या शाळाचालकांच्या प्रचंड विश्वासानंतरही शाळेला एकात्म ठेवण्याची शक्ती त्यातून मिळू शकत नाही. हात जोडून, डोळे मिटून प्रार्थना म्हणताना स्वतःला त्या भावनेत विसरून मूल अगदी आपला वर्ग आणि रांग विसरेल एवढं स्वातंत्र्य त्याला दिलं जात नाही. प्रार्थनेत त्यानं स्वतःला विसरावं अशी अपेक्षा केली जाते, पण वर्गाच्या चौकटीत राहूनच!

या चौकटीलाच शालेय व्यवस्था शिस्त असं म्हणते. शालेय संस्कृतीत शिस्त म्हणजे शरणागती असाच अर्थ अपेक्षित आहे. शाळेच्या चौकटीतल्या नियमांना संपूर्णपणे शरण जाणारा विद्यार्थीच शिस्तशीर ठरतो. शाळेची वर्गवार व्यवस्था, शिक्षकाचा महिमा, घंटा आणि प्रार्थना ही 'शिस्त' राखण्यासाठीची अप्रत्यक्ष साधनं आहेत. शिक्षा हे प्रत्यक्ष साधन आहे. प्रार्थनेच्या वेळी अनेक शाळांमधून दोन्ही प्रकारची साधनं वापरली जाताना दिसतात. रांगेत उभं नसणं, प्रार्थनामुद्रेत चूक – म्हणजे डोळे उघडणं, हसणं किंवा कुणाला चिडवणं किंवा नीट उच्चारण नसणं – या 'गुन्ह्यां'साठी शिक्षकांच्या छडीचा प्रसाद मिळू शकतो. मारण्याचे प्रकार आता पूर्वीपेक्षा कमी आहेत हे खरं आहे, पण छडी, चापटीचे प्रयोग मी स्वतः अनेक शाळांमधून पाहिले आहेत. शिक्षक-विद्यार्थ्यांचं प्रार्थनेच्या वेळी वागणं कसं असतं ते या वर्णनात पहा : 'प्रार्थनेच्या वेळी मुलं रांगेत उभी होती. आपले पंजे काखेत दाबून, डोळे मिटून होती. दोन-तीन शिक्षक छडी घेऊन फिरत होते आणि हालचाल करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पाठीवर सटासट मारत होते.'

बहुतेक शाळांमधून मुलं प्रार्थनेच्या वेळी उन्हात उभी असतात. भारतात हिवाळा आणि पावसाळ्याचे काही दिवस सोडले तर ऊन काही फारसं सुखद नसतं. सप्टेंबर-ऑक्टोबर किंवा मार्च-एप्रिल-मेच्या कडक उन्हात शिक्षक कडेकडेला सावलीत उभे राहतात, मुलं भक्तिभावानं पण सैनिकांसारखी उन्हाशी सामना करीत असतात. आई-वडिलांचं आहार आणि आरोग्याविषयीचं अज्ञान आणि कुपोषणांनी ग्रस्त असलेली मुलं उन्हात जास्त वेळ उभी राहू शकत नाहीत. याप्रकारची माझी अगदी एक दुखरी आठवण कोटखाईच्या (हिमाचलप्रदेश) शाळेची आहे. सुंदर हिरव्यागार डोंगरउतारावरच्या त्या शाळेत रोज सहा-एक मुलं रांगेतून बाहेर पडून सावलीत जाऊन बसायची. हिमाचलचं मेमधलं ऊन जे माझ्यासाठी अतिशय सुखकर असणारं ऊन त्यांच्यासाठी सहन करण्यापलीकडचं होतं. सावलीत बसलेल्या त्या मुलांचे अशक्त चेहेरे पाहूनच मला समजू शकलं की आरोग्य आणि स्वातंत्र्यापेक्षाही शिस्त आणि व्यवस्थेला जास्त महत्त्व देणारी ही संस्कृती प्रत्यक्षात किती राक्षसी आहे.

शाळेच्या दैनंदिन व्यवहारात शिक्षकांना प्रार्थना यामुळेही उपयुक्त वाटते की त्यानिमित्तानं सगळी मुलं आणि शिक्षक एका ठिकाणी जमतात. विशेषतः मुख्याध्यापकांची अशा आमसभेच्या वेळी सोय अशी होते की एका जागी उभं राहून सूचना आणि आदेश देता येतात आणि वर्गा-वर्गात गेल्याशिवायच शाळेतल्या एकूण उपस्थितीचा अंदाज करता येतो. अर्थात एवढ्या सोयीसाठी प्रार्थना हवी असं म्हणता येत नाही. काही शिक्षकांना वाटतं, की प्रार्थनेच्या वेळी सगळ्यांना गणवेशात व्यवस्थित पाहून मुलांच्या मनात अभिमानाची भावना निर्माण होते. शिक्षकच नव्हे तर काही मुलांनाही याप्रकारचा अनुभव आहे. मला वाटतं, की हा काही प्रार्थनेचा उपयोग नाही. प्रार्थनेऐवजी समजा शोकगीत गाण्यासाठी जरी मुलं एकत्र झाली, तरी दृश्य तसंच राहील. अभिमानाची भावना कदाचित तेव्हा नसेल. एकसारख्या गणवेशात अनेक लोकांना शिस्तशीर उभं राहिलेलं पाहण्यातले भाव पाहणाऱ्यांच्या मनाच्या लष्करी प्रशिक्षणातून येतात, त्याविषयी पुस्तकाच्या पहिल्याच प्रकरणात मी हे स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. आधुनिक शिक्षणाच्या अनेक प्रचलित समजुतींचा खरा अर्थ सैनिकीकरण हाच आहे.

रोजच्या रोज म्हणूनही मुलांना प्रार्थना पाठ असतेच असं नाही. विचारल्यावर मुलं स्पष्ट सांगतात की त्यांना प्रार्थना अजिबात आवडत नाही. करायला लागते म्हणून करतात. प्रार्थनेचे समर्थक मुलांच्या या उदासीनतेचं कारण सांस्कृतिक मूल्यांच्या व्यापक पराभवात शोधतात. नैतिक विघटन आणि सार्वत्रिक अध:पतनाच्या काळात प्रार्थना एका निष्प्रभ कर्मकांडाच्या रूपातच उरते हेही ते मान्य करतात. इथे हे उघड आहे की प्रार्थनाप्रथेचा ऱ्हास हा समाजातला सरसकट ऱ्हास असंच ते मानतात. सामाजिक जीवनातल्या ऱ्हासाचे काही स्रोत प्रार्थनेत असू शकतात, हे त्यांना मान्य होणारं नाहीच.

समाजाच्या बदललेल्या परिस्थितीत आणि समजुतींमध्ये प्रार्थनेत अंतर्निहित असलेली मूल्यं आणि रूपं अनेकदा विसंगतच नव्हे तर प्रतिगामी ठरू शकतात. यावर प्रार्थना समर्थकांचा गमतीदार दावा असतो की 'प्रार्थना तर केवळ रिवाज म्हणून करायची असते, रोज रोज सरावाने म्हणता म्हणता मुलांसाठी ती इतकी यांत्रिक होते की त्यांच्यासाठी शब्दांचे काही अर्थ राहत नाहीत. म्हणजे 'प्रार्थनेची खरी उपयुक्तता तिच्या औपचारिक रिवाजाच्या रूपात पाहिली जावी. दैनंदिन रिवाज म्हणूनही प्रार्थना या रूपात मनावर एक संस्कार करते. शाब्दिक रूप आणि अर्थ-तर्कापलीकडचा संस्कार. वेगळ्या प्रकारे म्हणायचं तर प्रार्थनेचे निव्वळ शब्द महत्त्वाचे किंवा अर्थपूर्ण असतातं असं नाही, तर ते केवळ माध्यम असतात. त्यांद्वारे शरणभावाच्या उद्दिष्टांपर्यंत जाता येतं. शब्द बदलत राहतील. उद्दिष्ट नेहमी एकच असतं. कारण हे उद्दिष्ट मानवी समाजानं ठरवलेलं आहे. मानवी स्वभाव अपरिवर्तनीय आहे.' या दाव्याचा आधार किती तकलादू आहे हे सांगण्याची गरज नाही. दैनंदिन रिवाजाचा औपचारिक संस्कार योग्य मानला जात असेल आणि जेव्हा त्याचा शाब्दिक अर्थच संशयास्पद असेल तर असा रिवाज अजिबात स्तुत्य मानता येणार नाही. मुलं खरोखरीच प्रार्थनेच्या शब्दांचा शाब्दिक अर्थ स्वीकारणार नाहीत याची काय खात्री?

या चर्चेची दुसरी एक बाजू शिल्लक राहते. निष्कर्षाप्रत जाण्यासाठी तिची आपल्याला मदत होऊ शकेल. प्रार्थना जर खरंच केवळ एक उपचार असेल, तिचे शब्द फक्त माध्यम असतील आणि उद्दिष्ट एक असेल, तर एकच प्रार्थना नेहमीसाठी असायला हवी. समकालीन परिस्थितीचा प्रभाव जसा साहित्यावर पडतो तसा प्रार्थनेवर प्रभाव पडायला नको. कोणत्याही संस्थेतल्या प्रार्थनांचा काही वर्षांचा इतिहास पाहिल्यास हे समजू शकतं की प्रार्थना त्या त्या काळाशी स्पष्टपणे निगडित असतात. पुढे दिलेल्या उदाहरणांवरून हे लक्षात येतं की आपल्या काळाशी आणि भोवतालाशी जेवढी शासनधोरणं जोडलेली असतात तेवढीच प्रार्थना जोडलेली आहे. असं नसतं तर कधी परिस्थितीचा रेटा तर कधी शासनाच्या दबावामुळे प्रार्थनेत बदल झाला नसता.

प्रार्थनेचं वेगवेगळ्या ठिकाणी सर्वेक्षण करताना देशाची परिस्थिती आणि प्रार्थनेत केलेले बदल यातला संबंध दाखवणारे असे बरेच संवाद वाचायला मिळाले. पाटण्याच्या मारवाडी विद्यालयाच्या स्थापनेच्या वेळी म्हणजे १९३८ साली प्रार्थना म्हणून हे लोकप्रिय गीत स्वीकारलं गेलं :

*हे प्रभो आनंददाता, ज्ञान हमको दिजीए,*

*शीघ्र सारे दुर्गुणों को दूर हमसे कीजिए।*

१९४२ च्या आसपास एक राष्ट्रीय प्रार्थना म्हणून गायिली जात होती, तातडीनं इंग्रज सरकारनं ती बंद करवली आणि तेव्हा 'मिलता है सच्चा सुख केवल भगवान तुम्हारे चरणों में' ही प्रार्थना सुरू केली गेली. याचबरोबर 'जय जगदीश हरे' आणि *रामचरित मानस* मधल्या चौपायाही गायल्या जायच्या. १९४७ साली स्वातंत्र्य मिळाल्यावर 'भगवान रहे निरंतर दृढ संगठन हमारा' ही प्रार्थना स्वीकारली गेली. आजही ती म्हटली जाते.

राजनांदगावच्या एका शाळेत १९६२ च्या चिनी आक्रमणापर्यंत गयाप्रसाद शुक्ल 'सनेही' यांचं एक गूढ गीत प्रार्थनेत गायलं जात होतं :

*तू है गगन विस्तीर्ण तो मैं एक तारा क्षुद्र हूं।*

*तू है महासागर अनंत मैं एक धारा क्षुद्र हूं।*

चिनी आक्रमणानंतर या गीताऐवजी *'वह शक्ति हमें दो दयानिधे, कर्तव्यमार्ग पर डट जाये'* हे गीत सुरू झालं. या दोन्हींची तुलना करुन मी एक निष्कर्ष काढला आहे, त्याचा उल्लेख या लेखाच्या चौथ्या भागात केला आहे. या दोन्ही उदाहरणांमध्ये राष्ट्राच्या ऐवजी देवाची उपासना आणि गूढवादाच्या जागी कर्तव्याची प्रार्थना हे बदल परिस्थितीतल्या बदलामुळे झाले. दुसरं एक उदाहरण, - आमतौरच्या (सारण) शाळेचं आहे, जिथं चिनी आक्रमणापर्यंत सरस्वतीची प्रार्थना, निरालांचं गीत *वर दे वीणा वादिनी* गायलं जायचं. नंतर विद्येच्या देवीला मातृभूमीच्या सन्मानासाठी बाजूला व्हावं लागलं आणि जयशंकर प्रसादांचं गीत प्रार्थना म्हणून गायलं जाऊ लागलं. हे मूळ गीत त्यांच्या *चंद्रगुप्त* या ऐतिहासिक नाटकात

तक्षशिलाच्या नागरिकांचं प्रेरणास्रोत आहे :

*हिमाद्रि तुंग शृंग से प्रबुद्ध शुद्ध भारती*
*स्वयंप्रभा समुज्ज्वला स्वतंत्रता पुकारती*
*अमर्त्य वीर पुत्र हो दृढ प्रतिज्ञ सोच लो*
*प्रशस्त पुण्य पंथ है, बढ़े चलो, बढ़े चलो।*

नऊ वर्षांनंतर, बांगलादेशाच्या निर्मितीनंतर पुन्हा एकदा प्रार्थना बदलण्याचा निर्णय झाला आणि या वेळी तत्कालीन राजकीय परिस्थितीशी जुळणारी ही प्रार्थना होती :

*भगवन् हमारा तनमन संसार के लिए हो।*

बांगलादेशाच्या निर्मितीच्या वेळी भारताच्या स्पष्टपणे जाणवणाऱ्या कर्तव्य भूमिकेशी हे जुळणारं होतं.

यावरून हे स्पष्ट होतं की समाज आणि देशातल्या परिस्थितीशी प्रार्थनेचा सरळ सरळ संबंध असतो. लोक समजतात तसा प्रार्थना हा केवळ एक उपचार नाही. त्यांतले शब्द आणि त्यांचे अर्थ विशिष्ट भावावस्थेत जनसामान्यांच्या मानसिकतेशी संबंधित असतात. याचा एक पुरावाच मला १९४०-४२ च्या पंजाबातलं वातावरण रेखाटणाऱ्या पुढील उताऱ्यातून मिळाला.

*त्या काळी शाळाशाळांमधून इंग्लंडच्या राजाचं 'आयुष्य वाढावं' म्हणून सामूहिक प्रार्थना व्हायची. त्या दरम्यान स्वातंत्र्य चळवळ तीव्र झाली आणि 'लब पे आई है दुआ बन के तमन्ना मेरी, तेरे दर पे रोज सबेरे हम करते है दुआ खुदाया' ही प्रार्थना मुस्लीम प्रभावामुळे गायली जाऊ लागली. सगळ्या धर्मांचे विद्यार्थी ती गायचे. त्यात धार्मिक भेदभाव नव्हता. प्रार्थनेच्या वेळी गावातले मुसलमान बांधव शाळेच्या बाहेर, विहिरीच्या कठड्यावर, जवळच्या भिंतींवर उभे राहायचे अन् मुलांपेक्षाही मोठ्या आवाजात गाऊ लागायचे. त्याच वेळी शाळेत नवे मुख्याध्यापक आले आणि दुसऱ्या दिवसापासून 'हम बालकों की ओर भी भगवान तेरा ध्यान हो' गायली जाऊ लागली. त्याच दिवसापासून बाहेरची गर्दीही कमी झाली.*[१]

३

प्रार्थनेत परंपरेनेच ईश्वर-प्रार्थना अभिप्रेत आहे. शालेय प्रार्थनेत ईश्वराचं स्वरूप कधी अवतारवादी असतं तर कधी निराकार. निराकार रूपातही ते संदर्भाप्रमाणे कधी हिंदू तर कधी इतर धर्मांना अनुकूल होत असतं. दिल्लीच्या एका शाळेत गेली शंभर वर्षं म्हटली जाणारी प्रार्थना निराकार ब्रह्माकडे हिंदू रीती-नीतीप्रमाणे चालणाऱ्या समाजाचं मागणं मागते :

*ब्रह्मन स्वराष्ट्र में ही द्विज ब्रह्मतेजधारी*
*क्षत्रिय महारथी हो अरिबल विनाशकारी*

यानंतर प्रार्थनेत दुभत्या गायी, बलिष्ठ अश्व आणि सुभग स्त्रिया मागितल्या आहेत. प्रार्थना करणारा स्पष्टपणे हे समजून चालला आहे की 'ब्रह्मन' काहीही करू किंवा देऊ शकतो. पण मुलांची ग्रहणक्षमता अमूर्त नसते. शब्दांमध्ये ती चित्रमय अर्थ शोधत असतात. यजुर्वेदातल्या ऋचांवर आधारित असलेल्या वरील प्रार्थनेचा तात्त्विक अर्थ काहीही असो, मुलांसाठी यांमधे वर्णन केलेला 'ब्रह्मना'चा चेहरा अशा एका बलशाली व्यक्तीचा असतो जी काहीही करू शकते. शालेय प्रार्थनांचा विचार करताना त्यातल्या आशयाच्या विश्लेषणात जाणं उचित होणार नाही, कारण प्रत्येक शब्द आणि प्रतिमा या गोष्टी आपल्याला बालमानसशास्त्राच्या संदर्भात बघायच्या आहेत. पण बहुतेक शालेय प्रार्थनांमधले जड, तत्वज्ञानाचे शब्द पाहता असं वाटतं की देशातले पालक मुलांना लहान वयातच तत्त्वज्ञान शिकवू पाहताहेत. मुलांची भाषा, कल्पनाविश्व आणि त्यांच्या जिज्ञासेचे विषय माहीत करून घ्यावेत, त्याप्रमाणे मुलांशी वागणं ठरवणं याच्याशी त्यांना काही घेणं-देणं नसतं. आपल्या समवयस्क मित्रांच्याबाबतीत हे सगळं ते करतात. पण मुलांबाबत नाही! असं केल्यानंतरच त्यांना कळू शकेल की प्रार्थनेतलं तत्त्वज्ञान कोणत्या रूपात मुलांपर्यंत पोहोचत असेल.

या प्रार्थना ज्या ईश्वराचा महिमा मुलांच्या मनात ठसवू इच्छितात, तो दिसो वा न दिसो पण त्याची शक्ती आणि प्रभाव यांमुळे तो राजसी वैभवाचा पुतळाच आहे. त्याचा महिमा चराचरापासून मनुष्यापर्यंत सर्वत्र पसरला आहे. ब्रह्मांडाच्या सरंजामी कल्पनेत तोच एक प्रभावी शासक आहे.

*मुझको वनस्पती से बृहस्पती तू बना सकता अहो।*

तो दयाळू राजासारखा दाता आहे. स्वतःच्या महानतेपायी तो आपल्या दयेचा चमत्कार दाखवतो, पण लोकांना हे जाणवून द्यायलाही विसरत नाही की ते त्याच्या महानतेमुळेच जिवंत आहेत. प्राथमिक वर्गांच्या सामाजिक विषयांच्या पुस्तकात लिहिलेलं आढळतं की अमुक राजा चांगला होता कारण त्यानं रस्त्यांच्या दोन्ही बाजूला डेरेदार वृक्ष लावले किंवा विहिरी बांधल्या. या प्रकारच्या शब्दांमधून प्रार्थना

सामान्य, निसर्गदत्त सोयी-सुविधांना ईश्वरी सत्तेच्या प्रतीकांमध्ये बदलले जाते:

*पेडों से फल तूने लगाए*
*गल्ले सब तूने उपजाए*
*जो इस दुनिया में आते हैं*
*तेरा ही दिया खाते है।*

शालेय प्रार्थनेतला देव कधी सूर्याच्या रथावर आरूढ आहे तर कधी आपल्या कृपादृष्टीनं सृष्टीचं पालन करणारा आहे. त्याची सगळी रूपं, बसण्याच्या मुद्रा आणि ठिकाणं यात एक प्रकारची राजसी मस्ती आहे. साधारण क्षमतेचं मूल हे जरा दबून जाऊनच पाहतं. अमोघ शक्तीनं संपन्न असलेल्या ईश्वराच्या बाललीला कुणाला काव्यानंद देत असतीलही, मुलांसाठी त्या एक विराट चमत्कारच असतात. त्याच्याशी मिळतेजुळते चमत्कार तो समाजात पाहतो. प्रार्थनेत व्यक्त झालेल्या स्तुतीचा वास्तविक हेतू आध्यात्मिक वा पारलौकिक का असेना, शेवटी प्रार्थना समाजातील शक्तींच्या पोषणालाच मदत करते. या संदर्भात काही उदाहरणं पाहूया :

*पितृ मातृ सहायक स्वामि सखा तुम ही इक नाथ हमारे हो*
*महाराज महा महिमा तुम्हरी समुझे बिरले बुधवारे हो।*

कोट्याच्या महाराजांनी या प्रार्थनेच्या शेवटी हे पद जोडलं होतं :

*बार-बार विनती करै हाथ जोड जगदीश*
*स्वस्थ सुखी कोटेश हो, जीवैं कोटि बरीश!*

हे स्पष्ट आहे की मूळ गीत ईश्वर प्रार्थनाच आहे. पण शेवटी जोडलेला दोहा मुलांसाठी संदर्भ आणि अर्थ पूर्णत: बदलू शकतो. प्रार्थनेत ईश्वरासाठी वापरलेली विशेषणं शेवटच्या जोडलेल्या पदात मूर्त होतात. जरी शब्दानुसार राजाचं जीवित असणं ईश्वराधीन असलं तरी ईश्वराची विशेषणंही एक प्रकारे स्थानांतरित होतात.

जयपूरच्या शाळेत स्वातंत्र्यापूर्वी *'शरणागत पाल कृपाल प्रभो, हमको इक आस तुम्हारी है,'* अशी एक प्रार्थना म्हटली जायची. तिच्या शेवटी या दोन ओळी म्हटल्या जायच्या :

*हाथ जोडकर करहुँ यह विनती दीनदयाल*
*अमर अकंटक करहु प्रभू मानसिंह महिपाल।*

ग्वाल्हेर राज्यातल्या सगळ्या शाळांमध्ये *'धन्य धन्य हे नाथ दयामय अखिल विश्व के स्वामी'* या प्रार्थनेच्या शेवटी मुलं जिवाजीराव महाराजांविषयीचा आदर *'जुग जुग जीवैं जीवाजी महाराज हमारे'* असं म्हणून व्यक्त करायची. ज्या राजाचं इष्ट ते व्हावं म्हणून हजारो मुलांना प्रार्थना करावी लागत असेल तो राजा प्रार्थनेत ईश्वरासाठी वापरलेल्या विशेषणांच्या अर्थांवर प्रभाव टाकणारच आणि प्रार्थनेतला गूढ वाक्प्रचार आणि विराट प्रतीकांना लौकिक पातळीवर मूर्त बनवत त्यामध्ये स्वत:ची प्रतिमा तो व्यवस्थित बसवण्याचा प्रयत्न करीलच. असं होताना मुलांच्या मनात प्रार्थनेतील उपमा समाजात उपलब्ध असलेल्या उपमेयांशी जोडल्या जातील. अर्थात प्रार्थनेत कुणी जर 'अखिल विश्वाचा स्वामी' असेल, तो आपले महत्त्व आणि देवत्व राज्याच्या शासकाकडे (अर्थस्थानांतरण होताना) सोपवू शकतोच. ईश्वराप्रती शिकविलेला आदर आणि विनय कालांतरानं शासक वा शासनसत्तेला उपयुक्त अशा विनयाचं काम करू शकतो. हे सरंजामी व्यवस्थेत जेवढं शक्य आहे तेवढंच लोकशाही समाजातही शक्य आहे. विशेषत: शासकीय यंत्रणेचं स्वरूप सरंजामशाही दृष्टिकोनावर आधारलेलं असेल तर ही शक्यता असतेच.

प्रशासकाच्या स्वरूपातला ईश्वर बहुतेक प्रार्थनांमधून वर्णन केलेल्या निसर्गात दिसत असतो. भूगोल आणि विज्ञानाच्या पुस्तकात निसर्गाविषयी जी माहिती मुलांना दिली जाते, ती प्रार्थनेतल्या माहितीशी जुळत नाही. वर्णन गूढ शैलीतलं असो किंवा ढोबळ शब्दातलं, चमत्कार दाखविणारं असो, प्रार्थनेतली सृष्टी शेवटी जादुई-चमत्कृती करणाऱ्या परमेश्वराची सगळ्यात व्यापक अभिव्यक्ती असते. ही सृष्टी काही स्वयंभू, सुंदर वा महत्त्वाची नाही, कारण तिचं अस्तित्व ईश्वराच्या कृपेवर अवलंबून आहे. फार तर विविधतेचा आभास निर्माण करणारं ते प्रतीक आहे. प्रार्थना जर खऱ्या मानल्या तर ही सगळी विविधता किंवा एकता नियंत्रित आहे. तिच्यावर ईश्वराचं नियंत्रण आवश्यक आहे. कारण ती खरी नाही. दृष्टिभ्रम आहे, माया आहे. सत्य तर एकच असू शकतं आणि निसर्ग किंवा सृष्टी अनेक रूपांत आपल्यासमोर असते.

*सागर से उठा बादल बनकर*
*बादल से फूटा जल होकर*
*फिर नहर बनी नदिया गहरी*
*तेरे विभिन्न स्वरूप तू एकही है।*

शेवटच्या ओळीतला 'तू' निसर्गातल्या वेगवेगळ्या दृश्यांमध्ये आणि वस्तूंमध्ये प्राणतत्त्वासारखा विद्यमान आहे. चंद्र, सूर्य आणि पानापानांत त्याचं अस्तित्व आहे.

*सुनहरी सूर्य की किरणों में तू ही जगमगाता है,*
*कलाधर की कलाओं में कला से मुस्कुराता है*
*हरेक पत्ते हरेक बूटे में है उसका पता चलता*
*उसे ढूँढे अगर कोई तो है वह हर जगह मिलता।*

मुलांमध्ये निसर्गातल्या वस्तुमात्रांशी मैत्री करण्याची स्वाभाविक प्रवृत्ती असते. प्रार्थनांमध्ये वर्णन केलेला निसर्ग मैत्रीची कोणतीही शक्यता निर्माण करीत नाही. त्या निसर्गाचं रूप एवढं देवमय आहे की त्याचं सौंदर्य चमत्कारप्रिय ईश्वराच्या थोरवीचा पुरावा बनून राहतं.

*जर्रों में तेरी ताबिश तारों मे तेरा जलवा*
*तेरी ही यह जमीं है और आसमान तेरा।*
*कौनो मकान तेरा औला मकान तेरा*
*आली है शान तेरी ओ आसमानवालें।*

ज्या प्रार्थनांमध्ये यापेक्षा कमी रहस्यमयता आहे, त्या विविधताविरोधी ईश्वराची प्रतिष्ठापना अधिकच यशस्वीपणे जास्त यशस्वीपणे करतात. कधी निसर्गवर्णनातून त्या एकप्रकारे मृत्यूची जाणीव निर्माण करतात तर कधी कौतुकपूर्ण ऊहापोह आणि प्रत्यक्ष वास्तवाबद्दल संशय निर्माण करतात.

*फीका फीका चाँद उसे भी बादल ढाँपे*
*अंधड तूफानों से उपवन उजड़े जाते,*
*हे प्राची के भानु उदित हो नव प्रभात दर्शन दो।*

*आकाश में मनमोहिनी किसने बनाई तारिका?*
*वन में मधुर स्वर से अहो किसने धुलाई सारिका?*

थोडक्यात, प्रार्थनांमध्ये वर्णन केलेला निसर्ग एक प्रकारचा यांत्रिक निसर्ग आहे. आणि त्याचा चालक ईश्वर आहे. निसर्गातलं वैविध्य या चालकाच्या कृपेवर किंवा क्रोधावर अवलंबून आहे. निसर्गाचं सौंदर्य आणि भयावहता प्रभूच्याच बदलत्या मुद्रा आहेत. भारतीय साहित्यातल्या एका प्रवाहातही निसर्गाच्या या यांत्रिक रूपाचा उद्दीपक प्रेरणा अशा दोन्ही रूपांत स्वाभाविक वापर होत असे. प्रारंभी प्रेरणा आणि पाया अशा दोन्ही रूपांत निसर्गाचा स्वाभाविक वापर होत असे.परंतु पुढे पुढे प्रेरक रूपच अधिक रूढ झालं.[५] हिंदी साहित्यात निसर्गाच्या दोन्ही रूपांचा प्रयोग करणारे प्रवाह सतत राहिले. पण रीतीकाळात उद्दीपक रूप अतिशय यांत्रिक झालं. निसर्गवर्णनातील यांत्रिकता हा बहुधा रीतीकालाचा अवशेष आहे. हिंदीतील गीतकाव्यात हे अवशेष खूपच व्यापक प्रमाणात दिसतात आणि त्यात प्रार्थना ही गीतकाव्याचीच एक शाखा आहे.

४

शालेय प्रार्थनेचे समर्थक असं मानतात की, प्रार्थनेचा केंद्रबिंदू राष्ट्र असला पाहिजे. ईश्वर आणि राष्ट्र यात त्यांना द्वैत दिसत नाही. ईश्वरस्वरूपाची धार्मिक विविधता आणि राष्ट्राच्या धर्मनिरपेक्षतेला असलेला स्पष्ट विरोधही त्यांना दिसत नाही. प्रार्थनेप्रमाणे राष्ट्रही एक शाश्वत सत्य आहे असं कदाचित ते मानतात. त्याला मातृभूमी म्हणा किंवा जन्मभूमी म्हणा किंवा भारतवर्ष म्हणा. प्रार्थनेच्या दृष्टीनं ते एक असं सत्य आहे ज्यावर काळ किंवा परिस्थिती दोन्ही काही परिणाम करू शकत नाही. प्रार्थनाविश्वाच्या या समजुतीला भारताचं प्राचीनत्व मदतच करतं. या दोन गोष्टी मिळून एका अशा भाषाप्रयोगाला जन्म देतात, की ज्याला शास्त्रीय खुशामतखोरी म्हणावं लागेल:

*ज्योतिर्मय यह देश हमारा*
*कोटि-कोटि संवत्सर से यह*
*चलता पथिक सनातन*
*अंधकारमय पतन दिशा में*
*दीप्तिवान सपनों से पावन*

काही प्रार्थनांमधून देशाच्या स्तुतीसाठी निसर्गाची मदत घेतली जाते. अशा प्रार्थनांमधली सृष्टी, ईश्वर, निसर्गाचं एकत्रित वर्णन करणाऱ्या प्रार्थनांसारखी यांत्रिक नसते; पण त्यात कोणत्याही प्रकारचं जिवंत वास्तवही नसतं. त्यात देशाच्या प्रशंसेसाठी वापरलेल्या शब्दांना केवळ रूपकाची क्षमता दिलेली असते:

*जहां शांती अपना कर्तव्य करना न भूलती थी*
*कोमल कलाप कोकिल कमनीय कूकती थी*
*वरवीरता का वैभव छिटका हुआ घना है*
*छिटका हुआ जहाँ पर विद्या का चाँदना है।*

आता हे लक्षात घेण्यासारखं आहे, की स्वातंत्र्यापूर्वी राष्ट्रीयता ही प्रार्थनेत भावना म्हणून येत असे, ती स्वातंत्र्यानंतर कृत्रिम रूपात दिसू लागली. स्वातंत्र्यापूर्वी राष्ट्रवाद एक जिवंत सत्य होतं, सामाजिक जीवनात त्यानं स्वतःचं असं एक स्थान बनवलं होतं. स्वातंत्र्यासाठी संघर्ष करणाऱ्या नेत्यांमध्ये भारतीय समाज आपल्या

आकांक्षांचं प्रतिबिंब पहात होता. स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नात असलेल्या हेतूचं अनुस्यूत आकर्षण वर्गीय उद्देशांपेक्षा अधिक उच्च दर्जाचं होतं. नंतर स्वातंत्र्यप्राप्तीच्या या हेतूचं रिक्त झालेलं स्थान भरून काढू शकेल असं राष्ट्रीयतेचं कोणतंही रूप पुढे आलं नाही. कल्याणकारी शासनाची कल्पना एक निश्चित उद्देश किंवा योजना उभी करू शकली नाही. स्वातंत्र्यापूर्वी भारताचं राजकारण राष्ट्रवादी होतं, समाजातल्या विभिन्न वर्गांतले आपापसांतले संघर्ष स्वातंत्र्य मिळवण्याच्या मोठ्या उद्देशात मिसळून मागे पडले होते. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राष्ट्रवादाचा काही निश्चित असा उद्देश राहिला नाही. वस्तुत: आता देशातल्या विशाल निम्नवर्गाला राष्ट्रवादाच्या स्थानी भूमिहीन, हरिजन, लहान शेतकरी आणि कामगारांच्या संघर्षाच्या साफल्यालाच राजकारणाचा आधार बनवता आलं असतं. परंतु हे घडलं नाही. वर्गीय आणि राजकीय मतभेद हेच राजकीय प्रचाराचं साधन म्हणून वापरले गेले. सगळ्या वर्गांच्या विकासाच्या विचित्र आग्रहामुळे राष्ट्र म्हणून भारताचं स्पष्ट चित्र तयार होऊ शकलं नाही. त्यामुळे आमची स्वातंत्र्योत्तर राष्ट्रीयता केवळ एक सरकारी घोषणा बनून राहिली. सामाजिक जीवनातील प्रोत्साहक वास्तव बनू शकली नाही.

या प्रकरणाच्या दुसऱ्या भागात प्रार्थनेतले बदल कोणकोणत्या प्रकारे तत्कालीन परिस्थितीच्या प्रभावामुळे होतात हे दोन उदाहरणं देऊन सांगण्याचा मी प्रयत्न केला आहे.. या उदाहरणांवरून हे दिसतं की परतंत्र भारतात राष्ट्रीय भावनेनं ओतप्रोत असलेल्या प्रार्थना विदेशी शासनाच्या दबावाखाली बंद होत आणि त्याऐवजी ईश्वरभक्ती सुरु होत असे. स्वतंत्र भारतात चिनी आक्रमणासारख्या राष्ट्रीय संकटाच्या वेळी *तू गगन है विस्तीर्ण तो मैं एक तारा क्षुद्र हूँ* ही गूढ प्रार्थना पुरेशी न वाटल्यानं *वह शक्ति हमें दो दयानिधे* अशा प्रत्यक्षभक्तीची गरज भासली होती. कदाचित भारतीय मनासाठी संकट आणि असहायतेच्या परिस्थितीत राष्ट्रीय भावनेचा दृढ निश्चय स्वातंत्र्यापूर्वी वाटायचा तेवढा आता विश्वासार्ह वाटत नसावा.

भोजपूरच्या एका शाळेत १९३० ते १९४२ या काळात म्हटल्या जाणाऱ्या प्रार्थनेत स्वातंत्र्यपूर्व राष्ट्रवादाचं उदाहरण मिळतं :

*काट डाले दासता की बेड़ियाँ सी.आर.दा*
*लाजपत सों लाजपत भारत की रहनेवाली है।*
*फिर होगा मुरसीद प्यारा हिंद मोतीलाल सों*
*फिर जवाहर सों खजाना अपना भर जाने की है।*
*स्वर्ग से आकर करेंगे तेरा भारत तिलक*
*कर्मयोगी गाँधी यहाँ शुभ घड़ी लाने को है।*

या प्रार्थनेत व्यक्त झालेली आदर भावना आजकालच्या उपदेशपर गीतांसारखी नाटकी नाही. नावांवर श्लेष करून कवीनं राष्ट्राची स्वप्नं सांगितली आहेत. आज प्रार्थनेत नेत्यांचे वैयक्तिक गुण मुलांसाठी जीवनाचे आदर्श म्हणून दाखवले जातात आणि राष्ट्रीयतेची औपचारिकताही निभावू शकत नाहीत. आज राष्ट्रीयता नेत्यांच्या व्यक्तिमत्त्वांपुरती मर्यादित झाली आहे. उपरोक्त गीताच्या तुलनेत सीकर येथील देवदत्त निडर यांचं गीत, जे त्यांच्या म्हणण्यानुसार अनेक शाळांमधून प्रार्थनेसारखं गायलं जातं, ते कृतक् आदर्श स्थापनेचं चांगलं उदाहरण आहे :

*गाँधी से कुछ करना सीखो*
*सत विनोबा से चलना सीखो*
*दयानंद से ब्रह्मचर्य सीखो*
*मीराबाई से धीरज सीखो*
*विवेकानंद से भाषण सीखो,*
*लालबहादूर से हिम्मत सीखो।*

आधी उल्लेख केल्याप्रमाणे शिक्षणाचं लष्करीकरण ते हेच. 'तू कोण होणार?' असा आव्हानवजा प्रश्न करीत मुलांवर नेत्यांची व्यक्तिमत्त्वं बिंबवत राहाणं.

स्वतंत्र भारताच्या स्तुतीप्रार्थनांमधून मुलं जुन्या-नव्या भारतातला फरक ओळखतील असं होत नाही. त्यांना हे कळत नाही, की ही स्तुती मातृभूमीची आहे की भारताच्या शाश्वत म्हटल्या जाणाऱ्या वारशाची आहे. स्वातंत्र्यापूर्वीच्या प्रार्थनांमधून यायचं तसं आता चालू काळाचं कोणतंही भान प्रार्थनांमधून येत नाही. (असा दावा केला जात असला तरी या प्रार्थनांना राष्ट्रीय यामुळेच म्हणता येत नाही.)

राष्ट्राबद्दल काही म्हणत राहिलं तरच ते राष्ट्रीय होत असेल तर वेगळी गोष्ट आहे, पण मग त्याचा प्रभाव मुलांवर पडणं मग कठीण आहे. ज्या कवितांमध्ये राष्ट्रीयतेच्या नावावर निव्वळ रूढ शब्द वापरलेले आहेत, (त्या जरी कितीही महान कवीने का लिहिलेल्या असेनात) त्या मुलांपर्यंत पोहचू शकत नाहीत. त्यातूनही या कविता मुलांना जर काही 'देत' असतील तर तो अपराधभावच देतात. *है यह भारतवर्ष हमारा, इसको भूल न जाऊँ मैं।* किंवा मग त्या मुलं आणि मातृभूमी यांच्यात अर्धमानसशास्त्रीय विषमता निर्माण करतात :

*जीवनपुष्प चढ़ा चरणों पर*
*माँगू मातृभूमि से यह वर*

*तेरा वैभव अमर रहे माँ*

*हम दिन चार रहे न रहें।*

निराशा अन् अतृप्तीशिवाय देशाबद्दलचं प्रेम व्यक्त करणाऱ्या प्रार्थना खूप कमी आहेत. पाठ्यपुस्तकातून, प्रार्थनांमधून किंवा भाषणांतून मातृभूमी किंवा राष्ट्राबद्दल व्यक्त होणारा आपला दृष्टिकोन जास्तीतजास्त शंकास्पद असा म्हणता येईल. भारतातल्या वैविध्याचा आपल्याला भलेही अभिमान वाटो, ते आपण पूर्णपणे कधी स्वीकारलेलं नसतं. विविधतेला आपण एक राष्ट्रीय सत्य न मानता तो नाइलाज असावा असं मानतो. जणू काही त्या मानण्यामुळे आपण एकतेकडेच वाटचाल करतो आहोत. देशभरात मुलांना कोणत्या ना कोणत्या प्रकारे हे सांगितलेलं असतंच की विविधतेतील एकता हेच आपलं मूलभूत वैशिष्ट्य आहे. विविधता हे काही आपलं वैशिष्ट्य नाही, तर असं एक वास्तव आहे ज्याला आपण काही करू शकत नाही. आपण केवळ त्यात एकतेचं सूत्र शोधत राहू शकतो. 'अनेकता' या शब्दात दडलेलं असलेलं जे एक बहुआयामी जीवन आहे, त्याऐवजी 'अनेकता-एकता'चं समीकरण मुलांना शिकवून आपण त्यांना संकोची, सावध असलेले नागरिक बनविण्याची चूक करत असतो. इनसान स्कूल, किशनगंज (पूर्णिया)च्या शाळेच्या प्रार्थनेतल्या या ओळी नीट वाचल्या की आपल्याला लोकप्रिय राजकारणाचं सार कळू शकतं :

*कुछ जात होत कुछ मजहब कुछ तौर तरीके हो*

*मिलजुल के मगर रहना हम सबको सिखाएँगे।*

पहिल्या ओळीत सवलत देण्याचा जो भाव आहे त्याला दुसऱ्या ओळीतला 'मगर' पुष्टी देतो. नेणिवेच्या पातळीवर मुलं हा लक्ष्यार्थ समजून घेत नसतील हे म्हणणं अशक्य आहे. दैनंदिन जगण्याशी जोडला असेल, तोच अर्थ मुलांसाठी सच्चा आणि जिवंत असू शकतो. स्वातंत्र्यानंतर असा काही संबंध आपण राष्ट्रीय धोरणं आणि जीवन यांच्यात लावू शकलो आहोत असं काही या प्रार्थना बघून वाटत नाही. आपलं राष्ट्रीय लक्ष्य भलेही आपण स्वावलंबन आणि आत्मसन्मानानं जगणं म्हणून जाहीर केलेलं असो, व्यवहारात आत्मसन्मानानं जगण्यापेक्षा विनयशील भक्त म्हणून नत होणं आपल्याला उपयुक्त वाटतं. आजच्या राजकारण आणि नोकरशाहीला सामान्य जनतेच्या याचनेची आणि लाचारीची सवय झाली आहे. मुलं हे बघत असणारच. शाळेतल्या प्रार्थनाही त्याच गुणांचं शिक्षण देतात. राष्ट्राच्या उन्नतीसाठी प्रार्थना ईश्वराची असो, झेंड्याची असो किंवा भारतमातेची- आपली मुद्रा नेहमी असहायतेचीच असते. प्रार्थनेतली कृपा आणि दयेची याचना इतक्या विपुल प्रमाणात पाहून असं वाटतं, की असहायतेपेक्षा मोठं राष्ट्रीय वैशिष्ट्य आपल्यात नाही. हे आपण पिढ्यान्‌पिढ्या देत जाणार आहोत. मधुबनीतल्या शाळेतली ही प्रार्थना अशीच दोन पिढ्या टिकून आहे.

इस देश को हे दीनबंधू आप फिर अपनाईए

भगवान भारतवर्ष को फिर पुण्यभूमि बनाईए

इसके शरण होकर रहें, अब तुम बिना गति कौन है

माँ रम्य अब अवलंब देकर शांतिसुधा बरसाईए।

५

या शेवटच्या भागात मी प्रार्थनांमध्ये व्यक्त झालेल्या समाज आणि व्यक्तीसंबंधातल्या समजुतींबद्दल विवेचन करीत आहे. प्रार्थनांची विषयव्याप्ती राष्ट्रीय आकांक्षांपासून मानवजातीच्या शाश्वीय दुःखांपर्यंत पसरली आहे. समाज, जीवन, विश्व आणि व्यक्तिमत्त्वाच्या आचरणांबाबत प्रार्थना काही विशिष्ट दिशा आणि विशिष्ट भाव प्रकट करतात. यातले मनोभाव आहेत : आत्मकेंद्री असामाजिकता, वैराग्य, उदासीनता, सेवा, आत्मसंतुष्ट वृत्ती, असहायता आणि विनयाचा भाव. असं वाटू लागतं, की समाजाकडे पाठ फिरवणं हाच जणू प्रार्थनेचा पाया आहे. समाजाचा मार खाऊन कुठेतरी दूर घनदाट जंगलात एकटेच येऊन पोचलो आहोत किंवा जीवनसमुद्राच्या काठाशी उभं राहून समाजाचा कोलाहल ऐकतो आहोत, असं काहीसं चित्र या प्रार्थना ऐकताना प्रार्थना करणाऱ्यांबद्दल उभं राहतं. जगातल्या बहुतेक धर्मांमध्ये अशा स्थितींची वर्णनं आहेत, पण भारतीय जनमानसात त्याचं रूप फारच व्यापक प्रमाणात दिसतं.

प्रार्थनेत व्यक्त झालेल्या व्यक्तिमत्त्वाच्या आकांक्षा जाणून घेण्यासाठी प्रार्थनेतला समाज आणि जगाविषयीचा दृष्टिकोन समजून घेणं आवश्यक आहे. समाजाच्या संदर्भात व्यष्टी आणि समष्टीच्या भेदाची गुंतागुंत फार आवडीने येते. प्रार्थना असते सामूहिक पातळीवरची; पण त्यात प्रार्थना करणारा सहसा एकटा दाखवलेला असतो ही एक गंमतच आहे. तो तसा एकटा असल्याने देवाची आवश्यकता वाढते. त्याचबरोबर समाज हा त्याचा शत्रू होतो. समाजच कशाला, सगळं जगच आपापल्या स्वार्थात बुडालेल्या भावनाशून्य लोकांचं कारागृह होतं.

प्रार्थनेत समष्टीवर पहिला हल्ला म्हणजे प्रार्थना करणाऱ्याच्या जवळच्या नातलगांवरच होतो :

*साथी नही हमारा माँ-बाप और भैया*
*दुनिया में खूब देखा आँखे पसार करके*
*सुख के है सब संघाति, दुनिया मे यार सारे।*

या प्रार्थनेतल्या तक्रारीचे दोन भाग आहेत. आई-बाप आणि इतरांची विश्वासार्हता आणि सुखाची साधना. आपल्या आई-बाप-भावांना ते विश्वासपात्र, हितचिंतक मानत नाहीत. ते सुखाच्या साधनेत मग्न आहेत असं त्याला वाटतं. तेच जगात चोहीकडे चाललंय असं त्याला वाटतं. प्रार्थनेतला मूळ संदेशच हा आहे की सुखाची साधना म्हणजे एक हीन अपराध आहे. प्रार्थना करणारा या सर्वव्यापी स्पर्धेत सामील होऊ इच्छित नाही; पण त्याचा निषेध करता करता एकटा मात्र पडतो. अगदी आई-बापही सोबत नसतात. कदाचित एकटा असल्यामुळेच तो प्रार्थना करतो आहे. ज्यामुळे स्वार्थविरोधी बाजूला किमान देवाची तरी साथ मिळेल.

प्रार्थनेतला देव साथी किंवा मित्र बनू शकत नाही. याचकाच्या संघर्षात मदत करणाऱ्या त्याची भूमिका असते. हा संघर्ष स्वार्थी जगाच्या विरुद्ध आहे. हा संघर्ष (प्रश्न हा आहे की तो स्वत: त्या स्वार्थी दुनियेपेक्षा कुठल्या प्रकारे वेगळा आहे?) आणखी अवघड होतो कारण जग या याचकाच्या किंवा प्रार्थना करणाऱ्याच्या मार्गात बाधा उत्पन्न करीत असतं :

*जब जग धोखे पे धोखा दे*
*और चोट पर चोट लगाए*
*अपने मन में हार न मानूँ*
*ऐसा नाथ विधान करो।*

प्रार्थनेच्या पद्धतीत समाज आणि जग -- धोका देणं, निर्मम प्रहार करणं, बाधा निर्माण करणं या जबाबदाऱ्या पार पाडतात. याचक मात्र अशी संघर्षरत व्यक्ती असते की तिचं एकटेपण आणि कष्ट तिखट-मीठ लावून सांगताना तिला एखाद्या मनोरुग्णासारखा आनंद मिळतो. कारण ही रुग्ण मन:स्थिती त्याला देवाजवळ नेते. त्याच्या दु:खाचं स्वरूप कधीच स्पष्ट नसतं. अशा दु:खांच्या निवारणासाठी याचकानं समाज किंवा सरकारकडेही न बघणं यात काहीच आश्चर्य नाही. तो सरळ देवाकडे पाहतो :

*चढ आए कभी जो दुख की घटा*
*यां पाप करम की होवे तपन*
*तेरा नाम रहे मेरे मन में बसा*
*तेरी दया व मेहर की आस हो।*

जबलपूरच्या एका शाळेत पूर्वमाध्यमिक स्तरापासूनच ही प्रार्थना म्हणायला सुरुवात होते. पाच वर्षांच्या मुलासाठी यातल्या शब्दांचे अर्थही कळणं कठीण आहे. पण कुणाकडे तरी पाहून केलेली दयेची याचना याची एक चिरस्मृती बनू शकते. प्रार्थनांमधल्या समाजांमध्ये स्वार्थात रुतलेले, दयेस पात्र असलेले अज्ञानी लोक राहत असतात. त्यांच्यासाठी देव असा एक मोठा अधिकारी आहे जो प्रत्येकाचा स्वतंत्र हिशोब ठेवतो:

*माया के झंझटों में मैं तुमको भूल जाऊँ*
*पर नाथ दया करके मुझको न भुला देना।*

या ओळींमधून व्यक्त झालेला अर्थ एका अशा देशाच्या समाजाबद्दल आहे, जिथं नोकरशाही म्हणजे दहशत निर्माण करणारी ताकद आहे; तिथं मग दंडविधानाशी कैदेची प्रतिमा संबंधित आहे. आता या ओळीत वर्णन आहे, ते जग म्हणजे तुरुंग आणि प्रार्थना करणारा जन्मोजन्मी शिक्षा भोगायला तत्पर असा कैदी, असं आहे. *जब-जब संसार का कैदी बनूँ निष्काम भाव से काम करूँ* जन्मोजन्मी चालणाऱ्या या शिक्षेच्या तात्त्विक पार्श्वभूमीनुसार या विश्वातला प्रत्येक जीव म्हणजे व्यूहात अडकलेला आत्मा आहे आणि त्यातून मुक्ती केवळ मोक्षामध्येच आहे.

सामाजिक जीवनातला अविश्वास आणि एकटेपणातून आलेल्या दु:खाचं अमूर्त व अतिशयोक्त वर्णन यामुळे या सगळ्यातून असं बालपण डोळ्यापुढं उभं राहतं : जिथे दीनता म्हणजे सर्वांत मोठं ध्येय आहे. मुलांमध्ये नसलेली शारीरिक शक्ती म्हणजे जणू एखादा अपराध. प्रार्थना त्याच्यात स्वत:च्या अस्तित्वाबद्दल वैफल्य निर्माण करते. 'लवकर मोठा हो', असा आशीर्वाद आपल्या कौटुंबिक जीवनात बराच प्रचलित आहे, मूल असणं केवढी वाईट गोष्ट आहे. पण प्रार्थना यापुढचं शिकवतात. प्रार्थनांमध्ये मूल जेवढं पतित, स्खलित आणि हीनदीन असं चित्रित केलेलं असतं त्यावरून मुलांमध्ये एक भयानक प्रकारचा अपराधभाव निर्माण होऊ शकतो. प्रार्थनांसोबतची मुलांची वेगवेगळी चित्रं जर एकत्र ठेवून पाहिली, तर सरळ सरळ असं म्हणता येईल की प्रार्थना मुलांमध्ये नक्कीच वैफल्य निर्माण करतात.

*विद्या बुद्धि नही कुछ पास*
*हमें बना लो अपना दास*
*हाथ जोड़ हम खड़े हुए हैं*

*पैरों पर हम पड़े हुए है।*
*मैं मन बचन काय से पापिन*
*और बिका पाप के हाथ*
(बायबल मधून घेतलेली रांचीच्या शाळेतील प्रार्थना.)

*हम ब्रह्मवर्चस से गिर बालक पुन: तुम दो शरण।*
*करे आपसे कैसे विनती, बस सिखे है अक्षर गिनती।*

*कितने तर गए जनम जनम के*
*पापी दुष्ट कुमारगगामी,*
*अब तो दया करो हे स्वामी*
*कब से प्रभुवर टेर रही हूँ*
*दयादृष्टि पथ हेर रही हूँ*
*शरणागत की लाज बचाओ।*

हे शेवटचं उदाहरण आहे डाल्टनगंजच्या एका ज्युनिअर 'शाळेच्या प्रार्थनेचं. त्यावरून लहान मुलींना लज्जा-रक्षणाची प्रेरणा देण्यापासून आरंभ करणारं ते शिक्षण किती महान असेल याची कल्पना येऊ शकते.

पतित बाल्याच्या या वानगीपेक्षा काही वेगळ्या गुणांचीही यादी आहे. हे गुण जीवनात उतरवण्याची विनंती अनेक प्रार्थना करतात. गुणांबरोबरच अवगुणांचाही उल्लेख होतो. जे दूर राहावेत म्हणून प्रभुचरणी विनंती केली जाते. इथं देव एक गतिशील प्रेरक तत्त्वाच्या रूपात चित्रित केलेला असतो तर प्रार्थना करणारा एक मूढ, अजाण प्राणी असतो. त्याला ना गुण अंगीकारता येत, ना अवगुणांना दूर ठेवता येत. दोन्हींसाठी तो ईश्वरकृपेचा आश्रित आहे.

*हे प्रभो आनंददाता ज्ञान हमको दीजिए*
*शीघ्र सारे दुर्गुणों को दूर हमसे कीजिए।*

प्रार्थनांनी प्रमाणित केलेले काही श्रेष्ठ चरित्रविशेष आहेत. सेवा, प्रेम, विनय, श्रम, सहनशीलता, तत्परबुद्धी आणि समता. तर भयंकर दुर्गुण आहेत लालसा, श्रेष्ठ-कनिष्ठ भाव, गर्व, चंचलता, आळस आणि ईर्षा. या वृत्तींच्या भले-बुरेपणाबद्दलच्या असहमत होण्याचा प्रश्न तितकासा महत्त्वाचा नाही, प्रश्न आहे भल्या-बुऱ्या वृत्तींच्या भाबड्या आणि अतिसरल विभाजनाचा. बॉलिवूड सिनेमे आणि हिंदी बालसाहित्यात असं चरित्रविभाजन पूर्णत: ठरलेलं असतं. जीवनातल्या जटिल शक्यता एक जाडजूड रेषा ओढून पलीक डे ढकलल्या जातात. व्यक्तिमत्त्व वैविध्याबद्दल समाजात आधीच असलेल्या असहिष्णुतेला सिनेमे बळकटी देतात. प्रार्थना मुलांमध्ये एकप्रकारच्या अतिसरल, नैतिक दृष्टीचा विकास करून त्याचप्रकारच्या असहिष्णुतेला जन्म देतात. ही असहिष्णुता त्यांना संशयी आणि सावध नागरिक बनवते. हे नागरिक परिस्थिती आणि चारित्र्याच्या अन्योन्याश्रित संबंधांना विसरून पापी आणि पुण्यवानात फरक केवळ यामुळे करतात की एकानं एक तथाकथित पाप केलं आहे आणि दुसऱ्यानं एक तथाकथित पुण्य.

वैराग्य आणि सेवामय जीवन हे गुण म्हणजे प्रार्थनेतले उच्चतम आदर्श आहेत. सेवेचे जे अनेक अर्थ प्रचलित आहेत त्या सर्व अर्थांना प्रार्थना स्पर्श करते. विशुद्ध त्यागमय स्वरूपापासून गुलामीपर्यंत या अर्थांची व्याप्ती आहे. भारतीय स्काऊटिंग संघटनेचे जनक श्रीराम वाजपेयी यांनी रचलेल्या *'दया कर दान भक्ति का'* या प्रार्थनेच्या ओळी पहिल्या प्रकारच्या सेवेची अभिव्यक्ती मानता येतील :

*हमारा कर्म हो सेवा हमारा धर्म हो सेवा*
*सदा ईमान हो सेवा कि सेवकचर बना देना।*

या सेवाभावाचं अगदी विपरीत रूप दुसऱ्या एका प्रार्थनेच्या शेवटच्या ओळीत सापडतं :

*मैं प्रयोग से बचूँ सदा ही अहंशून्यता का वर दो*
*दुख में हो न सुख की इच्छा हानि-लाभ सब एक समान*
*सेवक बनकर टहल बजाऊँ ऐसा वर दो हे भगवान।*

पहिल्या ओळीतली प्रयोगापासून पळण्याची इच्छा करणारी प्रार्थना चकित करणारी आहे. पण आणखी शोधलं तर काही इतर प्रार्थनांमध्येही याच्याशी मिळता-जुळता भाव आहे. उदाहरणच द्यायचं झालं तर वनस्थळी विद्यापीठाचे संस्थापक हिरालाल शास्त्री यांनी लिहिलेल्या प्रार्थनेत विचार आणि संघटनेपासून दूर राहण्याचा सल्ला दिलेला आहे-

*सब धर्मों का करे समादर खंडन-मंडन करें नहीं*
*तर्क करें पर गुरु वचनों में निर्मल आस्था नमो नमो*
*किसी संघ में शामिल होकर मनमानी हम नहीं करें*

अनेक प्रार्थनांमध्ये गुणावगुणांचा सरळ उल्लेख न करता रूपकं वापरली

आहेत. ही रूढ रूपकं आहेत. गीतांमधून आणि बालसाहित्यातून त्यांचं तेच ते दळण पुन्हा पुन्हा आधीच दळलेलं आहे. मुलांसाठीच्या काव्यात थेट वास्तव अजूनही आलेलं नाही. आजही अडचणी-दु:खासाठी पर्वत, समुद्र, प्रवाहाच्या ऐन धारेत, काटे अशा प्रतिमांचा उपयोग होतो तर सफलतेसाठी वल्ही, किनारा आणि धूळ उडवीत येणाऱ्या सैनिकांच्या प्रतिमांचा वापर होताना दिसतो :

*उच्च शिखर है मार्ग कँटिला*
*वीर बहादूरही चढ़ पाते*
*बाधाओं से लड़कर ही हम*
*विजय पताका फहरा पाते*

*उत्तम चरित्र हमारा दुश्मन का मन रिझावे*
*वह देखते ही कह दे तुम प्यार के लिए हो*
*पतवार बुद्धि कर में मँझधार के लिए हो।*

वास्तववाद हे प्रार्थनेचं वैशिष्ट्य तर सोडाच प्रार्थनेत त्या भावनेचीही वानवा आहे. पुन्हा पुन्हा म्हटली जाणं ही प्रार्थनेची नियती आहे, त्यामुळे त्यात एक प्रकारचा रूढ आग्रह असणं स्वाभाविक आणि आवश्यकही आहे. त्यावर भावनेचं आरोपण एक संवेदनशील प्रार्थना करणाराच करू शकतो. ते तर निव्वळ असे शब्द असतात की ज्यांचे अर्थ ते रचणाऱ्याच्या मनातही क्वचितच असतील. प्रार्थनेची बोथट मानसिकता आणि कल्पना तिच्या आंतरिक विरोधाभासाच्या दोन बाजू आहेत. त्याच बरोबर या प्रार्थनेच्या रीतीची आधारभूत तत्त्वंही आहेत. म्हणून प्रार्थना हे एका रीतीचं, शैलीचं नाव आहे, भावनेचं नाही.

■

**संदर्भ:**

१. हा लेख *दिनमान*च्या १७,२४ आणि ३१ ऑगस्ट १९७५ च्या अंकांमध्ये *'प्रार्थना सर्वेक्षण'* या शीर्षकांतर्गत प्रसिद्ध झाला होता. लेखासाठीचे संदर्भ *दिनमान*च्या सुमारे २०० वाचकांकडून मिळाले होते. ज्या वाचकांनी हे संदर्भ किंवा अवतरणं पाठवली किंवा उदाहरण म्हणून या लेखात वापरले गेले त्यांचे नामोल्लेख उपर्युक्त अंकात आहेत. स्थानाअभावी इथं सगळ्यांची नावं देणं शक्य नाही.
२. ग्रामीण पालकांसाठी शाळा अद्याप अनिवार्य झालेली नाही. मुलांचा वेळ बहुतेक करून शाळेबाहेरच जातो आणि शाळा सोडणाऱ्यांची संख्या खूपच आहे.
३. हे वर्णन पाटण्याच्या श्री. प्रेमकुमार मणी यांनी पाठवलं होतं.
४. रघुवंश, *प्रकृति और हिंदी काव्य:*, साहित्यभवन लिमिटेड, प्रयाग, संवत २००५, पृष्ठ १५६.

*'जेव्हा मी लहान होतो, तेव्हा टाकाऊ वस्तूंपासून खेळणी बनवणं आणि आपल्या कल्पनेनं खेळ शोधून काढण्याचं मला स्वातंत्र्य होतं. माझ्या आनंदात माझ्या सवंगड्यांची पूर्ण भागीदारी असायची. खरं सांगायचं तर या खेळांमधला आनंद मित्रांवरच अवलंबून होता. एकदा आमच्या स्वर्गीय बालजगतात प्रौढांच्या व्यावसायिक जगातल्या एका प्रलोभनानं प्रवेश केला. आमच्या एका मित्राला कुठल्यातरी विलायती दुकानातून आणलेलं खेळणं दिलं गेलं. खेळणं तर अद्भुतच होतं- खूप मोठं आणि जिवंत वाटावं असं. आमच्या मित्राला त्या खेळण्याची फार घमेंड वाटू लागली. खेळावरचं त्याचं मन उडालं. त्या महागड्या वस्तूला तो आमच्यापासून जपून दूर ठेवायला लागला. त्याच्या मालकीतच धुंद राहत स्वत:ला मित्रांपेक्षा श्रेष्ठ समजू लागला. कारण आमची खेळणी स्वस्त होती. या प्रलोभनानं एका अशा गोष्टीला झाकोळून टाकलं, जी खेळण्याहून जास्त अद्वितीय होती - एक आदर्श मूल आणि मित्र असणं.'*

# खेळण्यांचा ऱ्हास

अलीकडच्या काही वर्षांत भारतातला उच्च आणि मध्यम वर्ग सोडला तर इतर वर्गांत जगण्यासाठीच्या गरजांचे प्राधान्यक्रम कमी कमी होत चालले आहेत. आर्थिक दाबदबावांमुळे सामाजिक जीवनात अस्तित्व आणि सुखसुविधांसाठी होणारी स्पर्धा आणखी अवघड बनली आहे. त्यामुळे पूर्वीपेक्षा कमी लोक जीवनाच्या विविध आवश्यक गरजांबद्दल निश्चित आणि स्पर्धारहित पद्धतीनं विचार करू शकतात. फळं, प्रवास, पुस्तकं आणि मुलांची खेळणी यांसारख्या गोष्टी आधी सर्वसामान्यांच्या आवाक्यातल्या (काही अंशी का असेना) होत्या, त्या आता संपन्न प्रतीकांच्या श्रेणीत पोचल्या आहेत.

एकेकाळी खेळणी लोकसंस्कृतीची स्वच्छ साधी प्रतीकं असत. लोकांच्या समजुती, त्यांचे विश्वास, त्यांनी स्वीकारलेली व्यवस्थेची प्रतीकं, त्यांच्या मुलांच्या आकांक्षा आणि कल्पनेतलं जग हे सगळं खेळण्यांमध्ये यायचं. तेव्हा खेळणी माती आणि कापडाची असत आणि या दोन गोष्टी जीवनाच्या मूलभूत गरजाही आहेत. आजची प्रचलित खेळणी अनेक जीवनावश्यक वस्तूंप्रमाणे औद्योगिक स्तरावर बनवली जातात. ती खेळणी म्हणजे फॅक्टऱ्यांचे मालक आणि त्यांच्याकडे नोकरी करणाऱ्या तंत्रज्ञांच्या कौशल्याचे पुरावे असतात. जनमानसाची जीवनदृष्टी, अभिरुची आणि आकांक्षा यांच्या संदर्भात ही खेळणी प्रातिनिधिक नसतात. माती आणि कापडाची जागा प्लॅस्टिक आणि लोखंडानं घेतली आहे आणि या गोष्टी म्हणजे औद्योगिक संस्कृतीची देणगी आहे.

भारतात खेळण्यांचं औद्योगिकीकरण या शतकाच्या सुरुवातीच्या दशकांमध्ये सुरू झालं. खेळणी-उद्योग आणि कुटिरोद्योगातल्या संघर्षाची प्रक्रिया अद्याप पूर्ण झालेली नाही, पण इतर क्षेत्रांप्रमाणेच इथंही मशिनरीचा विजय निश्चित आहे. मध्यमवर्गातल्या मुलांची खेळणी नीट पाहिली तर हा विजय झालाही आहे असं दिसेल. माती, कापड किंवा अशा वस्तूंपासून बनवलेली खेळणी आता शहरात किंवा लहान गावातल्या बाजारात दिसत नाहीत. शहरात कुटिरोद्योगाच्या खेळण्यांपैकी आता फक्त कागदी भिरभिरं राहिलं आहे, त्याचं आकर्षण महागड्या यांत्रिक खेळण्यांशी खेळणाऱ्या मुलांनाही असतं. गावागावात सणासुदीला देवीदेवतांबरोबर काही खेळणीही रस्त्यांवर येतात. श्रावणात विकली जाणारी पतंगाची चकरी आणि भोवरे हेही असे अपवाद आहेत. मातीच्या कलापूर्ण, कष्टानं बनवलेल्या वस्तूही शहरांमध्ये रस्त्याच्या कडेला विकायला येतात, पण या वस्तू खेळणी म्हणून नव्हे तर उर्ध्वमुखी मध्यम वर्गाच्या दिवाणखान्याची सजावट म्हणून वापरली जातात. मोठमोठ्या, चकचकीत दुकानांमधून विकल्या जाणाऱ्या प्लॅस्टिक आणि धातूंच्या खेळण्यांशी त्यांची अजिबात स्पर्धा नसते.

मध्यमवर्गाच्या वाढीबरोबरच समाजात प्रचलित झालेल्या गरजा आणि इच्छांची, ही कारखान्यात तयार झालेली खेळणी म्हणजे प्रतिबिंबं आहेत. मर्यादित स्रोत असूनही आपल्यापेक्षा 'वरच्या' लोकांची संस्कृती आणि जगण्याचं अनुकरण करणं हेच मध्यमवर्गीय मनोवृत्तीचं केंद्र असतं. आकर्षकपणा, टिकाऊपणा , यांत्रिक सफाई आणि किमती याच्या आधारे मध्यमवर्ग वस्तूंचं श्रेष्ठत्व ठरवत असतो. कुटिरोद्योगाची खेळणी कमी किमतीची आणि अल्पायुषी असतात. त्याचबरोबर त्यांचे आकार आणि रंग उच्चवर्गाच्या चमचमाटानं मोहित झालेल्या मध्यमवर्गाला आकर्षून घेऊ शकत नाही. मध्यमवर्ग हा क्रयशक्ती असलेला मोठा वर्ग असल्यानं कोणत्याही वस्तूच्या बाजारावर तो प्रभाव टाकू शकतो. मध्यमवर्गातल्या मशिनी खेळण्यांनी खेळण्यांच्या कुटिरोद्योगावर वाईट परिणाम केला आहे. या प्रकारच्या खेळण्यांची विक्री या दोन दशकात सतत फक्त सणांच्या बाजारांपुरती मर्यादित होत चालली आहे. यामुळेच या खेळण्यांचे विषयही सामाजिक होते ते आता धार्मिक होत चालले आहेत.

औद्यागिकीकरणाच्या संस्कृतीनं अधिक वस्तू अधिक लोकांपर्यंत उपलब्ध करणं सुलभ केलं आहे अशी एक समजूत आहे. अशीही एक समजूत आहे की प्लॅस्टिकच्या खेळण्यांमुळे मुलांवर होणाऱ्या कौटुंबिक खर्चात बचत शक्य झाली आहे. वस्तुस्थिती ही आहे की देशातल्या बहुसंख्य मुलांचं मनोरंजन बाजारात विकल्या जाणाऱ्या खेळण्यांवर अवलंबून राहिलेलं नाही. खेळण्यांच्या किंमती कमी-जास्त

होत राहिल्या, पण गरीब मुलांसाठी ती सदैव दुर्लभच राहिली. प्रेमचंदांनी १९३३ साली लिहिलेली 'ईदगाह' ही कथा खेळणी आणि समाजाच्या संबंधाचा वेगळाच दस्तऐवज आहे. या कथेत एका गरीब मुलाचा खेळण्यांबाबतचा दृष्टिकोन अतिशय चांगल्या प्रकारे चित्रित झाला आहे. ईदीच्या दिवशी विकायला आलेल्या खेळण्यांचं जिवंत वर्णन प्रेमचंदांनी या कथेत केलं आहे. मातीचे सैनिक, राजा, वकील, भिस्ती, धोबी, साधू वगैरे सगळी खेळणी दोन-दोन पैशांची आहेत, पण गरीब हमीदच्या आवाक्याबाहेरची. 'हमीदजवळ एकूण तीन पैसे आहेत. एवढी महाग खेळणी तो कसा घेईल? हातातून पडलं तर खेळणं फुटेल. थोडंसं पाणी पडलं की सगळा रंग उडून जाईल, अशी खेळणी काय कामाची? काय करेल तो अशी खेळणी घेऊन?' कथेत पुढे मग हमीद लोखंडी चिमटा विकत घेऊन त्यालाच आपल्या समज आणि हुशारीनं उपयुक्तता आणि मनोरंजन यांच्या मधली वस्तू बनवतो. हमीदसारखीच जगभरची साधनहीन बालकं आजूबाजूच्या वस्तूंमध्ये आनंद आणि मनोरंजनाचे विषय शोधत मोठे होतात. स्वतःच आपल्या कल्पनेतून खेळ आणि खेळणी शोधून काढायची नैसर्गिक प्रतिभा मुलांमध्ये नसती, तर गरीब मुलांसाठी जगात मनोरंजनाची काही शक्यताच राहिली नसती.

अगदी लहान मुलांसाठी साधा डबाही एक खेळणं असतं. झाकण काढल्यावर डब्याच्या आत ठेवलेली वस्तू पडणं आणि याप्रकारे एकाऐवजी दोन वस्तू- डबा आणि सामान - असं होणं त्यांच्यासाठी कुतूहलाचं असतं. ते सगळं उत्सुकतेनं समजून घेण्याचा ही मुलं प्रयत्न करतात. कचऱ्याच्या ढिगातून तऱ्हेतऱ्हेच्या वस्तू शोधत वर-खाली करणाऱ्या मुलांना पाहून मला नेहमी वाटतं, की यातून कोणकोणते खेळ ही मुलं बनवतील? मागच्या उन्हाळ्याच्या सुटीत दहा वर्षाच्या रेखानं मला 'सोळा गोट्यां'चा खेळ शिकवला. फरशीवर कोळश्यानं आखलेल्या आकृतीत ठेवायला माझ्याकडे गोट्या नव्हत्या. रेखा बाहेर गेली आणि तुटलेल्या बांगड्यांचे आठ तुकडे आणि आठ बारीक काड्या शोधून घेऊन आली.

'मनोरंजन' म्हणून जो विशेष अनुभव प्रौढांना आवश्यक वाटत असतो, मुलांसाठी तो वेगळा अनुभव म्हणून आवश्यक नसतो. त्यांच्यासाठी मनोरंजन, ज्ञानार्जन आणि दैनंदिन जीवन वेगवेगळ्या कप्प्यांत वाटलेलं नसतं. त्यांच्या जगण्याची ही अविभाज्य अंगं असतात. ही मुलांची एक प्रकारे संस्कृती असते. मला हे म्हणायचं नाही की, समाजाचीच अपत्यं असलेल्या मुलांची संस्कृती समाज संस्कृतीपेक्षा वेगळी असू शकते. पण जर 'संस्कृती' शब्दाचा प्रयोग समाजधारणा, रीतिरिवाज, कला, आहार आदींशी संबंधित न वापरता जीवन जगण्याच्या मानसिक प्रयत्नाच्या अर्थानं वापरणं शक्य असेल तर बालपणाची एक वेगळीच संस्कृती असते असं म्हणणं शक्य आहे. तिचं मुख्य लक्षण म्हणजे तिच्यात जीवनातल्या वेगवेगळ्या क्रिया-प्रक्रियांची अविभाज्यता असते. मुलांसाठी खेळ आणि अभ्यासासारख्या परस्परविरुद्ध दिसणाऱ्या क्रियांमध्ये फारसा फरक नसतो, आणि आपल्याकडे शिक्षणतज्ज्ञ आणि आई-वडील पिढ्यान्‌पिढ्या सांगत आले आहेत की खेळायच्या वेळी खेळणं आणि अभ्यासाच्या वेळी अभ्यास केला पाहिजे. भोवताल समजून घेण्याची प्रेरणा देणारी मुलांची जिज्ञासा आणि भोवताल समजून घेण्याचं साधन देणारी मुलांची कल्पनाशक्ती, या दोन्ही मिळून एक विशिष्ट दृष्टी आणि कार्यपद्धती तयार होते. या दृष्टी आणि कार्यपद्धतीद्वारे मूल आपल्या चारही बाजूंच्या जगाचं विश्लेषण आणि पुनर्मांडणी करीत असतं आणि शेवटी आपल्या भोवतालाशी स्वतःचं नातं निर्माण करतं. जेव्हा त्याला प्रयत्न करण्याचं स्वातंत्र्य दिलं जाईल, तेव्हाच हे शक्य होईल. पण खूप कमी वेळा असं होतं. बहुतेक आई-वडील आणि शिक्षक मुलांना स्वतंत्रपणे प्रयत्न करू देत नाहीत. त्यांना वाटत असतं, हे प्रयत्न अतिशय सावकाश आहेत, किंवा त्यात तोड-फोड होऊ शकते. मुलं तोडफोड करोत वा न करोत पण आईवडिलांना त्याचं भय पोलिसी पहारा द्यायची सवलत द्यायला पुरेसं असतं. मुलांना मदत करण्याचं केवळ निमित्त असतं. ते हे विसरतात की मुलांच्या प्रयत्नांचा स्वाभाविक वेग वाढवण्याच्या नादात त्यांचे प्रयत्नच थांबवले जातात.

प्रौढांच्या समाजात मुलांच्या स्वाभाविक जीवनपद्धतीबद्दलच्या अज्ञानाचं चांगलं उदाहरण आपल्याला मुलांसाठीच्या नियतकालिकांमधून मिळतं. या मासिकांच्या मुखपृष्ठांवर आणि जाहिरातींमध्येच लिहिलेलं असतं की ही त्यांच्या मनोरंजनाबरोबर ज्ञानवृद्धीही करणारी आहेत. खेळांमधून काहीतरी शिकविण्याच्या चातुर्याची आत्मतुष्टी या संपादकांमध्ये आवश्यकतेपेक्षा जास्त असते. या स्थितीबद्दल वैताग व्यक्त करणारा विनोद मला आठवतो. दोन मुलं एका हुशार मनोवैज्ञानिकाच्या अशा प्रयत्नाला ओळखून सशांबरोबरच्या खेळात गणित बिणित तर शिकवायचं नाही ना, अशा भीतीनं एकमेकांना सावध करतात, 'सावधान! हा खेळता-खेळता आपल्याला काहीतरी शिकवेल बरं!'

आपल्या जीवनपद्धतीतल्या उपरोक्त अविभाज्यतेमुळेच मुलं खेळण्याच्या आणि वापरण्याच्या वस्तूंत काही फरक करीत नाहीत. ते प्रत्येक उपयोगी वस्तू खेळण्यासाठी आणि खेळण्याची वस्तू उपयोगासाठी वापरू शकतात. स्वाभाविकच आई-वडील उपयोगाची प्रत्येक गोष्ट त्यांना खेळायला द्यायची मुभा देऊ शकत नाहीत.

आई-वडिलांना काळजी असते की उपयोगी वस्तू खेळण्यासाठी वापरताना मोडतोड होईल. या संदर्भात माझ्या लक्षात आलं आहे, की ज्या गोष्टी रोजच्या वापरातल्या नाहीत, उदा. घर सजावटीच्या वस्तू – अशांबाबतच मोडतोडीची शक्यता जास्त असते. एकतर या वस्तू नाजूक असतात आणि आईवडील त्यांच्याबाबत जेवढी काळजी करतील तेवढी मुलं करीत नाहीत. माझ्या एका छोट्या मैत्रिणीच्या अनुभवावरून सांगतो, मुलांना अशा नाजूक गोष्टींचा रागच असतो. फार उपयोगाच्या नसूनही मानानं ठेवलेल्या वस्तूंना काळजीनं जपणं मुलांच्या नजरेतून अन्याय्य असतं. बहुतेक मुलांमध्ये प्रत्येक वस्तू वापरून पाहायची एक इच्छा असते. त्यांना स्पर्श करून समजून घ्यावं असं मुलांना वाटत असतं. या इच्छेचा दुसरा पैलू म्हणजे त्यांच्यात प्रत्येक उपयोगी वस्तूबाबत काळजी निर्माण व्हायला लागते. हे खरंच आहे की ही काळजी तरीही वस्तू फुटणार-मोडणारच नाही एवढी काही सजग नसते. पण खेळताना अशी काही वस्तू फुटली की त्यांना पश्चात्ताप वाटायला लागतो. बहुतेक आईवडिलांना मुलांना वाटणाऱ्या या काळजीचा पत्ताच नसतो. प्रत्येक वस्तूपासून मुलांना दूर ठेवल्यानं त्यांच्या व्यक्तिमत्त्वात जेवढी मोडतोड होते, त्याहून वाचवलेल्या या वस्तूंची मोडतोड कमीच भरेल हे त्यांना कळत नाही. मुलांमधल्या पश्चात्ताप करण्याच्या या क्षमतेबद्दल आईवडिलांना माहीतही नसतं. काही नुकसान झालं की मुलाला त्याच्या अपराधाची पुरेपूर जाणीव करून द्यायला मात्र ते तयार असतात. त्यांच्या हे लक्षात येत नाही की अपराधी वाटण्याच्या सततच्या सवयीमुळे मुलांची जिज्ञासा आणि कल्पनाशक्ती शुष्क होऊन मानसिक पातळीवर त्यांची हत्या होते आणि तसं झालं नाही तरी ही सवय त्याला पूर्णपणे अपराधी तर नक्कीच बनवते.

उपयोगाच्या आणि खेळण्यांच्या वस्तूंमध्ये मुलं फरक करत नाही, तरीही 'खेळणी' या शब्दाची व्याख्या करायची झाली तर मी म्हणेन, ज्या वस्तू मुलं स्वतः बनवतात ती अस्सल खेळणी असतात. वाळूचे किल्ले आणि घरं, मातीच्या बाहुल्या, कापडाचे चेंडू, डब्यांची आगगाडी, बाटल्यांचा बंगला आणि अशा अनेक वस्तू त्यांच्या सर्जनाचे पुरावेच असतात. बाजारात विकली जाणारी, विशेषतः महागडी, रंगीबेरंगी जादुई खेळणी ही खेळणीतज्ज्ञांच्या प्रौढ बुद्धीचे आविष्कार आणि परिणाम असतात. मुलं त्यांच्याकडे आकर्षित जरूर होतात, पण त्यांना आपल्या जगण्याचा भाग बनवू शकत नाहीत. मोठ्यांच्या प्रशासित आणि व्यवस्थित जगातून निवडून, शोधून आणलेल्या वस्तूच त्यांच्या जगण्याचा भाग बनतात आणि त्या ते जादूच्या डब्यात ठेवतात.

जादूचा डबा श्रीमंत मुलंही ठेवतात आणि गरीब मुलंही. पण गरीब मुलाच्या डब्यात खरोखर जादू, अद्भुत चमत्कार असतात. कारण अत्यंत सामान्य सामग्रीतून जीवनोपयोगी वस्तूंचे ते बनलेले असतात. याउलट श्रीमंत मुलांच्या डब्यातल्या वस्तू विशिष्टच सामानातून काढलेल्या असतात. त्यात मोडकी जुनी खेळणी, बटनं, पेन्सिल, दोरे असं काय काय असतं. गरीब मुलांना मनोरंजनाच्या वस्तू कष्टानं आणि सायासानं मिळवाव्या लागतात, त्यामुळे त्या सांभाळून ठेवताना त्यात प्रेम दिसतं. मग ते लाकडाचे तुकडे वा बाटल्यांची झाकणं का असेनात. गरीब मुलांसमोर एक अख्खं जग असतं. त्या जगावर दुसऱ्याच कुणाचं तरी अधिपत्य आहे. या जगाने टाकून दिलेल्या सामानातून ते मूल आपल्यासाठी उपयुक्त गोष्टी शोधत असतं. श्रीमंत मुलासाठी जग परकं नसतं. एका छोट्याश्या रंगीत जगाचं ते मूल स्वतःच मालक असतं. आपल्या पालकांमुळे महागात महाग खेळणी त्याला उपलब्ध असतात. सहजी असणाऱ्या या उपलब्धतेमुळे त्याच्या खेळण्याच्या एकूण शक्तीवर कसा परिणाम होतो ते रवींद्रनाथ ठाकूर यांनी त्यांच्या 'संस्कृती आणि प्रगती' या लेखात सांगितलं आहे. खेळणं जेवढं अपूर्ण आणि अविकसित, तेवढा मुलांना मिळणारा आनंद अधिक असं रवींद्रनाथ मानायचे. जेव्हा मूल स्वतः एखाद्या आकृतीचा किंवा खेळाचा शोध लावतं तेव्हा त्याच्या कल्पनाशक्तीला पूर्ण व्यायाम आणि प्रशिक्षण मिळतं आणि त्यातल्या त्रुटींशी ते समझोता करायलाही शिकतं. हे करताना मूल स्वतःशी बोलत असतं आणि क्षमता, शक्यता तसंच कल्पनेचा एकाच वेळी वापर करतं. महागड्या, चालत्या-बोलत्या खेळण्यांशी खेळताना त्याला अशा समझोत्याची आवश्यकता नसते; त्यामुळे त्यातून मिळणाऱ्या फायद्यांपासूनही ते वंचित राहतं.

चालतं-बोलतं खेळणं एक संपूर्ण यंत्र असतं. मुलांची कल्पनाशक्ती आणि वैयक्तिक क्षमतेवरचं एक प्रकारचं आक्रमण, ज्याच्यासमोर मुलांची शरणागती जवळजवळ अटळ असते. फिल्मी उद्योगानं ज्या प्रकारचा परिणाम प्रौढांच्या मनोरंजनावर केला आहे, जवळपास तसाच परिणाम या यांत्रिक खेळण्यांनी मुलांच्या मनोरंजनावर केलेला आहे. दृश्य, संगीत, अभिनय, शब्द इत्यादी अनेक प्रभावी घटकांनी फिल्मी कथा एक प्रकारे प्रेक्षकाच्या कल्पनेवर आक्रमण करत असते. याचप्रकारचं आक्रमण यांत्रिक (किंवा यंत्राद्वारे बनवलेली) खेळणी आपल्या चकचकाटानं, गती आणि शक्तीच्या मदतीनं करत असतात. शक्ती आणि गती ही या शतकातली विज्ञान तंत्रज्ञानाच्या अभूतपूर्व प्रगतीमुळे सामाजिक जीवनात जबरदस्तीनं पण खोलवर प्रस्थापित झालेली मूल्यं आहेत. यांत्रिक खेळणी या मूल्यांची स्पष्ट

अशी प्रतीकं आहेत. स्थिर आणि शांत राहणाऱ्या खेळण्यांच्या तुलनेत हा उद्योग आवाज करणारी, शक्तीचा वापर चमत्कृतीपूर्ण प्रकारे करणारी खेळणी मोठ्या प्रमाणात बनवतो. त्यांच्या आतली रचना जटिल आणि कठीण असते. त्याचबरोबर रंगीत आवरणांनी ही खेळणी मुलांच्या सरल विचारविश्वात एक प्रकारची जादुई दहशत निर्माण करतात.

खेळण्यांच्या विषयांच्या दृष्टिकोनातून युद्धाशी संबंधित हत्यारं गेल्या काही दशकात जास्त प्रचलित झाली आहेत. भारताकडून या काळात तीन युद्धं लढली गेली हे कारण फारच लंगडं ठरेल, कारण युद्धाच्या मानसिकतेचा आपल्या दैनंदिन जीवनात तसा पुरावा सापडत नाही. वस्तुस्थिती ही आहे की युद्धांनी खेळणी उद्योगातल्या बाजारू बुद्धीला असा साचा उपलब्ध करून दिला, ज्यामुळे खेळण्यांच्या आकारांना प्रासंगिक ताजेपणा आणि त्यांच्या गती आणि कौशल्याला सामरिक आकर्षण प्राप्त होऊ शकत होतं. या तात्कालिकतेची वास्तविक प्रवृत्ती युद्धावर बेतलेल्या बॉलिवूड सिनेमात सहजपणे सापडू शकते. या सिनेमानिर्मात्यांना युद्धानं मानवी स्वभावाचे अनेक अभूतपूर्व आणि रोमांचक पैलू उपलब्ध करून दिले. असे पैलू की ज्यांना सामान्य आयुष्यात शोधणं आणि चित्रित करणं विचित्र दिसलं असतं. बालसाहित्यातही हेच झालं. युद्धामुळे त्यांना नवीन चमकदार विषय, कथानकं आणि शब्दप्रयोगांचा खजिनाच मिळाला. बघता बघता भारतीय बालसाहित्याचं हे वैशिष्ट्य बनून गेलं.

भारतीय खेळण्यांमध्ये बाहुलीचं स्थान लोकप्रिय आणि चिरस्थायी आहे. बाहुली ही नेहमीच मुलींची आवड मानली गेली आहे. बाहुला-बाहुलीचे खेळ दांपत्य जीवनाचं घरगुती प्रतीक असत आलेले आहेत. आणि भारतात परंपरेनं मुलींवर 'गृहकृत्यदक्ष' असण्याची जबाबदारी टाकली आहे. याचमुळे बाहुल्यांची वेषभूषा-साजशृंगार याकडे विशेष लक्ष दिलेलं दिसतं. कदाचित या बाहुल्यांचे निर्माते मुलींना वधूच्या पारंपरिक सौंदर्याची ओळख करून देऊ इच्छित असावेत. मुली स्वतः ज्या बाहुल्या बनवतात त्या क्वचितच सुंदर असतात, आई किंवा इतर कुणी मदत केली तरच या बाहुल्या थोड्या सजवल्या जातात. बाजारातली बाहुली नेहमीच सौंदर्यस्पर्धेची स्पर्धक किंवा साजशृंगार केलेल्या वधूचं मिळतंजुळतं रूप असतं. प्लॅस्टिकच्या बाहुल्यांमध्ये परदेशी मडमेची बाहुली खूपच प्रचलित आहे; सोनेरी केस, लाल ओठ, लेस लावलेले फ्रॉक, गुलाबी कांती अशा रूपातली विलायती मड्डम आजही भारतीय कल्पनेतल्या स्त्री-रूपांपैकी एक आहे. वधू आणि मडमेची ही दोन्ही रूपं मुलींच्या मनातल्या स्त्रीकल्पनेला विकृत करण्यासाठी परंपराप्रिय लोकांची मदतच करतात. ज्या समाजात स्त्रीची ही दोनच रूपं आहेत- सर्वगुणसंपन्न सौंदर्यवती गृहवधू आणि गुणहीन उच्छृंखल आधुनिक स्त्री. एक स्वीकारार्ह, सर्वमान्य तर दुसरं त्याज्य रूप. यात अडकलेली मनोवृत्ती स्त्रीपुरुष समतेचं जग जिथं कामाची रूढ वाटणी नसेल-अशा जगाचं स्वप्नही आपल्या मुलांना बघू देत नाही.

खेळण्यांचा मुलांच्या कल्पनाशक्तीशी आणि विचारविश्वाशी थेट संबंध असतो, अशी एक सर्वमान्य धारणा आहे. खेळण्यांशी खेळता खेळता मुलं आपल्या भोवतालाची पुनर्निर्मिती करत असतात, अनुकरण करत असतात. अनुकरण म्हणजे निव्वळ नक्कल नसते तर त्यात निवड असते, हवं ते घेऊन त्याचं कलापूर्ण पुनर्नियोजन करण्याची ती प्रक्रिया असते. खेळणी म्हणजे मुलांसाठी समाजाचं लघुरूप असतं. त्यांनी स्वतः बनवलेली खेळणी जीवनाच्या सामाजिक समीकरणांची प्रतिबिंबं असतात. खोक्याचा सिनेमा, काठीची गाडी-गाडी करणं किंवा वाळूचे किल्ले बनवताना मुलं आपल्या भोवतालाचं पुनर्निर्माणच करत असतात. या अवस्थेत खेळणी ही शिक्षणाचं माध्यम म्हणून अतिशय उपयुक्त असतात. परंतु शिक्षणाच्या इतिहासात खेळण्याच्या शैक्षणिक उपयोगाचा विचार बराच उशीरानं आला. मुलांसाठी मुद्दाम वेगळी खेळणी बनवण्याची पद्धत फार जुनी नाही. युरोपात गेल्या शतकापूर्वी मुलांसाठी खेळणी बनवण्याबद्दलची माहिती मिळत नाही. मध्ययुगीन शिलालेखांवर मुलं आणि मोठ्यांच्या सामूहिक खेळांबाबतचे उल्लेख सापडतात पण मुलांसाठीची खेळणी बहुधा याच्या बऱ्याच नंतर बनवली गेली. मोठ्या मूर्तींमधून बहुधा बाहुलीचं बालरूप अवतरलं[१] आणि सजावट म्हणून इतर खेळण्यांची सुरुवात झाली असावी. सतराव्या शतकापूर्वी खेळण्यांवर मुलांचा विशेषाधिकार असा नव्हता.[२] भारतात प्राचीन स्थानी झालेल्या उत्खननांतून खेळण्यांसारख्या ज्या वस्तू सापडल्या त्यांचा मुलांशी संबंध लावणं अशक्य नसलं तरी कठीण आहे. अशी जुनी ऐतिहासिक सामग्री, लोकसाहित्य आणि लोककथांचं वेगळ्या दृष्टीनं विश्लेषण होत नाही, तोवर भारतीय खेळण्यांचा संपूर्ण इतिहास लिहिला जाणं अशक्य आहे.

शिक्षणात खेळण्यांचा वापर एकोणिसाव्या शतकात सुरु झाला. ज्या वयात (जन्मापासून ६ वर्षांपर्यंत) मुलांचं खेळण्यांशी घनिष्ठ नातं तयार होतं, त्या वयात मुलांचं शिक्षण सुरू व्हायलाही एकोणिसाव्या शतकात सुरुवात झाली. कारण या काळातच औद्योगिक क्रांतीतून निर्माण झालेल्या समस्यांच्या संदर्भात युरोपातल्या सुधारकांचं मुलांकडे लक्ष गेलं.[३] एकोणिसाव्या शतकातल्या बालसाहित्यात

खेळण्यांना विशेष स्थान आहे. इटालियन लेखक कार्लो कॉलोडीच्या श्रेष्ठ कादंबरीचा, पिनोकिओचा, नायक एक लाकडी पुतळा आहे, जो जिवंत मुलगा बनण्यासाठी चांगली कामं करण्याचे प्रयत्न करीत सतत संघर्ष करीत राहतो. डॅनिश लेखक हॅन्स ख्रिश्चन अँडरसनच्या अनेक कथेतली पात्रं खेळणी आहेत, ती मुलांच्या सुखदुःखात सहभागी होतात, भल्या-बुऱ्या भावनांची केंद्रं होतात. मुलांच्या नैतिक विकासात साहित्य, शिक्षण आणि नियंत्रणाबरोबरच खेळण्यांचा वापर ही एकोणिसाव्या शतकातली पश्चिम युरोपियन कल्पना आहे. मुलांच्या शिक्षणाला एक स्पष्ट नैतिक कल देऊन युरोपियन समाजात सुरू झालेली मध्यमवर्गीय संस्कृती आपल्या मूल्यांना आणि तत्त्वज्ञानाला एक निश्चित स्वरूप आणि स्थैर्य देण्याचा प्रयत्न करीत होती. या मूल्यांमध्ये शालीनता, व्यवहारकुशलतेसारखे गुण होते आणि असा विश्वासही होता की जे स्वावलंबी असतात त्यांना ईश्वर मदत करतो; म्हणून समृद्धी ही ईश्वराची कृपा आहे. व्यक्तीत असलेल्या अगणित क्षमतांवर विश्वास असणाऱ्या तत्त्वज्ञानातून ही मूल्यं आली होती. समाजशास्त्रज्ञ मॅक्स वेबरने एकोणिसाव्या शतकाच्या सामाजिक मूल्यांना आणि तत्त्वज्ञानाला ख्रिश्चन प्रोटेस्टंटवादाच्या प्रभावाखाली वाढणाऱ्या भांडवलशाही संस्कृतीशी जोडलं आहे.[४]

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत ही मूल्यं पश्चिम युरोपातल्या देशांच्या जगभर पसरलेल्या वसाहतींपर्यंत पोहचली होती. या वसाहतींमधल्या भारतासारख्या समाजात, स्थानिक संस्कृती आणि युरोपिअन विचारांच्या संघर्षातून एका नव्या मध्यमवर्गीय संस्कृतीचा जन्म झाला. या नव्या संस्कृतीचा विश्वास होता की प्रत्येक व्यक्तीनं प्रगतीच्या संधी शोधत आपल्या परिस्थितीपासून वेगळं होण्याचा निश्चितपणे प्रयत्न केला पाहिजे. संधीचा फायदा घ्यायची आणि आपल्या समाजापेक्षा निराळं दिसण्याची आणि होण्याची नैतिकता सरंजामशाही आणि जातिप्रथेद्वारे भारतीय समाजात खूप आधीच स्थापन झालेली होती. नव्या मध्यमवर्गीय संदर्भात या नैतिकतेची पुनर्स्थापना इंग्रजी राजवटीनं लादलेल्या शिक्षणानं केली. यातली खेळण्यांची भूमिका या प्रकरणाच्या सुरुवातीला दिलेल्या रवींद्रनाथांच्या अवतरणातून स्पष्ट होते. विलायती खेळणी, त्यांची मूल्यं आणि रंगरूप यांमुळे भारतात श्रीमंत कुटुंबात खूपच वेगाने प्रतिष्ठेचं प्रतीक बनली. विलायती मडमेसारखी दिसणारी प्लॅस्टिकची बाहुली, लष्करातले शिपाई आणि अधिकारी, कार, बंगला इ. खेळणी या शतकाच्या तिसऱ्या दशकापर्यंत संपन्न घरातल्या मुलांना थाटमाटाचे आणि रुबाबाचे संस्कार देऊ लागली होती. स्वातंत्र्य मिळेतो खेळण्यांच्या मध्यमवर्गीय विश्वात युरोपिअन स्थापत्याची लघुरूपं असलेल्या इमारतींचे ठोकळे (बिल्डिंग ब्लॉक्स), इंजिनिअरिंगच्या चमत्कारांचं प्रशिक्षण देणारे मेकॅनो आणि सामान्य-ज्ञानातले प्रश्न सोडवणाऱ्या बॅटरीवर चालणाऱ्या 'ब्रेनो' – या प्रकारच्या खेळण्यांचा शिरकाव झाला होता. ही खेळणी मध्यमवर्गीय संस्कृतीचा महत्त्वाचा भाग बनली. लाकडी प्राणी-पक्षी, लगद्याचे पुतळे अन् मुखवटे आणि कापडी बाहुल्या ही खेळणी, मुलांचं शिक्षण चार भिंतीत नाही तर निसर्ग आणि समाजातच होत असतं असं मानणाऱ्या व्यापक लोकसंस्कृतीबरोबरच लुप्त होऊ लागली. पैशाचा थाट आणि रुबाब हेच ध्येय मानणाऱ्या मध्यमवर्गीय संस्कृतीनं माहितीची लुटालूट आणि संचय हेच शिक्षणाचं मुख्य उद्दिष्ट मानलं. बालसाहित्यातल्या प्रत्येक कवितेत, गोष्टीत प्रगतीची उथळ व्याख्या आणि त्यावर आधारित नैतिक नाटक घुसवणं सुरु झालं. खेळण्यांचा वापर हिंसक शौर्य, संपत्ती-सुख आणि मुखसौंदर्याचं शिक्षण देण्यासाठी होऊ लागला. मुलांच्या खेळण्यांच्या कप्प्यात पिस्तूल, कार, हेलिकॉप्टर, विमान, क्रेन आणि रणगाड्यांचे ढीग झाले.

आज मुलांकडून अपेक्षा असते, की त्यानं आपलं संक्षिप्त आणि अमूल्य बालपण एकही क्षण न दवडता काही ना काही शिकवण्यात घालवावं. पिस्तूल असो किंवा फायरब्रिगेड, मुलाला दोन्ही शिकायचं आहे. त्यात पालकांना आनंद आहे की मुलं खेळता-खेळता केवढं काही शिकत आहेत. खेळ आणि खेळण्यांच्या माध्यमातून शालेय विषय शिकवणाऱ्या संस्था गल्लोगल्ली निघाल्या आहेत. 'नर्सरी', 'पब्लिक स्कूल', 'किंडरगार्टन' अशा नावांनी त्या ओळखल्या जातात. त्यांचे चालक धार्मिक संघटनांपासून दुकानदारांपर्यंत आहेत. आपल्या कुवतीनुसार या संस्था इटालियन शिक्षणशास्त्रज्ञ मादाम माँटेसरी यांच्या नावानं ओळखल्या जाणाऱ्या पद्धतीचा उपयोग करतात. यात खेळ आणि खेळण्यांचा विशेष वापर केला जातो. मध्यमवर्ग आणि वरच्या वर्गातली मुलं अशा संस्थांमध्ये असतात आणि सहा वर्षे वयापर्यंत अंक मोजणं, अक्षर ओळख आणि शाळेच्या वातावरणात राहण्याचा सरावही करतात. निम्नवर्गातल्या मुलांसाठी काही ठिकाणी बालवाड्याही आहेत, पण यात शून्य ते सहा वर्षांपर्यंतच्या जेमतेम अडीच टक्के मुलांची देखभाल होऊ शकते. अशा सरकारी बालवाड्यांमध्ये खेळण्यांचा वापर नगण्य असतो.

ज्या वयात मूल त्याच्या नैसर्गिक आवडी भोवतालच्या परिस्थितीशी जुळवून घेत निश्चित करीत असतं, त्या वयात शालेय शिक्षणात खेळण्यांचा वापर सर्वांत जास्त प्रभाव टाकतो. या अतिशय संवेदनशील अशा काळात खेळण्यांपासून मिळणारं

शिक्षण मुलावर ज्ञानाशी संबंधित असे संस्कार तयार करीत असतं. काही विशिष्ट विषय शिकवताना सहसा खेळणी वापरली जातात, ते कुणी ठरवलं आहे? अशा 'मान्यताप्राप्त' विषयांचं शिक्षण हेच शिक्षणाचं उद्दिष्ट आहे? मुलांची बहुमुखी प्रतिभा यामुळे विशिष्ट दिशांकडेच वळवली जात नाही? असे बरेच प्रश्न जगात वेगवेगळ्या भागांमधून विचारले जात आहेत.

भारतीय शिक्षणाच्या क्षेत्रात चिंतन जवळपास मृतप्राय झालं आहे म्हणून हे प्रश्न नाहीत, पण ज्या औपचारिकीकरणाविषयी ही चिंता व्यक्त झाली आहे ती प्रक्रिया भारतात अतिशय विकसित अवस्थेत आहे. आपल्या समाजात काही विशिष्ट व्यवसायांना विशेष प्रतिष्ठा आहे आणि त्यात प्रवेश करण्यासाठी काही विशिष्ट विषयांचं शिक्षण आवश्यक आहे. सगळ्यात जास्त प्रतिष्ठा मुलकी सेवेतल्या प्रशासकीय पदांना आणि त्यासाठी सगळ्यात आवश्यक विषय इंग्रजी आहे. इंजिनिअर, डॉक्टर, कॉर्पोरेट क्षेत्रातली कार्यकारी पदं हे काही अन्य व्यवसाय आहेत. इंग्रजीची ओळख, भूमितीतले आकार आणि मूलभूत सिद्धांत, गणित आणि सामान्य ज्ञान शिकवण्यासाठी खेळण्यांचा सगळ्यात जास्त वापर केला जातो. भूमितीचं ज्ञान देणारी खेळणी त्यांच्या स्पष्ट आणि स्थिर अशा मर्यादांमध्ये मुलांची बुद्धी आणि कल्पनाशक्ती बांधून ठेवण्याचा प्रयत्न करतात. त्या विषयांच्या कक्षेतल्या शक्यतांकडे मुलांनी वळण्याची मुभा ही खेळणी देतात, त्यांना मोकळं मात्र सोडत नाहीत.

विज्ञानाविषयीच्या बोथट समजुतीतून या ज्ञानदिशेला मान्यता मिळाली आहे. तंत्रज्ञान, अंकशास्त्र आणि भौतिकशास्त्राला शिक्षणाचा आधार मानलं गेलं आहे. या शतकात विज्ञानाला मिळालेल्या राजकीय महत्त्वामुळेच ज्ञानाचा असा संकुचित अर्थ लावला गेला आहे. भौतिकशास्त्र आणि रसायनशास्त्राचा आत्यंतिक फायदा युद्धाच्या बाबतीतच झाला हे सिद्ध झालं आहे. तरीही त्यांना कल्याणकारी ज्ञानाच्या रूपात प्रचारित केलेलं दिसतं. विज्ञानाची फळं लुटण्याच्या या शर्यतीत कधी ना कधी अखिल मानव जात यशस्वी होईल असा प्रचार करूनच बड्या राष्ट्रांनी शिक्षणाला विज्ञानाच्या माहितीचा आणि तंत्रज्ञानाचा पर्याय बनवलं आहे. कला आणि समाजाविषयीची अभिरुची शिक्षणात गौण झाली आहे. दोन दशकांपूर्वीपर्यंत अनेक शाळांमधून कला आणि हस्तकलेच्या अभ्यासाची व्यवस्था होती आणि खेळण्या-बागडण्यासाठी एक तास असायचाच. मेण, कागदाचा लगदा, माती, लाकडी आणि कापडी खेळणी अनेक प्राथमिक आणि माध्यमिक शाळांमधून बनवली जायची. ही खेळणी आता भूतकाळात जमा झाली आहेत.

—

**संदर्भ :**

१) जॉइस ग्लोवर : *द डॉल अ‍ॅज हिरॉईन,* द जुनिअर बुकशेल्फ, डिसेंबर १९७१.
२) फिलीप एरिज : *सेंच्युरिज ऑफ चाईल्डहूड,* हारमंडस्वर्थ, १९६०.पेंग्विन, १९७३.
३) विलियम वॉन्डेर आयकेन : *द प्री-स्कूल इअर्स,* हारमंडस्वर्थ, पेंग्विन, १९६७.
४) मॅक्स वेबर : *द प्रॉटेस्टंट एथिक अँड द स्पिरिट ऑफ कॅपिटलिझम,* स्क्रिवनर, १९३०, १९५९, न्यूयॉर्क.

*आपल्या देशात १९८३ साली जी २.३० कोटी मुलं जन्माला येतील त्यांतली जवळजवळ ३० लाख मुलं पहिलं वर्ष पुरं होण्याआधीच दगावतील, तर १० लाख आपलं शैशव पुरं होण्याआधीच. बाकी १.९० कोटींपैकी नव्वदेक लाख बालपणातलं गंभीर कुपोषण आणि आजार यांमुळे शारीरिक आणि मानसिकदृष्ट्या दुर्बल होऊनच वाढतील. सत्तरेक लाखांना यांतल्या काही कमी गंभीर परिणामांना सहन करावं लागेल. म्हणजे १९८३ साली जन्मलेल्या २.३० कोटी लोकांमधले जेमतेम ३० लाख या देशातले निरोगी नागरिक होऊ शकतील.'*

# शाळेच्या आणि मृत्यूच्या आधी

भारतात होणाऱ्या मृत्यूंपैकी जवळपास ४७% मृत्यू पाच वर्षांपेक्षा कमी वयाच्या मुलांचे होतात. जगात मृत्यूचं एवढं मोठं प्रमाण फारच थोड्या देशात आहे. ० ते ६ या वयोगटातल्या मुलांचं प्रमाण, एकूण लोकसंख्येच्या २१% एवढं, जगात सर्वाधिक फक्त भारतातच आहे. भारत हा निश्चितच एक मुलांचा देश आहे, पण त्याला एका दु:खद अर्थाची किनार आहे.

जन्मापासून तीन महिन्यांपर्यंत सरासरी भारतीय मुलाचा विकासदर सरासरी अमेरिकन मुलाएवढाच असतो. यानंतर अमेरिकन मुलाचा विकासदर स्थिर राहतो तर भारतीय मूल कुपोषणामुळे मृत्यू, अंधत्व किंवा विकलांगत्व आणि याप्रकारच्या अधोस्तरीय जीवनाकडे प्रवास करू लागतं. देशात दर महिन्याला एक लाख बालकं कुपोषणानं मृत्यूमुखी पडतात असं आकडे सांगतात. अंध बालकांची संख्याही लाखांमध्ये जाते. असा एक अंदाज आहे की देशात कमीत कमी अडीच लाख मुलं आंधळी आहेत, तेवढीच बहिरी आहेत, जवळपास पाच लाख विकलांगतेनं ग्रस्त आहेत तर वीस ते तीस लाख मानसिक व्याधींची शिकार झालेली आहेत.[१] ही आकडेवारी पाहून स्थिती भयावह आहे असं म्हणता येईल, पण वस्तुस्थिती त्याहून अधिक भयावह आहे. कुपोषण किंवा त्यातून उत्पन्न होणाऱ्या रोगांमुळे पीडित होणाऱ्या मुलांची संख्या इतर रोगांमुळे ग्रस्त असलेल्या मुलांच्या संख्येत गृहित धरली जात नाही. वस्तुत: कुपोषणामुळेच मुलांमधली प्रतिरोधक शक्ती एवढी कमी झालेली असते, की ते या रोगाच्या तावडीत सापडतात. काही मर्यादित क्षेत्रांत केली जाणारी सर्वेक्षणं सांगतात, की सगळ्या देशाची म्हणून दिली जाणारी आकडवारी आणि निष्कर्ष फारसे विश्वसनीय नाहीत. मागास राज्यं आणि संपन्न राज्यांच्या मागास भागातल्या

मुलांच्या कुपोषणाची स्थिती देशाच्या सरासरीपेक्षाही वाईट आहे.[२]

काही जणांना सोडून उरलेल्यांना मृत्यूच्या हवाली करणारी कुपोषण ही काही निव्वळ एक घटना नसते. ती एक राजकीय प्रक्रिया आहे. ही प्रक्रिया समाजातल्या बहुसंख्य मुलांसमोर दोन पर्याय ठेवत असते. मृत्यू किंवा आजारी आणि निश्चेष्ट जीवन. कुपोषण हे महाशक्तीच्या रूपात समाजाचं भविष्य आधीच निश्चित करीत असतं. बालपणाच्या शक्यता आणि गतिशीलता नष्ट करून आहे ती स्थिती रूढ करतं. कुपोषित मुलं अक्षम नागरिक बनतात. आणि बेजबाबदार समाजानं दिलेला हा अक्षमतेचा वारसा आपल्याही मुलांना देतात. कुपोषणाचा परिणाम शरीर आणि मनावर होतो. शारीरिकदृष्ट्या दुर्बल मूल आपल्या भोवतालाशी सक्रीय संबंध राखू शकत नाही. त्यामुळे त्याच्या मानसिक क्षमताही अविकसित राहतात. ज्या समाजात मुलांच्या पोषणाची विश्वासार्ह व्यवस्था नसते, त्या समाजात मुलांच्या अस्तित्वाला आणि स्थानाला सन्मानानं पाहिलं जात नाही. अशा समाजात प्रौढ लोक मुलांना आपल्या सोयींचं साधन समजतात आणि त्यामुळे बालपण सतत जणू दैवी अशा असुरक्षितता आणि अनिश्चिततेनं ग्रस्त असतं. मृत्यूचं भय पार करेपर्यंत आई वडील मुलं होऊ देतात. मुलांना जन्म देणं हे त्यांच्यासाठी सृजन नसतं तर उत्पादन असतं. अशा स्थितीत मुलांच्या क्षमता अविकसित राहून जातात. त्यांचं बालपण सामाजिक जीवनात सहभागी न होताच संपून जातं. ते अकाली मृत्युमुखी पडतात आणि असमर्थ नागरिक बनतात.

भारतासह उष्ण आणि शीतोष्ण कटिबंधातल्या देशांमध्ये कुपोषण आणि त्याच्याशी संबंधित असणाऱ्या आजारांसाठीची जी आदर्श परिस्थिती आहे, तिचा संबंध मुख्यतः गरिबीशी आहे. तिसऱ्या जगातल्या भारत आणि इतर देशांमध्ये गरिबी एक आर्थिक परिस्थिती आहेच, पण राजकीय आणि सांस्कृतिक परिस्थितीही आहे. डाळी, धान्य आणि इतर खाद्यपदार्थांची कमतरता गरिबीवर आधारित कुपोषणाचा केवळ एक पैलू आहे. दोन आणखी महत्त्वाचे पैलू म्हणजे उपलब्ध खाद्यपदार्थांच्या समान वितरणाचा अभाव आणि सर्वोत्तम प्रकारच्या खाद्यपदार्थांवर असलेलं समाजाच्या उच्चवर्गाचं नियंत्रण. भारतात भाज्या, फळं, मध, मेवा, दूध यांसारख्या अनेक पदार्थांचं मूल्य उच्च वर्गाच्या खरेदीक्षमतेनं निश्चित केलेलं आहे. गरीब लोक या पदार्थांचं उत्पादन करतात. पण त्यांचा वापर करू शकत नाहीत कारण जीवनातल्या विविध आवश्यक गरजा पूर्ण करण्यासाठी त्यांना याच वस्तूंवर अवलंबून रहावं लागतं. राजकीय आंधळेपण त्यांची ही असहायता आणखी गहिरी करतं. शेंगदाण्याची पेंड आणि फळं विदेशी चलन मिळावं म्हणून निर्यात केली जातात. धान्योत्पादन वाढवण्याच्या हव्यासापायी डाळींसारख्या महत्त्वाच्या प्रथिनस्रोताचा पुरवठा कमी केला जातो.

आहार आणि पोषणाविषयाचं अज्ञान आणि अंधश्रद्धा कुपोषणाच्या परिस्थितीत वाढ होण्याचं महत्त्वाचं सांस्कृतिक कारण आहे. भाताची पेज फेकून देणं, भाज्या जास्त शिजवणं, पिठातला कोंडा काढून टाकणं अशा बेपर्वाईनं होणाऱ्या अनेक गोष्टी आपल्या समाजात सरसकट मोठ्या प्रमाणावर चालू असतात, त्यामुळे आपल्या मर्यादित साधनांचा लोक अपव्यय करतात. विशेषतः मध्यमवर्ग, जो आर्थिक दृष्टीनं संपन्न वर्ग आहे - तो आहाराविषयीच्या भ्रामक अशा समजुतींनी ग्रस्त आहे. उच्चवर्गातलं जीवन आणि त्यावर आधारित जाहिरातींच्या प्रभावामुळे स्तनपानात झालेली घट आणि मुलांच्या कृत्रिम आहारात झालेली वाढ या कुप्रभावांबाबत प्रस्तुत पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणातच उल्लेख झालेला आहे. मध्यमवर्गात हे कुप्रभाव अधिक दिसून येतात. या वर्गात केवळ सामाजिक प्रतिष्ठेचं प्रतीक आहे, म्हणून कृत्रिम खाद्याचा मोठ्या प्रमाणावर वापर होतो. कोल्ड्रिंक्स, व्हिटॅमिनच्या गोळ्या, टॉनिकं, बिस्किटं, चॉकलेट, कॉर्न फ्लेक्स अशा अनेक गोष्टींचा समावेश यात आहे. अंडी, मांस आणि मासे अनेक कुटुंबात केवळ प्रतिष्ठा म्हणून खाल्ले जातात. नियमित स्वरूपात हे परवडणं अनेकांना शक्य नसतं. या पदार्थांच्या अपुऱ्या प्रमाणावर जेवढे पैसे हे लोक खर्च करतात, तेवढ्या पैशात त्यांना पोषक शाकाहार मिळू शकतो. परंतु शुद्ध शाकाहारी असण्यानं त्यांची सामाजिक प्रतिष्ठा वाढत नाही. साधनांचा व्यापक अभाव आणि अज्ञानामुळे घाणीच्या आणि प्रदूषणाच्या समस्या निर्माण केल्या आहेत. त्यामुळेच कुपोषण वाढायला मदत मिळते. खेड्यांमध्ये स्वच्छतेची व्यवस्था आणि आरोग्याविषयीच्या जाणिवेअभावी घाणीचं साम्राज्य निर्माण होतं, तर शहरांमध्ये औद्योगिक व्यवसायांमुळे अधिक घातक असं घाणीचं साम्राज्य पसरत जातं. गावात-खेड्यांत जीवाणू आणि विषाणूंमुळे साथींचे आजार होतात. शहरातल्या घाणीमुळे खाद्यपदार्थांच्या नैसर्गिक गुणांमध्ये विकार आणि वातावरणातल्या विषारी वायूंमुळे विकिरणांशी संबंधित रोग पसरतात. हे सगळं शेवटी कुपोषणाचा आधार बनतं.

भारतातली सगळ्यात मोठी दुर्दैवी बाब ही आहे, की बालकांची जीवनक्षमता वाढविण्याऐवजी त्यांना मृत्यूपासून वाचवण्याचं लक्ष्य ठेवलं जातं. पोषक आहाराच्या ऐवजी कुपोषण थांबविण्याचे कार्यक्रम होत असतात. अशा कार्यक्रमांमुळे बालकाच्या

मृत्यूदरावर काहीही परिणाम झालेला नाही. १९७० ते १९८० दरम्यान बाल मृत्यूदर कमी करण्याचे असंख्य प्रयत्न करूनही हा दर जेमतेमच कमी होऊ शकला. दशकाच्या सुरूवातीला मृत्यूदर हजारी १३२ होता तो शेवटी हजारी ११७ असा झाला. उत्तर प्रदेश, ओरिसा आणि मध्यप्रदेशात हा दर याहीपेक्षा जास्तच होता. एकूण राष्ट्रीय सरासरीत क्षुल्लक घट म्हणजे फार काही साधलं असं म्हणता येत नाही. कारण कुपोषित लोकांची संख्या समांतरपणे वाढतच राहिली आहे. सरकारचे आरोग्य सुधारणा कार्यक्रम बालकांच्या जीवनक्षमतेवर परिणाम करीत नाहीत. कारण हे कार्यक्रम उपचारमूलक असतात. रोधक नसतात. अनेक प्राथमिक आरोग्य केंद्रांवर औषधं वितरण न करताच पडून असतात आणि शेवटी फेकून दिली जातात. वितरित केलेल्या औषधांचा हिशोब आरोग्य मंत्रालयाकडे असतो. प्रत्यक्ष मुलांपर्यंत ही औषधं किती पोचली, याचा हिशोब नसतो. व्हिटॅमिन 'ए' बालकांना अत्यल्प प्रमाणात म्हणजे सहा महिन्यात एक चमचा देऊन त्यांना अंधत्वापासून वाचवता येतं. पण जेव्हा मूल व्हिटॅमिन 'ए'च्या अभावानं ग्रस्त होतं, तेव्हा दीर्घ उपचारांची एक प्रक्रियाच सुरू होते आणि त्यात क्वचितच यश लाभतं. वस्तुत: मातेच्या पोटात असल्यापासूनच मुलाचं आरोग्य ठरत असतं. पण आपले आरोग्य सुधाराचे कार्यक्रम पोचेतो पोटातल्या दुर्बल जीवनाने आपली भाग्यरेखा स्वीकारलेली असते. त्याला वाचवलं तरी मृत्यूच्या स्पर्शानं आयुष्यभरासाठी आपला एक ठसा उमटवलेला असतो.

सरकारी कार्यक्रमांचे विषयही मर्यादित असतात. कुपोषणमुक्तीसाठीच्या निधीपैकी मोठा भाग औषधांवर वापरला जातो. आयांचं पोषक आहारविषयक प्रशिक्षण आणि मुलांना पोषक आहार उपलब्ध करून देणं यासाठी खूपच कमी पैसा वापरला जातो. देशात कुठेही गर्भवती स्त्रियांना आरोग्य आणि आहारविषयक प्रशिक्षण देण्याची व्यवस्था नाही. मुलांच्या जन्माविषयी माहिती पुरुषांना देण्याची व्यवस्था तर अजिबातच नाही. प्राथमिक आरोग्य केंद्र आणि समुदाय विकास केंद्रात थोडाबहुत सल्ला काही आयांना जरूर मिळतो. खेड्यांमध्ये मातृत्व तर दैवाच्या हातीच सोपवलेलं असतं. मातृत्वातल्या समस्या आणि धोके आरोग्य आणि संपन्नतेच्या घसरणीसोबत वाढत आहेत. ग्रामीण भागातलं पारंपरिक ज्ञान न वापरल्यानं आणि ते ज्ञान वापरणाऱ्यांना हतोत्साहित केल्यानं लुप्त होत चाललं आहे. ज्या खाद्यपदार्थांवर ते आधारित होतं ते दुर्मीळ होत आहेत. दूध हे विकण्यासाठी किंवा तुपासाठी पूर्वीपेक्षा अधिक प्रमाणात वापरलं जात आहे. डाळी महाग झाल्या आहेत. आणि व्यक्तिगणिक त्यांच्या वापराचं प्रमाणही कमी झालं आहे. फळं, मध यांसारख्या गोष्टी सामान्य लोकांच्या आवाक्यापलिकडे गेल्या आहेत.

आपली प्राचीन संस्कृती आणि पाच दशकांचं स्वातंत्र्य यानंतरही कोट्यवधी नवजात बालकांना गरिबी, कुपोषण आणि दुर्भाग्याच्या पंज्यातून बाहेर काढून त्यांना सामाजिक संरक्षण देऊ शकू, इतके एक समाज म्हणून इतके आपण विवेकी आणि समर्थ होऊ शकलेलो नाही) सरकारी आणि निमसरकारी लाखो कर्मचाऱ्यांसाठी आपल्याकडे अनेक सुरक्षा योजना आहेत. संपन्न लोकांच्या सोयीसुविधांसाठी अगणित स्रोत आहेत. पण सहा वर्षे वयापर्यंतच्या बालकांसाठी कोणतीही निश्चित राष्ट्रीय योजना नाही. बाल मजुरीविरुद्धचे कायदे असूनही कित्येक लाख मुलं महानगरांमध्ये आज विषम परिस्थितीत नोकऱ्या करून जगत आहेत. विकसनशील देश म्हणून ० ते ५ वयोगटातल्या मुलांची देखभाल हा शिक्षणव्यवस्थेचा प्राधान्यानं विषय असायला हवा होता, त्या बाबतीत अंधार आहे. पूर्वप्राथमिक शिक्षणाचं कोणतंही स्वरूप भारतात अद्याप निश्चित होऊ शकलेलं नाही. ३ ते ६ वर्षांची जवळपास सहा कोटी बालकं देशात आहेत. ही संख्या पाहता पूर्वप्राथमिक शिक्षणाची व्यवस्था नगण्य अशीच वाटते. यात ४४ हजार बालवाड्या, केंद्रशासनाच्या जवळपास १० हजार पूर्वप्राथमिक शाळा आणि सुमारे १२०० शहरी नर्सिंग स्कूल्स आहेत. शिवाय एका विशेष योजनेअंतर्गत ६० हजारांच्या आसपास अंगणवाड्या चालू आहेत. ही संख्या मोठी नाही, पण त्यामागचं वास्तव अजून निराशाजनक आहे. लहान मुलांसाठी काम करणाऱ्यांच्या वेतन आणि सेवाशर्ती एवढ्या वाईट आहेत, की क्वचितच कुणी आपखुशीनं या क्षेत्रात येईल.

पूर्व माध्यमिक शिक्षणाचा आराखडा खूपच धूसर आणि अस्पष्ट आहे. बालवाड्यांच्या संचालनात शिक्षण, आरोग्य आणि समाजकल्याण मंत्रालयाच्या योजना एकत्रित राबवल्या जातात. त्यांत फारसा ताळमेळ राहू शकत नाही. संपर्क समित्या बनतात, पण त्यात संपर्क ठेवण्यासाठी अजून एखाद्या संपर्क समितीची गरज उरते! बालवाडीत कोणतं सामान असलं पाहिजे, मुलांची दिनचर्या काय असली पाहिजे, त्यांचा आहार कोणता असावा, हे मूलभूत प्रश्नही अजून सुटलेले नाहीत.

खेळांच्या सामानाचा सरकारी बालवाड्यांमध्ये अभाव आहे. जे काही सामान आहे, त्याची मोडतोड होऊ नये म्हणून ते अगदी जपून न वापरता वेगळं ठेवलं जातं. बालवाडीत मुलं 'मोकळी' राहू नयेत म्हणून शिक्षक मुलांना शिकवणं सुरू करतात. तीन चार वर्षांच्या मुलांना अक्षरओळख आणि अंकमोजणी शिकवली जाते. चित्रं, कागदाच्या आकृत्या आणि खेळणी बनवणं असंही कुठेकुठे घेतलं जातं. पण मुलांच्या

कल्पनांच्या मुक्त प्रयोगांपासून त्यांना रोखलं जातं आणि अतिशय शिस्तीत, निश्चित आणि आधीच ठरवलेल्या आकृत्या तयार करण्यासाठी प्रोत्साहन देऊन हे प्रयत्नही वाया घालवले जातात. शिक्षकांनी सुचवलेल्या आकृत्यांची नक्कल करण्यातच आपलं भलं आहे, असं मुलांना वाटू लागतं. हळूहळू त्यांची क्षमता एवढी बोथट होत जाते, की कल्पनेनं सृजनशील आकृत्या तयार करण्यासाठी ते संपूर्णपणे असमर्थ होतात. चित्र काढायला सांगितल्यावर ते विचारतात, 'कमळ काढू, की केळं किंवा पतंग?' एका बालवाडीत असं विचारल्यावर मी सांगितलं, की ते हवं ते चित्र काढू शकतात. थोड्यात वेळात कमळ, केळी आणि पतंगाच्या चित्रांचा ढीगच झाला. सगळी चित्रं इतकी एकसारखी होती की आश्चर्य वाटत होतं. काही मुलांनी पतंगाचं ठरवलेलं चित्रच काढण्यासाठी रबर घासघास घासून कागद फाडून टाकला होता. मग मी त्यांना काही नवे विषय दिले. बस, पानाची टपरी, भाजी मंडई, टांगा, चौरस्ता वगैरे. तर ही चित्रं काढता येणार नाहीत असं मुलं म्हणाली. यावर विश्वास बसणंच कठीण होतं की आपल्याला येणारच नाही, अशा असमर्थतेची जाणीव त्यांना करून दिली जात होती.

मुलांचं पोषण आणि देखभालीविषयी आणि एकूणच बालपणाबद्दल घोर उदासीनता आहे. समाजातल्या एकूण मृत्यूंपैकी निम्मे मृत्यू पाच वर्षांपेक्षा लहान मुलांचे असतील तर या उदासीनतेचं आश्चर्य वाटायला नको. असा समाज एका दुष्टचक्रात जगत असतो. मुलं मोठी होत नाहीत तोवर त्यांची पर्वा असा समाज करीत नाही आणि बरीच मुलं यामुळे मोठी होत नाहीत कारण लहानपणी त्यांची कुणी अजिबात पर्वा केलेली नसते. अशा समाजातल्या बऱ्याच क्षमता आणि उर्जा प्रत्यक्षात उतरू शकत नाहीत, कारण त्या लहान मुलांसोबत कुपोषण आणि अपमृत्यूची शिकार होत असतात.

■

**संदर्भ :**

१. हे आकडे युनिसेफद्वारे प्रकाशित 'भारतातल्या मुलांच्या स्थितीचं विश्लेषण' या शीर्षकाच्या पुस्तिकेतून (१९८४) घेतलेले आहेत.

२. अधिक माहितीसाठी *इकॉनॉमिक अँड पोलिटिकल विकली*च्या १०, १७ आणि २४ ऑगस्ट १९८५ च्या अंकामधील लीला बिसारिया यांचे लेख पाहावेत.

**परिशिष्ट**

# शिक्षणात हस्तक्षेप

शिक्षणाबद्दल तुमच्या मनात काही प्रश्न असतील आणि त्यासंबंधी काही भलं घडावं असं तुम्हाला वाटत असेल तर तुमच्या प्रयत्नांपासून राजकारणाची समज दूर ठेऊन त्यासाठी काही करणं अशक्य आहे. तुम्ही कोणतीही भूमिका घेतली तरी त्यामुळे कोणत्यातरी एका राजकीय विचाराला पाठिंबा मिळेल आणि दुसऱ्याचे तुम्ही विरोधक ठराल. शिक्षणाचा राजकीय संदर्भ ओळखून राजकीय पुनर्रचनेत शिक्षणाची भूमिका निश्चित करणं, हे आजच्या घडीला आवश्यक आहे. त्यासाठी प्रथम शिक्षणाची व्यापक विफलता स्वीकारणं आवश्यक आहे.

देशात शिक्षणानं लोकशाहीची मुळं मजबूत होण्यासाठी मदत केली नाही आणि सामाजिक रचनेतली सरंजामशाही तसंच वसाहतवादी तत्त्वं घालवायलाही मदत केली नाही. खोलात जाऊन पाहायचं झालं, तर असं म्हणता येईल, की आपल्या शिक्षण व्यवस्थेनं तर्क आणि विवेकाच्या भाषेला लोकप्रिय बनवण्याचा प्रयत्न केला नाही. सत्य शोधून इतरांना ते दाखवणारी भाषा आपल्या शाळांमधून आणि विद्यापीठांमधूनही शिकवली जात नाही. या ठिकाणी शिकवलं जातं, ते सत्यापासून, वास्तवापासून, भोवतालापासून आणि पर्यावरणापासून अलिप्त राहणं. संघर्ष करीत या सगळ्यांशी जुळणं आणि जुळवून घेणं आजचं शिक्षण शिकवत नाही. स्त्री-पुरुष नात्यांबद्दल समाजात जी संवेदनशून्यता आपण पाहतो, महागड्या यंत्रतंत्राचा अति वापर आणि त्याबद्दलचा हरवलेला विवेक पाहतो, जमीन, हवा, पर्यावरणाविषयी राक्षसी बेपर्वाई पाहतो त्याची मूळं शिक्षणाच्या विफलतेत आहेत.

लोकशाहीच्या दोन खास बाबी आहेत. अधिकार आणि जबाबदाऱ्यांमध्ये

समानता आणि संपूर्ण समाजाच्या हिताचं रक्षण. यांचा प्रत्यक्ष संबंध त्या लिखित किंवा अदृश्य नियमांशी आहे ज्यांद्वारे या गोष्टी ठरतात. कोणती मुलं शाळेत प्रवेश घेऊ शकतील, कोणती बाहेर ठेवली जातील, तसंच ज्यांना प्रवेश मिळाला ती तिथं किती वर्ष राहतील, तिथं काय शिकतील आणि त्यांना तिथं काय प्रकारची वागणूक मिळेल. मुलाला काय शिकवलं जातं, यावर केवळ शिक्षणाचे नैतिक आणि राजकीय उद्देश अवलंबून नाहीत, तर त्यांना कशासाठी शाळेत घातलं जातं यावरून ते अधिक ठरतात. म्हणजे शिकताना मुलं जगण्याचे कोणते नियम शिकतात, हेही महत्त्वाचं असतं. सर्वांना समान तत्त्वावर खुला प्रवेश देणाऱ्या शाळेत आपोआपच एक प्रकारची नैतिकता तयार होते, तर स्पर्धात्मक प्रवेश आणि भरपूर फी आकारणाऱ्या शाळेतल्या मुलांमध्ये वेगळ्या प्रकारची नैतिकता तयार होते. पहिल्या प्रकारच्या शाळेला मी 'खुली' किंवा 'मुक्त शाळा' म्हणतो. अशा शाळेत प्रत्येक मुलाला अनेक प्रकारच्या सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक पार्श्वभूमी असलेल्या मुलाशी नातं जोडण्याची संधी मिळते. या प्रकारच्या संधी म्हणजेच 'मुक्त शाळां'मधल्या नैतिक आणि लोकशाहीवादी राजकारणाचा अभ्यासक्रम आहे, असं म्हणावं लागेल. अशा वातावरणात मुलांना आपल्या समाजातलं वास्तव आणि राजकीय शक्तीचं विभाजन कशा प्रकारचं आहे हे समजून घेण्याची जिज्ञासा आणि शक्यता निर्माण होऊ शकते.

दुसरीकडे 'शुल्क देणाऱ्यांनाच प्रवेश' देणाऱ्या शाळा तथाकथित योग्यतेच्या आधारे मुलांना निवडतात. यांना मी 'बंद शाळा' म्हणतो. तिथं अगदी वेगळ्या प्रकारची नैतिकता मुलं शिकतात. या मुलांमधून अनैतिक वातावरणात जगण्याचा सराव असणारे नागरिक तयार व्हावेत हाच त्यांच्या शिक्षणाचा उद्देश असतो. आपली मुलं गरीब लोकांपासून दूर, एका तथाकथित 'नैतिक बेटांवर' राहावीत असं वाटणाऱ्या आईबापांना या स्पर्धात्मक प्रवेशाचं खोटं नाटक करणाऱ्या शाळा आकर्षित करतात. या बेटांवर मुलांना सहनशीलता, दया आणि धैर्य हे गुण शिकवले जातात. खाजगी शाळांच्या प्रवेश धोरणांमधून उत्पन्न झालेलं वातावरण भारतीय समाजातले वर्गसंबंध आणि संबंधित दडपणूक यांच्या दुर्गंधीपासून अलिप्त राहू शकत नाही. शाळेच्या चिरेबंदी वातावरणात अलग, स्वच्छ टापटिपीत राहणाऱ्या या मुलांना गरिबी, अन्याय, क्रौर्य या अमानुष वास्तवाबद्दल सहनशील बनायला शिकवलं जातं आणि समाजातल्या रचनात्मक नात्यांकडे डोळेझाक करून वैयक्तिक शुद्धतेच्या तुरुंगात संतुष्ट राहायला शिकवलं जातं.

स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्या अनेक नेत्यांनी लोकशाही समाजरचनेत शिक्षणाची उपयुक्तता ओळखली होती. गोपाळ कृष्ण गोखले, ॲनी बेझंट, लाला लजपतराय आणि महात्मा गांधी या चार नेत्यांनी आपल्या राजकीय कार्यक्रमात शिक्षणाला महत्त्वाचं स्थान दिलं होतं. शासनाने प्राथमिक शिक्षण सर्वांसाठी अनिवार्य करावं अशी मागणी गोपाळ कृष्ण गोखल्यांनी ऐंशी वर्षांपूर्वीच केली होती. मूलभूत शिक्षण हा तर महात्मा गांधींच्या राजकारणाचा महत्त्वाचा भाग होता. आणि ही गोष्ट त्यांच्या अनुयायांपेक्षा विरोधकांनी अधिक ओळखली होती. स्वातंत्र्योत्तर काळात श्रीमाळी, मुदलियार, कोठारी आणि जे. पी. नाईक यांनी शिक्षण हे सामाजिक आणि राजकीय कार्यक्रमाचेच अंग असण्याची परंपरा पुढे चालू ठेवली. असं असूनही शिक्षण लोकशाही मूल्यांनुसार आणि लोकशाहीच्या दृष्टिकोनातून दिलं गेलं नाही. प्राथमिक शिक्षणात सर्व मुलांना सामील करून घेणे, समताधिष्ठित अभ्यासक्रम आणि मुलांना न्याय देऊ शकणारी परीक्षापद्धत तयार करणे अशा मुद्द्यांच्या बाबतीतही केंद्र आणि राज्य सरकारं पूर्णपणे अपयशी ठरली.

या अपयशाची कारणं जे. पी. नाईकांकडून त्यांच्या अखेरच्या दिवसात ऐकायला मिळाली. दीर्घकाळ सरकारी पठडीत राहूनही प्रयत्नशील राहिलेले नाईक अखेरच्या काही महिन्यांत खिन्न असायचे. शिक्षण सुधारणेच्या आपल्या प्रयत्नांना राजकीय मदत का मिळू शकली नाही, याचं त्यांना वाईट वाटायचं. शिक्षणासाठी भविष्यातल्या योजना आखताना केवळ माणसाची आदर्श प्रतिमा पुरेशी नाही, असं ते म्हणत. 'आज दिसणारा अन्याय आणि अत्याचार नष्ट करणारी अशी एक सामाजिक व्यवस्थाही आपल्या मनात असायला पाहिजे. राजकारण्यांच्या इच्छेवर निर्णय अवलंबून असतात हे मला मान्य नाही. माझा प्रश्न हा आहे, की सत्तेतले लोक कुणाचं हित पाहात आहेत? भविष्यात शैक्षणिक धोरण आखताना तीन गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत: पहिली म्हणजे माणसाची प्रतिमा (म्हणजे कोणत्या प्रकारचा माणूस आपल्याला अपेक्षित आहे); दुसरी, जीवन पद्धती आणि तिसरी म्हणजे कोणती समाजव्यवस्था आपल्याला योग्य वाटते? केवळ जनजागरण आणि जन आंदोलनातून समाजव्यवस्था आणि शिक्षणाला बदलण्यासाठी आवश्यक असणारा दबाव निर्माण होऊ शकतो.'

जे.पी. नाईकांनी उभ्या केलेल्या या प्रश्नांच्या आधारे शिक्षणाचे उद्देश निश्चित करण्यासाठी आपल्याला मदत मिळू शकते. आज आपल्याला शिक्षणविषयक दोन विचारप्रवाहांतून एकाची निवड करावी लागणार आहे. वस्तुतः, स्वातंत्र्य मिळालं तेव्हाच ही निवड होणं आवश्यक होतं, त्यावेळी ते झालं नाही. आजही व्यापक जनजागरणाशिवाय हे काम होऊ शकणार नाही. एका मतप्रवाहानुसार शिक्षण म्हणजे

पवित्र आणि कठीण अशी साधना आहे. काही थोड्या मुलांनाच ती साध्य आहे. म्हणूनच हा प्रवाह 'योग्य' विद्यार्थ्यांची निवड करतो आणि अशा निवडक विद्यार्थ्यांना विकासाच्या पूर्ण संधी उपलब्ध करून देतो. या शिक्षणप्रक्रियेत गुरू हाच सर्वेसर्वा असतो. ज्ञानाचं स्वरूप देशकालनिरपेक्ष असतं. यामुळे या मतप्रवाहाचे समर्थक असं मानतात, की प्राचीन ग्रंथांच्या आधारेच शिक्षणाचा उद्देश निश्चित करण्यात यावा.

दुसऱ्या मतप्रवाहानुसार शिक्षणाचे उद्देश परिस्थितीनुसार निश्चित केले जावेत असं मानलं जातं. या दृष्टीने साम्राज्यवादी किंवा वसाहत काळात जी शिक्षणपद्धती योग्य होती, ती लोकशाही व्यवस्थेत योग्य असणार नाही. लोकशाही शिक्षण म्हणजे निवडक विद्यार्थ्यांची पवित्र साधना असं असू शकत नाही. ते समाजातल्या प्रत्येक पालकाची जबाबदारी आणि प्रत्येक मुलाचा अधिकार बनतं. समाजाच्या भौतिक आणि नैतिक गरजा शिक्षणातून प्रतिबिंबित होणं अपेक्षित आहे. म्हणूनच लोकशाही समाजव्यवस्थेत सामाजिक वास्तवाचं वस्तुनिष्ठ विश्लेषण होणं गरजेचं आहे. मुलांचं बालपण आणि समाजाचं तार्किक आकलन याचा एकत्रित विचार करूनच आपल्याला अभ्यासक्रम आखावा लागेल.

दुसऱ्या पद्धतीनुसार शिक्षणासाठी योजना तयार करताना आजच्या भारतीय समाजाचा विचार करता दोन गोष्टी समोर येतात. एक म्हणजे घटनेनं मान्य केलेल्या तत्त्वांची आणि आदर्शांची अवहेलना होत आहे. सामाजिक अन्याय, शोषण आणि त्याविरुद्ध संघर्ष करण्याची जबाबदारी काही मोजक्या संस्था-संघटनांची उरली आहे. सामान्य नागरिक या प्रश्नांबद्दल उदासीन असून तिकडे दुर्लक्ष करून मान खाली घालून जगणं तो पसंत करतो.

संसद, विधानसभा आणि इतर व्यासपीठं यांवर जे लोक तळमळीनं गरिबांच्या मूलभूत प्रश्नांकडे लक्ष वेधण्याचं काम करतात त्यांना शेखचिल्ली समजलं जातं. आर्थिक विकास, तंत्रज्ञान, विदेश व्यापार यांसारख्या क्षेत्रात राबवण्यात येणारी धोरणं पाहिली की एक गोष्ट स्पष्ट होते की देशातल्या संपन्न आणि सत्ताधारी वर्गाला इथल्या गरिबीच्या समस्येची आणि तिच्या व्याप्तीची चीड आहे. सत्तेच्या परिघात किंवा सत्तेत असलेल्या लोकांना गरीब लोक आणि त्यांच्या गरजा म्हणजे विकासातले अडथळे वाटतात. त्यांच्या मते एकविसाव्या शतकाच्या तयारीसाठी देशाला रंगीत दूरचित्रवाणी, कम्प्यूटर, व्हिडिओ आणि अणुशक्तीची गरज आहे. प्रत्येक गावात पिण्याचं पाणी, प्रत्येक शाळेत फळा आणि प्रत्येक मुलाला दूध हे मात्र त्यांच्या अजेंड्यावर अजिबात नाही.

सामाजिक न्यायाचा शिक्षणाशी अत्यंत घनिष्ठ संबंध आहे, हे जाणून घेण्याची कुणाची इच्छा नाही. सरकारी खर्चावर चालणारं उच्चशिक्षण स्वस्त ठेवायचं काय कारण? हा प्रश्न कुणी विचारत नाही. असे उच्चशिक्षण घेणारे गरिबाघरचे विद्यार्थी नगण्य आहेत. म्हणजे समाजातल्या ज्या स्तरातील लोकांची शिक्षण 'विकत' घेण्याची ऐपत आहे त्यांनाच सरकारी खर्चाने चालणाऱ्या स्वस्तात मिळणाऱ्या उच्चशिक्षणाचा लाभ मिळतो. ज्यांच्याकडे अशी ऐपत नाही, त्यांना मात्र सबुरीचा सल्ला देताना अनौपचारिक शिक्षणाची सोय दिली जाते! स्वातंत्र्यानंतर इतकी वर्षे उलटूनही सर्व मुलांना शिक्षण का मिळू शकत नाही? या प्रश्नाचं उत्तर सोयीस्करपणे टाळलं जात आहे.

आपल्या देशात परंपरावादी, मूलतत्त्ववादी विचारांची वाढती लोकप्रियता हा दुसरा दुर्दैवी पैलू आहे. कधी नैतिक ऱ्हासाचा डांगोरा पिटत तर कधी धार्मिक स्पर्धेची दहशत घालीत मूलतत्त्ववादी संघटना प्रचारात उतरल्या आहेत. त्यांच्या प्रचाराच्या केंद्रस्थानी 'पावित्र्याची' अपसमजूत आहे. पवित्र जल, पवित्र पोशाख यांसारखी प्रतीकं उभी केली जातात. शालेय शिक्षणात 'उपदेशकारी नैतिक शिक्षण' घुसडण्याचा डाव म्हणजे या पावित्र्याच्या साधनेचाच भाग आहे. हा कार्यक्रम निगरगट्टपणे पुढे रेटणारी जी मंडळी आहेत (ज्यात वरिष्ठ शासकीय अधिकारीही आहेत) त्यांची मागणी आहे, की शैक्षणिक धोरण मागे प्राचीन भूतकाळाकडे वळवून त्यात परंपरावादी दृष्टिकोन आणावा.

शिक्षण क्षेत्राची इतकी वाताहत आणि सडलेली अवस्था बघता परिस्थिती सुधारण्यासाठी आता शिक्षणसंस्था आणि शिक्षणतज्ज्ञांवर जबाबदारी टाकून चालणार नाही. ही परिस्थिती केवळ शिक्षणसंस्था आणि शैक्षणिक विचारात साचलेपण आल्यानं निर्माण झालेली नाही. शिक्षणव्यवस्थेतला हा ऱ्हास राजकीय आणि सांस्कृतिक अधोगतीबरोबरच झालेला आहे. त्यामुळे राजकीय पुनर्रचनेचाच एक भाग म्हणून शिक्षणाची पुनर्रचना होऊ शकेल, स्वतंत्रपणे नाही. त्यासाठी सामाजिक-राजकीय कार्य करणाऱ्या व्यक्ती आणि संघटनांनी शिक्षणक्षेत्रात सक्रिय सहभागी होणं आणि सक्रिय रस घेणं आवश्यक आहे.

आदिवासी, दलित, भूमिहीन, कामगार, स्त्रिया आणि मुलांसाठी काम करणाऱ्या संघटनांनी आपल्या उद्देशांशी अनुरूप असे कार्यक्रम आणि अभ्यासक्रम तयार केले पाहिजेत. असे कार्यक्रम राबविण्यासाठी सरकारी शिक्षणसंस्थांचा उपयोग

केला पाहिजे. पर्यावरणाच्या विनाशाविरुद्ध संघर्ष करणाऱ्या गटांनी आपला दृष्टिकोन शालेय अभ्यासक्रमातही आणण्यासाठी संघर्ष केला पाहिजे. अभ्यासक्रमावर नोकरशाहीचा अंकुश असला पाहिजे असं देशाच्या कोणत्याही कायद्यात लिहिलेलं नाही. हा केवळ वसाहतकालीन परिपाठ आहे आणि तोही लोकसंघटना आणि पालकांच्या उदासीनतेमुळे इतकी वर्षं चालू राहिला आहे. रेल्वे चालवायला, रस्ते स्वच्छ ठेवायला, कायदा आणि सुव्यवस्था राखायला सरकार जेव्हा जनतेच्या मदतीची अपेक्षा करतं, तर मग अभ्यासक्रम तयार करायला आणि शाळा चालवायलाही आपण सरकारला मदत का देऊ नये?

भारताचे नागरिक म्हणून आपल्या मुलांच्या शैक्षणिक जीवनात मनापासून रस घ्यायला हवा. शिक्षण म्हणजे काही जादू नव्हे, ही गोष्टच आपल्यापैकी बरेच जण विसरून गेले आहेत. कुणी किती का चांगलं शिक्षण घेवो, त्याचं वर्तन आणि व्यवहार अखेर सामाजिक परिस्थितीवरच अवलंबून राहील. कुणी कितीही चारित्र्यवान असला, तरी आजूबाजूला अन्याय, विषमता, क्रौर्य आणि वेदना असेल, तर तो चारित्र्यसंपन्न म्हणून टिकून राहणं अवघड असतं. कमळं तलावात उमलतात, मानवी समाजात नाही. शिक्षित माणसाला आपण चिखलात उगवणाऱ्या कमळाची उपमा देतो. अशा पारंपरिक दृष्टिकोनामुळेच शिक्षणाचे राजकीय पैलू आणि त्यांचं महत्त्व यांविषयी आपण अनभिज्ञ राहिलो आहोत. शिक्षित माणसासाठी आपण आता वेगळी उपमा शोधायला पाहिजे हेच खरं.

